*JOURNALISM Vol. I, "NEWS REPORTER"*

**पत्रपांडित्य — प्रथम खंड**

# वातमीदार

श्रीपाद रामचंद्र टिकेकर

१९३४

**किंमत रु. २**

# विषयानुक्रम

*As a trade or business, journalism may be profitable or unprofitable. As a profession, it may be noble or ignoble. As an art, it may offer scope for the finest or the most degraded talent. As a vocation, it may be saintly or criminal. As a ministry, it may be of the highest service or an instrument of the lowest depravity. But as an opportunity for those who can seize it, and are determined to use it to the fullest extent in a self constituted trusteeship for their fellow-men, it has hardly a peer.*

—*WICKHAM STEED.*

# अग्रलेख

## मुंबई, १० फेब्रुआरी १९३४

पत्रपांडित्य ही एक विद्या आहे – ती शिकतां येते, हेंच मुळीं बहुतेकांना मान्य नाहीं. युनिव्हर्सिटीच्या दोन चार परीक्षा दिल्या कीं, मग त्या व्यक्तीला “ समदं लिवायला अन् वाचायला येतं ” अशी खेडवळांप्रमाणें समजूत पुष्कळांची असते. वर्तमानपत्री लेखन अगदीं निराळें हा सिद्धांतच त्यांना पटत नाहीं. म्हणून महाराष्ट्रांत मराठी वर्तमानपत्रांचा प्रसार होऊन सुमारें शंभर वर्षें होत आलीं, तरी ह्या विद्येची शिकवण देणारें विद्यालय अथवा तत्संबंधीं चर्चा करणारें पुस्तक अद्याप आपल्या आढळांत नाहीं. पत्रपांडित्याचा समावेश अठरा विद्या व चौसष्ट कलांत नाहीं म्हणून तर आमचा त्या विद्येवर रोष नसेल ना ? किंवा असेंही कदाचित् असावें. विमानें, रेडियो ( आकाशवाणी ) असले शोधसुद्धां पुराणकालीं आमच्या पूर्वजांना ठाऊक होते, अशी साधार बढाई मारतां येते. तसें वर्तमानपत्रांचें नाहीं. प्राचीन कालीं विमानें होतीं, आकाशवाणीनें कांहीं महत्त्वाचे संदेश समजत, इत्यादि गोष्टी पुराणांतील आधारावरून सिद्ध होत असल्या, तरी वर्तमानपत्रें पूर्वीच्या जमान्यांत होतीं असें अजूनपर्यंत

तरी कुणीं सिद्ध केलें नाहीं. आणि म्हणूनच या विद्येवर इतका कडक बहिष्कार पडला असावा !

माझाच या बाबतींतला अनुभव पहा. पत्रपांडित्य शिकावें, नामांकित पत्र-पटूंच्या हाताखालीं मोफत राबून, '**प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया**' हें ज्ञान संपादन करावें, म्हणून पुष्कळ खटपट मी केली. पण प्रत्येक ठिकाणीं नकार मिळाला – इतकेंच नव्हे तर मराठींत असें शिक्षण कोठें मिळणार नाहीं – असा सल्लाही बहुतेकांनीं दिला. त्यानंतर एका गौरकाय पत्रपटूच्या सेवेंत राहून मी ही विद्या शिकलों, तो भाग वेगळा. परंतु आमच्या पत्रपंडितांना 'मराठींत असें शिक्षण मिळणार नाहीं' ही जाणीव असताही त्यांनीं ही उणीव दूर करण्याची खटपट काहींच केली नाहीं, याबद्दल मात्र मला फार वाईट वाटलें – अजूनही वाटतें.

वास्तविक पाहतां हें कार्य मराठ्यांचेंच. वर्तमानपत्र ही चीज आपणांस इंग्रजी संपर्कानें कळूं लागली असली, तरी राजकीय वा घरगुती बातमीपत्रें लिहिण्याचा अभ्यास मराठ्याना होता तितका इतर कुणांस होता असें वाटत नाहीं. पुण्यांतील पेशवे दप्तरच घ्या ना ! हिंदुस्थानांतील वेगवेगळ्या राजकीय केंद्रा-तून मराठी बातमीदारानीं – मराठ्यांच्या वकिलानीं – पेशव्याकडे पाठविलेलीं तीं बातमीपत्रेंच नव्हत काय ? राजकीय घडामोडींचें आकलन, आपल्या हित-संबंधांचें रक्षण आणि बारीक सारीक गोष्टी ताबडतोब आपल्या धन्याकडे लिहून कळविण्याची तत्परता – ह्याच बाबी त्या पत्रांवरून स्पष्टपणें नजरेंत भरतात. आणि बातमीपत्रात आणखी काय हवें असतें ? अशीं लक्षावधि मराठी पत्रें पेशवे दप्तरात आहेत. त्यावरून मराठ्यांना बातमीपत्रें लिहिण्याची विद्या चांगली अवगत होती हेंच अनुमान निघतें.

आणखीही एका दृष्टीनें मराठ्यांचा पत्रपांडित्यावर हक्क आहे. भावनाप्रधान लोकांच्या मानानें मराठे म्हणजे अधिक बुद्धिवादी; म्हणूनच ते कुठल्याही भावनेला बळी पडत नाहींत – म्हणूनच म. गांधींच्या अनुयायांत महाराष्ट्रीय वीर कमी – अशी विचारसरणी मोठ्या अभिमानानें लढवितात. पण बुद्धि-प्राधान्याचें प्रत्यंतर बुद्धिप्रधान व्यवसाय करण्यांत नको दिसायला ? आणि पत्रपांडित्यापेक्षां बुद्धिप्रधान अशी दुसरी कोणती विद्या आहे ? मराठे पत्र-

पांडित्यात उत्कृष्ट प्रकारें प्रगति करतात याचें एकच उदाहरण सांगतों. हिंदींतील कांहीं प्रमुख पत्राचे – नियतकालिकांचे – संपादक मराठे आहेत. आणि कै. माधवराव सप्रे, पं. लक्ष्मण नारायण गर्दे, श्री. बाबुराव पराडकर इत्यादि वीरांनीं त्या क्षेत्रात कमावलेली कीर्ति अविस्मर्य अशीच आहे. म्हणून पत्रपांडित्य मराठी स्वभावास अधिक पटतें – पटावयास पाहिजे – असें कां म्हणूं नये ?

अशा परिस्थितींत ही 'पत्रपांडित्य – प्रवेशिका' मराठी वाचकांपुढें आणताना मला एक प्रकारचा अभिमान तर वाटतोच. परंतु त्या अभिमानापेक्षां भीतीचा बोजा अधिक आहे. भीति अशासाठीं कीं, पुष्कळ अधिकारी लेखक या विषयावर मराठींत असतां, मी पुढें यावें, आणि 'कालच्या पोरानें' पत्रपांडित्याचे धडे देण्याचा प्रयत्न करावा, ही एक हास्यास्पदच गोष्ट होय. परंतु माझा या बाबतींत नाइलाज झाला. माझ्या कांहीं मित्रांना ही माझी कल्पना व तिची कांहीं अंशीं फलद्रूपता सुमारें तीन वर्षांपूर्वींच पहावयास मिळाली होती. तीन वर्षांचा अवधि गेला तरी कुणी वीर ह्या क्षेत्रांत पदार्पण करीना. म्हणूनच मला, माझा अनधिकार ठाऊक असतांही, ह्या नव्या दालनांत बिचकत बिचकत शिरावें लागत आहे. पुढें मार्गदर्शक कोणी नाहीं, रस्तासुद्धां चोखाळलेला नाहीं, स्वतःची तयारी म्हणावी तर तीही बेताबाताचीच, आणि उद्दिष्ट पडलें असें बिकट; तेव्हां मी कां बिचकतों तें वेगळें सांगण्याचें कारण नाहीं. विषय–प्रतिपादन करतांना मला सर्व भिस्त इंग्रजी ग्रंथांवरच ठेवावी लागली हें स्पष्टच आहे. तेव्हां पुस्तकांतील चांगुलपणा हा सर्वस्वी उसनवारीनें नटविलेला भाग मानून, दोष असतील ते मात्र माझ्या माथीं मारावे, त्याबद्दल सर्वस्वी जबाबदार मी, हें लक्षांत घ्यावें. पाहिलें, ऐकलें किंवा समजलें तेवढेंच नेमकें लिहावयाचें, यापेक्षां मला अधिक कसें साधेल ? त्याची अपेक्षाच मजकडून कुणी करूं नये, म्हणजे निराशा होणार नाहीं. अशी विनंति मी वाचकवर्गास आधींच करून ठेवतों.

माझ्या अडचणी विविध होत्या. पहिली मुख्य पारिभाषिक शब्दांची. आपल्या परीनें सुचले ते शब्द बनविण्याचा प्रयत्न मी केला आहे. तेच सर्वमान्य व्हावे असा आग्रह मी मुळींच धरणार नाहीं. दुसरी अडचण उत्कृष्ट

उतारे निवडण्याची. याबद्दल अधिक न लिहिलेलेंच बरें. तिसरी बाब, रोष-संपादनाची. पत्रपांडित्यांतील नवशिक्यांकडून चुका होतात त्या कोणत्या व त्या टाळाव्या कशा, ही चर्चा या पुस्तकांतून वगळणें ( शक्य असलें तरी ) इष्ट नव्हतें. म्हणून कांहीं कांहीं वर्तमानपत्रांतील चुकांचे नमुने घेतले आहेत. अर्थात् त्यांत कोणा विशिष्ट वर्तमानपत्राचे दोष दाखवावयाचे हा हेतु नसून सर्व साधारण पत्रपटूंच्या हातून घडणाऱ्या चुका – टाळण्यासाठीं – निदर्शनास आणावयाच्या होत्या. म्हणूनच कोणत्या वर्तमानपत्रांतील ते उतारे आहेत याचा उल्लेख होतां होईल तो टाळला आहे. चुका अत्यंत हास्यास्पद आहेत असें समजल्यावर – आणि मी त्या अधिक हास्यास्पद केल्या म्हणून – मजवर रुष्ट मंडळी आग पाखडतील, ह्या नाहीं त्या मिषानें गुप्त चावा घेतील, हें मी अपेक्षून आहे. कारण मराठी स्वभावांत पूर्वी कधीं नसलेला एक विशेष दुर्गुण हल्लीं घुसला आहे. त्याचा प्रसाद मिळाल्याविना राहणार नाहीं, असें मी धरून चालतों. स्पष्टवक्तेपणाचे गोडवे तेवढे आम्ही गातों, तो गुण मात्र आम्हास रुचत नाहीं, उलट टोचतो, बोचतो, अशी अनिष्ट परिस्थिति सध्यांची आहे. ' मी तुम्हांला काजी म्हणतो, तुम्ही मला हाजी म्हणा ' अशा प्रकारचा पंथ वाढीस लागल्यानें माझें काम विशेष बिकट झालें आहे. निर्भीड अशी टीका कुणाला करतां येत नाहीं, का करण्याचें धारिष्ट नाहीं असा प्रश्न हल्लींचें वातावरण पाहून वारंवार सुचतो. तें कांहींही असलें, तरी स्पष्टपणें मी चुका दर्शविल्या, त्याचा हेतु शुद्ध असल्यानें मला कुणाच्याच रोषाची परवा वाटत नाहीं. एका विवक्षित पक्षाला अथवा व्यक्तीला खूष करण्यासाठीं एवढा खटाटोप केला नसून ' पत्रपांडित्य–प्रवेश ' कसा करावा व त्यांत यशस्वी कसें व्हावे हें सांगण्याचा हेतु माझेपुढें असल्यानें ही टीका अपरिहार्य होती. असो.

येथें एका गोष्टीचा खुलासा केला पाहिजे. प्रस्तुत पुस्तकांत बातमीदारीचीच प्रामुख्यानें चर्चा केली आहे. इंग्रजींत रिपोर्टर, कॉरेस्पॉंडंट, ' स्पेशल ' व ' रेप्रेझेंटेटिव्ह ' अशीं वेगळीं नांवें असणारे हे सर्व बातमीदारच असें मी धरून चाललों आहे. ' स्पेशल ' चा दर्जा सर्वांत अधिक हें सांगावयास नकोच. ' रिपोर्टर ' याचा अर्थ नुसता ' खबर देणारा ' असाच करण्याचें कारण नाहीं. टपालमार्गें बातमी देणारा 'कॉरेस्पॉंडंट'

व स्थानिक बातमी लिहिणारा 'रिपोर्टर' असासुद्धां भेद पत्र-कचेरींतील शिरस्त्यावरून पाळतां येईल. कोणाही बातमीदाराच्या बातमीविषयीं संपादक जबाबदारी घेऊं इच्छित नाहीं, तेव्हां 'एका बातमीदाराकडून' असें म्हणतात. बातमी देणारें खातेंच मुळीं 'रिपोर्टिंग' या नांवानें ओळखतात. व त्यावर 'चीफ रिपोर्टर' मुख्य असतो. पण एवढयानें त्याचा दर्जा कमी ठरत नाहीं. आपला मनुष्य खास पाठविला असल्यास 'प्रतिनिधीकडून' असें लिहितात. स्पेशल हा नेहमींच त्या पत्राचा नोकर नसतो. प्रतिनिधी मात्र असतो. त्या त्या शाखेंतील तज्ञ, सरकारी, निमसरकारी अधिकारी, लोकहिताखातर बातमीदाराचें काम 'स्पेशल' म्हणूनच करतात. सर्वांच्या कामाचा समावेश मी 'बातमीदार' ह्या व्यापक संज्ञेखालीं केला आहे.

प्रास्ताविक अशा ह्या लिखाणांत पत्रपांडित्याविषयीं किती तरी वेगवेगळ्या प्रश्नांचा उहापोह करतां येईल आणि तो व्हावा अशी पुष्कळांची अपेक्षासुद्धां असेल. परंतु फक्त दोन तीनच वादग्रस्त व आपणांस आज जिव्हाळ्याच्या वाटणाऱ्या प्रश्नाची चर्चा मी थोडक्यात आटोपणार आहे. हिंदी पत्रपांडितांची एक अखिल भारतीय स्वरूपाची व नंतर भाषावार प्रांतिक पत्रपटूंची, अशा परिषदा अलीकडे भरूं लागल्या आहेत खऱ्या. पण त्यापासून निष्पत्ति काय असें विचारल्यास **कां हीं ना हीं**, हेंच उत्तर मिळतें. तीर्थांचे ठिकाणीं होणाऱ्या भाविक संस्कारांपेक्षां अधिक वेगळें स्वरूप त्याचें नाहीं. धार्मिक भावनासुद्धां ह्या संमेलनांत नसते. कोठल्या तरी संपादक महोदयानें सरकारनें असें करावें, लोकानीं तसें करावें, ही परिस्थिति अत्यंत हानिकारक आहे, ती बदलावी, अशी परभारें पाहुणचार करविण्याची प्रयोजक भेदी भाषा बोलावी; कांहीं ठराव पास करावे; एखादा पुरवा व उद्यानांतील अल्पोपहार झोडावा, यापेक्षां अधिक कामगिरी कोणत्या अधिवेशनांत झाली आहे ? इंग्रजींतून कां होईना, पण हिंदी दृष्टीनें पत्रपांडित्याची शिकवण मिळण्याचे वर्ग आहेत कुठें ? संपादक – संचालक – मालक – अशी विविध नातीं एकत्रित झालेले पत्रपंडितच नेहमीं अध्यक्षपदीं विराजणार, तेव्हां संपादकीयेतर पत्रपटूंच्या, त्यांच्या संघटनेचा, शिक्षणाचा किंवा प्रगतीचा विचार तेथें होणें शक्यच नसतें ! बहुतेक सर्व धंद्यांतील कामगारांची एकजूट घडवून आणण्यास मदत होते वर्तमानपत्रांची. पण त्या वर्तमानपत्रांतले कामगार ( छापखाना हा तूर्त आपण वेगळा

काढूं ) मात्र एकीनें रहात नाहींत, हें केवढे आश्चर्य ! संपादकीय काम करणाऱ्याचा ' कामगार ' असा निर्देश केल्याबद्दलच कित्येकांना राग येईल. परंतु व्यवहाराचे सोईसाठीं त्यांना शिक्षित कामगार म्हटलें म्हणून कुठें बिघडलें ? तक्रारीची बाब एवढीच कीं, पत्रपटूंची संघटना होऊन – करून – त्यांच्या मजुरीची, कामाच्या वेळेची, विम्याची, वगैरे पुष्कळ प्रकारची सोय लावून घेणें – लावून देणें – हीं कामें खरें पाहिलें, तर त्या परिषदांतच व्हावयास पाहिजेत. पण तीं होत नाहींत ना !

हा केवळ आर्थिक लढयाचा प्रश्न आहे, भांडवलशाही व मजूर असा भेद माजविणारांची ही मोहक भाषा भाषा आहे, असें समजून पाहिजे तर इकडे दुर्लक्ष होऊं द्या. पण शुद्ध संपादकीय कर्तव्यासंबंधीं तरी कुठें कांहीं निश्चिती आहे ? वृत्तपत्रांच्या कचेरीची आपणांकडे किती कोती कल्पना असते पहा ! खरें पाहूं गेलें असतां, संपादकीय कार्यालय म्हणजे विजेचें ' पॉवर हाऊस ' असावयास पाहिजे आणि सुविद्यपणें चालविलेल्या सुधारलेल्या देशांतील पत्रांचें तसें असतेंही. विद्युत् शक्ति पैदा होते तें ठिकाण दिसावयाला शांत असून खुद्द विद्युज्जनकाचा ( जनरेटरचा ) आवाजही तसा मोठा नसतो. काय शक्ति निर्माण होत आहे किंवा तिचे प्रताप किती आहेत त्याची कल्पनाही तेथें राहून येत नाहीं. परंतु तारांमधून ती अदृश्य शक्ति वाटेल तेथें पोहोंचते आणि कोठें ( ज्ञान )दीप तेवत राहतात, कोठें राक्षसी यंत्रांना चालना मिळते, कांहीं जागीं डोंगर उडवून देण्याचें काम चालू असते......नाना प्रकारें त्या विद्युल्लतेचा उपयोग होतो. तशीच गोष्ट वर्तमानपत्रांची असावयास हवी व कांहीं कांहींची आहेही. आमच्याकडे मात्र मुळींच नाहीं. वृत्तपत्रकचेरी म्हणजे ' ज्ञानसिंधु ' सारखा सर्वांना तिचा उपयोग झाला पाहिजे. निरक्षर, परतंत्र, पण वर्धिष्णु देशात वर्तमानपत्रांवर तर अधिकच जबाबदारी येऊन पडते. लोकांना शिक्षण देण्याचें, जागृत करण्याचें आणि मार्ग दाखविण्याचें काम संपादकांचेंच. त्याला तें नाकारून चालावयाचें नाहीं. आणि म्हणून हरप्रकारें जनसेवा करण्यास पाश्चिमात्य पद्धतीनें चालविलेलीं पत्रें कशीं तत्पर असतात ! आमच्याकडे मात्र लोकोपयोगी मजकूर लिहून आलेला छापल्यानें लोकांवर आपण किती तरी उपकार केले ही भावना पुष्कळ पत्रपंडितांची

असते ! हा दृष्टिकोनांतला फरक अजीबाद नाहींसा होईल, उपकारकर्त्याला आपल्या कृत्यांची जाणीव होणार नाहीं, '**स्वसुखनिरभिलाषः खिद्यसे लोकहेतोः**' अशी वृत्ति अंगीं बाणेल, तेव्हाच आमच्या पत्रपांडित्याची खरी प्रगति सुरू झाली असें म्हणतां येईल. एरवी नाहीं.

सार्वजनिक कार्यांत – कसल्याही चळवळींत – पत्रपंडितांनीं भाग घ्यावा अथवा आपलें उद्दिष्टच साधावें, हा प्रश्न गेल्या चळवळीपासून उपस्थित झाला आहे. वर्तमानपत्राचें ध्येय एकदां स्पष्ट कळल्यावर त्याचें प्रत्यक्ष कार्य काय असावें हें वेगळें सांगण्याची वास्तविक आवश्यकता उरूं नये. परंतु आपल्या देशातील वातावरण वेगळें आहे. व्यक्तिप्रधान जीवन आमचेकडे विशेष. तत्त्वानुरोधन अथवा तत्त्वरक्षण त्यामानानें बरेंच कमी. म्हणून "आधीं केलें – मग सांगितलें" या प्रकाराला अधिक महत्त्व मिळतें. आणि त्याच कारणासाठीं कुठलीही गोष्ट प्रतिपादन करणाराला ती आधीं करून दाखविली पाहिजे. त्याशिवाय त्या प्रतिपादनाला – क्रीयेवीण वाचाळतेला पाहिजे तर म्हणा – काहीं किंमत नसते. परंतु मुख्य झगडा येतो तो इथेंच. फक्त सल्ला देण्याचें, युक्तायुक्त ठरविण्याचें, युक्तीच्या चार गोष्टी सांगण्याचेंच काम संपादकाचें, अशी समजूत पत्रपंडितांची आहे. तिला आधार युरोप – अमेरिकेमधील पत्रांचा मिळतो. श्रमविभागणीची ही अशी सोईस्कर पद्धत तिकडे असली, धंदेवाईक वक्ते, चळवळ्ये, त्या देशांत मिळत असले, तरी आपणाकडे, आपल्या संस्कृतीत, ती चाल बरीच वर्षें अमलात येणार नाहीं. आपली हिंदी माणसाची मनोभूमिका, आपली राजकीय, सामाजिक परिस्थिति, अगदीं भिन्न आहे. लो० टिळकानीं 'केसरी' साठीं – केसरींतील प्रतिपादित विधानासाठीं – कारावास सोसला, म्हणून केसरीची किंमत चढली ही गोष्ट खोटी नव्हे. घोषबंधूंनीं 'अमृत बझार पत्रिके' साठीं लागोपाठ बलिदान केलें, त्यामुळें अमृत बझार पत्रिकेचें वजन वाढलें नाहीं, असें मुळींच म्हणतां येत नाहीं. त्याच विचारानुसार, एखादा पत्रपटु आपणास संमत असलेल्या तत्त्वासाठीं – आपण प्रतिपादिलेल्या शिकविणीसाठीं – तुरुंगात गेला वा अन्य प्रकारें त्यानें कष्ट सोसले, तर त्या पत्राचा बोज हटकून वाढतो. याचें कारण वेगळें शोधण्याची जरूरीच काय ? असें असता, पत्रपंडितांनीं धावत्या राजकारणापासून अलिप्त रहावें, त्यांत प्रत्यक्ष भाग घेऊं नये, अशी

शिकवण देणें, म्हणजे त्याच्या कर्तबगारीचे पंख तोडण्यास शिकविण्या-सारखेंच आहे.

परंतु सार्वजनिक कार्यांत पडावें, याचा अर्थ पत्रपंडितानीं आपल्या अंगीकृत कार्यांत चुकारपणा करावा असा नव्हे. स्वतःच्या भावनांचें समाधान करण्यासाठीं कार्यांत भाग तर घ्यावयाचा; पण लोकशिक्षणाचें, लोकांना मार्गदर्शविण्याचें, किंवा लोकसेवेचें व्रत मात्र सोडावयाचें नाहीं, ही खूणगाठ पक्की बांधलेली असावी. कारण एकट्या सैनिकापेक्षां सहस्रावधि लढवय्यांस युद्धास उद्युक्त करणाऱ्या सेनापतींची किंमत केव्हांही अधिक ठरेल. तद्वत् आपलें पत्रपांडित्याचें काम हें केव्हांही अधिक महत्त्वाचें असल्यानें तिकडे दुर्लक्ष न करतां, स्वतःच्या समाधानासाठीं, थोडेसें 'विषयान्तर' झालें तर होऊं द्यावे, ही तडजोड कुणालाही पटेल. मात्र तिचा आधार घेऊन चुकारपणा बोकाळूं देऊं नये.

वेगळ्याच एका कारणासाठीं पत्रपंडितांना बाहेरची हवा – मग ती कुठलीही असो – खावयास पाठविणें इष्ट व आवश्यक असते. संपादकीय खुर्चीबरोबरच चारी भिंतींचें वेष्टन येतें आणि रोजच्या कामापायीं कचेरींत काम करणारांची विचारशक्ति स्थिरावते; त्यांच्या बुद्धीला नाविन्य असें खपत नाहीं; परंपरेचा सांप्रदायी अभिमान त्यांच्यात बळावतो; दृष्टि–संकोच होतो......आणि बदलत्या बाह्य जगाशीं त्यांची फारकत झाल्याप्रमाणें ते वाटतात. नवजवानाशीं त्यांचा मतभेद होतो; संपादकीय शाखेशीं तद्रूप झालेल्यातच तें वर्तमानपत्र खपतें. वृत्तपत्रीय कामगिरीचा हा मोठा दोष आहे खरा. पण तो अंगीं मुरूं न देणाराच ह्या कार्यांत पुढें येतो. आणि नवें वारें आपल्या कार्यालयात खेळावें, बाह्य जगाशीं आपल्या पत्रपटूंचा वारंवार संबंध यावा, म्हणूनच 'खास' बातमीदार बाहेर पाठवून, संपादक त्यांचा पाठपुरावा करतात. पत्रपांडित्यांत 'व्यावृत्त कौतूहल' झालेल्यांना किंवा 'बुरसलेल्या बुद्धीच्या' मंडळींना वर्तमानपत्रात वाव नसतो. कारण नाविन्य, ताजेपणा, चटकदार लिखाण, ह्याच गोष्टींची वृत्तपत्रकचेरींत अधिक व कायमची मागणी असते.

माझें हें लिखाण वस्तुस्थितीचें निदर्शन करणारें नाहीं, उत्कृष्ट संपादक, उत्कृष्ट पत्रकचेरी, इत्यादि कसें असावें, ह्यासंबंधींच आहे, ही गोष्ट खरी. प्रचलित

परिस्थिती इतकी दोषार्ह आहे – तिचें शुद्ध स्वरूपही इतकें स्पष्ट आहे – कीं आमच्या वर्तमानपत्रानें आणखी वर्णन करण्याची मला तरी आवश्यकता दिसत नाहीं. परंतु मूळ चर्चेच्या मुद्द्यावर यावयाचें म्हणजे, आपलें काम सोडून दुसरीकडे जाण्यापूर्वी – जनसेवेच्या अन्य मार्गांत शिरण्यापूर्वी – पत्रपंडितानें आपल्या ज्ञानाचा, अनुभवाचा, माहितीचा उपयोग दुसऱ्या कोणास तरी करून दिला पाहिजे. आपल्या तालमींत तयार झालेला पत्रपटू, असा अभिमान त्याला असावयास हवा. कारण पत्रपाडित्याची शिकवण प्रत्यक्ष कार्यालयांत मिळते, तशी अन्यत्र कुठेंही मिळावयाची नाहीं. आपलें ज्ञान, आपली विद्या, आपलें शहाणपण हें कोणा ना कोणाजवळ तरी रहावें, अशी इच्छा निसर्गतःच प्रत्येक प्राणिमात्रात असते. आणि तशी ती असली तरच ती खरी विद्या असें समजावें, असेंही मी म्हणेन.

संपादकीय मंडळी तयार करण्याची संपादकांची खटपट असावी ह्यात नवीन असें कांहींच नाहीं असें कित्येकांना वाटेल. परंतु अशी मुद्दाम निवडून तयार केलेली मंडळी सध्यां फारच थोडी आढळतात हें खरें. जो तो आपला म्हशीचें शेपूट धरून म्हणा, किंवा ‘ भोपळा ’ बांधून घेऊन म्हणा, पाण्यांत पडला व मग स्वतःच्या धडपडण्यानें पोहावयास शिकला, अशीच बहुतेकाची गोष्ट आहे. संपादकाची नजर घारीसारखी तीक्ष्ण असून त्यानें होतकरू माणसें वाया दवडतां कामा नयेत. बातमी मिळविण्याची व खबरबात सांगण्याची कांहीं कांहीं जणांना जन्मतःचीच ‘ खोड ’ असते. तिचा योग्य उपयोग करून घेणें, अशा मंडळींना कामाला लावणें, हीच संपादनांतील मुख्य कामगिरी म्हणतां येईल. योग्य वाव न मिळाल्यास अशा ( कम्युनिकेटिव्ह ) प्रवृत्तीची मंडळी वायां जातात, नव्हे, स्वजनद्रोही बनतात, हें कोणाही विचारवन्ताला कबूल करावें लागेल. आणि मग ह्याचें खापर संपादकांच्या डोक्यावर फुटलें तर त्यांत वावगें काय ? समाजांतील सर्व घटकांचा संभाळ करण्याचें, त्यांना बरेंवाईट वळण लावण्याचें काम पुढाऱ्यांवर आपोआपच येतें. तेव्हा वर्तमानपत्राच्या संपादकास किती जागरूकतेनें पहावें लागतें, त्याची नजर किती शोधक व भेदकही असावयास हवी, याची कल्पना येईल.

संपादकीय अधिकारासंबंधींचें हें प्रवचन बातमीदाराच्या प्रस्तावांत कां आलें असें कोडें पडण्याचें कारण नाहीं. बातमीदाराचें काम नीटपणें करीत राहिल्यास संपादकीय खुर्ची कांहीं दूर नसते. आणि बातमीदार असल्यापासूनच संपादकीय कामगिरीसाठीं लागणारे सर्व गुण कसे संपादन करतां येतील, हें कळावयास नको कसें ? म्हणूनच ह्या प्रवचनाची आवश्यकता. असो.

बातमीदाराला आर्थिक लाभ कसा होतो व संपादकाशीं आपले वेतन त्यानें कसें ठरवून घ्यावें, ह्या व्यवहारी बाबींची चर्चा मी येथें मुद्दामच केली नाहीं. लेखनावर उपजीविका करतां येते ही गोष्ट मानण्यासच संपादक तयार नाहींत. आणि कुणीकडून तरी आपलें लिखाण वर्तमानपत्रांत झळकूं द्या ह्या इच्छेनें हपापलेले लेखक आमच्यांत पुष्कळ आहेत. म्हणून, फुकटांत – फार तर नांवाला कांहीं तरी मोबदला देऊन – सर्व मजकूर पदरांत पाडण्याची युक्ति इकडील संपादकांना साधली आहे. पण ही स्थिती कायमची नव्हे. खऱ्या लेखकाला या पत्रपांडित्यावर – शिलेदारी (free lance) – करूनसुद्धां पोट भरतां येते. हा व्यावहारिक भाग मी या चर्चेंत आणला नाहीं.

झालें इतकें 'ईशस्तवन' पुरें झालें. हा विषय काय, लांबवावा तितका लांबेल. आणि माझ्या अल्प समजुतीप्रमाणें त्यांत आणखीही पुष्कळ लिहिता येईल. माझ्या ज्ञानाची परिमिती मला ठाऊक असल्यानें 'यथाशक्ति यथामति' साधलें तेवढें मी केलें. त्यांत भर घालण्यास, मराठी भाषेंत या दालनाची शोभा वाढविण्यास, पुष्कळच रथी, महारथी आहेत, त्यांनीं पुढें सरसावलें पाहिजे. आणि त्यांना तसें सरसावण्याची इच्छा ह्या माझ्या प्रथम प्रयत्नामुळें झाली तरी पुष्कळच कार्य होईल.

श्री. रा. टि.

## प्रकरण पहिलें

# वर्तमानपत्र

पृथ्वीवर सत्ता अशी कोणाची चालते ? आणि सध्या सर्वांत अधिक सामर्थ्यवान् कोणाला म्हणावें ?

पंचमहाभूतांची ? तेजाची ? वाटेंत येईल त्याचें भस्म करीत सुटणाऱ्या अग्नीची ? कां अग्नीला विझवून सर्व पृथ्वीवर अगाध संचय करणाऱ्या जलाची ?

पण पंचमहाभूतांना मनुष्यानें अगदीं मुठींत नाहीं का आणलें ? मग मनुष्यांत श्रेष्ठ कोण ? सगळ्यावर हुकमत चालविणारा कोण आहे ?

राजा ? सम्राट ? लोकशाहीचा पुरस्कर्ता ? पंचमजॉर्ज ? ज्यांच्या साम्राज्यावर सूर्य कधींही मावळत नाहीं, पण ज्याचा व्यवहार मात्र दिवसा दिवे लावावे लागतात अशा अंधाऱ्या खोलींतून चालतो, अशा ब्रिटिश साम्राज्याचे सम्राट पंचम जॉर्ज हे सर्वांत अधिक बलवान् मानायचे ? परंतु कायद्यानें व रूढीनेंही त्यांना अगदींच दुबळें बनवून ठेविलें आहे. "A King of England can do no wrong"—शिवाय आजकालचें युग लोकशाहीचें आहे. अमेरिकेच्या हातांत इंग्लंडची वेसण आहे.

मग काय अमेरिका सर्वश्रेष्ठ ? कां इटली ? फ्रान्स ? जर्मनी ? रशिया ? म्हणजे पर्यायानें प्रे० रूझवेल्ट, मुसोलिनी, हिटलर शहा, किंवा स्टॅलिन यांच्यातला कोणी तरी सर्व शक्तिमान मानावयाचा कीं काय ?

पण या सर्वांची शक्ति अगदींच मर्यादित आहे. ती पाशवी वृत्तींवर – दारूगोळ्यावर किंवा माणसांचा फन्ना उडविण्याच्या साधनसामुग्रीवर – अधिष्ठित

असल्यानें त्यांना सामर्थ्यशाली म्हणता येणार नाहीं. आणि सामर्थ्याचें हेंच गमक असेल तर मग हजारों, लाखों जिवाचा बळी अल्पावधींत घेणारे परंतु अद्याप माणसांच्या कचाटींत न सांपडलेले प्लेग, इन्फ्लुएंझा, कॉलरा, देवी इत्यादि रोग आहेतच. त्यांना कां सर्वबलशाली मानूं नये ?

बरोबर, श्रीकृष्ण भगवान्, झरतुष्ट्र येशू ख्रिस्त, भगवान् बुद्ध, पैगंबर महमद....असे थोर पुरुषच श्रेष्ठ होत. कारण ते इहलोकींचें वास्तव्य संपवून परलोकवासी झाले तरी त्यांचा पगडा जनमनावर अद्यापि आहेच ! खरेंच, हे धर्मसंस्थापकच सर्वश्रेष्ठ म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं.

हरकत नाहीं कशी ? त्यांनीं लोकांवर ताबा चालविला नाहीं. ते हयात असतां लोकांनीं त्यांना इतकें कुठें मानिलें ? त्यांच्या पश्चातच त्यांची महति अशी वाढली. आणि मुख्य हरकत ही कीं, लोक आपण होऊनच त्यांच्यामागें लागले. तेव्हां धर्मसंस्थापकांना सर्वांत अधिक सामर्थवान् मानायला जागा नाहीं.

चतुरंगबली राजाही श्रेष्ठ नाहीं. कीर्तिरूपानें चिरकालपर्यंत राहणारा धर्मगुरू — संस्थापकही मोठा मानावयाचा नाहीं. तर पंचांग बलवान् ज्योतिष्याला श्रेष्ठ म्हणायचें ? कारण तो पृथ्वीवर राहून आकाशांतील ताऱ्यांचें गणित करतो ! छट्.

पृथ्वीवरचाच प्राणी — पृथ्वीवरच राहतो — हुकमत ही पृथ्वीवरच चालवितो, तो चतुरंगी नाहीं किंवा पंचांगीहि नाहीं; आपला एकच रंग त्याला ठाऊक आहे. मात्र त्याची सत्ता किती याचा अंदाज करतां यावयाचा नाहीं. त्याचें साम्राज्य रघु, शिकंदर, बाबर, नेपोलियन अशांच्यापेक्षांही मोठें आहे. तो लोकांना जिंकतो पण लढाई न करतां. चढाई करतो पण रक्तपात न करतां. सर्वांवर सत्ता चालवितो पण सहसा दृष्टीस पडत नाहीं. त्याजजवळ मुकुट नाहीं, प्राणघातक शस्त्रें नाहींत......असें त्याचें वर्णन किती म्हणून करावें ? ओळखतो का हा असा कोण तो ? **सं पा द क.**

त्याचें एकच हत्यार. **व र्त मा न प त्र.** शिशाच्या टाइपांनीं काळ्या शाईनें पांढऱ्या कागदावर छापलेला हा चिठोरा किती पराक्रमी आहे याची कल्पना यावयाची नाहीं. वर्तमानपत्रांचा प्रवेश जगाच्या सांदीकोंदींतून होतो. आंधळ्यांना तें डोळस करतें. बहिरटांना त्यांतील मर्म ऐकूं येतें. अज्ञानी जनतेला

सज्ञान बनविण्याचें सामर्थ्य त्यांत आहे. कुठल्याही कृत्याचें भडक वर्णन करून वाटेल त्या राष्ट्राविरुद्ध कोणत्याहि देशाला चिथवून युद्धाला उद्युक्त करतां येतें, सर्व जगाची आहुति पडेल असा लढाईचा वणवा पेटवून वर्षानुवर्षें तो तेवत ठेवणें त्यांना शक्य असतें. तसेंच युद्ध करणें अन्याय्य ठरवून जगभर शांति प्रस्थापित करणे हेंही त्यांना अल्पायासानें साधतें. एकाद्या व्यक्तीचे देव्हारे माजवून सर्व जगाला त्या थोर महात्म्याच्या पायाशीं नमविणें किंवा प्रबल शक्तीच्या राष्ट्रावर गजहब उडवून त्याचा कोंडमारा करून त्याला दीन गाय बनविणें या बाबी वर्तमानपत्रें फारच सफाईनें करतात. आणखी किती तरी अशा कर्तबगारीचीं उदाहरणें देतां येतील.......

मग संपादकाचें – वर्तमान पत्राचें – सामर्थ्य नाकबूल करणार काय ? कोणी मानो अथवा न मानो, तें सामर्थ्य, ती सत्ता, तो अधिकार संपादकीय खुर्चीत अधिष्ठित आहे खरा. मात्र सर्वांनाच तो लाभतो असें नाहीं.

* * *

वर्तमान पत्रांचें महत्त्व आमच्याकडे अद्याप नीटसें कोणी ओळखलेलें दिसत नाहीं. पुराणांत किंवा वेदांत वर्तमानपत्राचा उल्लेख नाहीं एवढ्यावरूनच आधुनिक जगांतली ही ऐहिक सुधारणा – यांत्रिक युगांतली सुधारणा – त्याज्य आहे, निदान तिची इतकीशी मातब्बरी नाहीं, अशीच बहुतेकांची कल्पना असावी. परंतु वर्तमानपत्रें काय करामत करतात किंवा त्यांच्या आंगीं कसली शक्ति असणार ? असे बेपरवाइचे उद्गार वाटेल त्यानें काढावेत. त्यामुळें त्या वर्तमानपत्रांचें महत्त्व किंवा त्यांच्या आंगची शक्ति रतिभरसुद्धां कमी होणार नाहीं.

वर्तमानपत्रांचा प्रसार फक्त साक्षर, शिक्षित लोकांतच होणार, तेव्हां त्यांची थोरवी हिंदुस्थानांत तरी कशी कळेल ? अशी शंका वरपांगीं रास्त वाटते. परंतु त्याला योग्य उत्तर म्हणून इतकेंच सांगावयाचें कीं, अमानुल्लाच्या पश्चात् अफगाणिस्थानांत बंडाळी माजली ती शांत करून केवळ मुत्सद्देगिरीच्या धोरणा-वर नादिरशहानें काबूलचें सिंहासन मिळविलें तें सुद्धां वर्तमानपत्राच्या सहाय्यानेंच. अफगाण रानटी टोळ्या अगदीं मागासलेल्या, त्यांना अक्षरओळख कुठली असणार, अशा काल्पनिक अडचणींनीं नादिरशहा भेदरला नाहीं. त्यानें सायक्लो

स्टाइल आणवून ‘ इस्लाह ’ नामक पत्र चालू केलें व केवळ त्याच्या जोरावर तो यशस्वी झाला आणि काबूलचा अमीर बनला. ही गोष्ट आता सर्वांसच ठाऊक आहे.

युरोपांतील महायुद्ध पेटाविण्यांत आणि एकदां पेटलेला वणवा सारखा जळत ठेवण्यांत दोन्हीं पक्षाच्या वर्तमानपत्रांनींच सर्व मेहनत घेतली ती कशी, हें पटवून देणारीं पुस्तकें आतां अधिकृतरीत्या प्रसिद्ध होत आहेत. शिवाय तुर्कस्थान, इटली, अमेरिका, वगैरे राष्ट्रें युद्धांत कां ओढलीं गेलीं याचा इतिहास पाहिल्यास वर्तमानपत्रांनाच बहुतेक श्रेयाचा वाटा द्यावा लागेल. राष्ट्रसंघाचें किंवा जागतिक शाततेचें स्तोम आज माजलेले दिसतें. तें कुणीं माजविलें असा विचार केला तर पुनः वर्तमानपत्रांकडेच अंगुलीनिर्देश करावा लागेल. जागतिक महत्त्वाच्या ह्या घडामोडी सोडून अगदीं पायाजवळच्या साध्या गोष्टींकडे पाहिलें तर काय आढळतें ? महात्मा गांधींची महति, त्यांचे-विषयीं सर्वत्र वसत असलेला पूज्यभाव, जनमनावर त्यांचा दाब, स्वदेशी-बहिष्काराची चळवळ, क्रिकेटपटूंचें क्रीडानैपुण्य, व्यापाऱ्यांच्या खरेदीविक्रीच्या उलाढाली, शेतकऱ्यांची दैना, सेवासदन किंवा कर्वे युनिव्हर्सिटी यांचें कार्य, खुशालचेंडूंना सायंकाळची करमणूक, बंगाल्यांतील क्रांतिकारकांचीं कृत्यें, पंजाबांतील उन्हाळा, अलाहाबाद हायकोर्टांतील अपीलें, गिरणी कामगाराची मजुरी, स्त्रियांनीं वापरावयाचे कपडे व मुद्रारंग साहित्य, फार काय अस्पृश्याची हलाखी, त्यांचा उद्धार करण्याची आवश्यकता, सनातन धर्माचें स्वरूप, अस्पृश्यांना अस्पृश्यच ठेवण्याची जरूरी असे परस्परविरोधी प्रश्न, पंचांग-संशोधन, शिवजन्मतिथीचा वाद, या व असल्या विविध विषयांचा वर्तमान-पत्रांशीं किती निकटचा संबंध आहे याचा क्षणभरच विचार करावा म्हणजे वर्तमानपत्रांच्या कर्तबगारीची कल्पना तरी येईल. किंवा असाही विचार करावा कीं वर्तमानपत्रें नसतीं तर काय झालें असतें ? गांधींचा थोरपणा इतका वाढला असता ? स्वदेशीची चळवळ इतकी जोराची झाली असती ? बहि-ष्काराची मिरची अशी झोंबली असती ? अस्पृश्योद्धाराचें कार्य अशा झपा-ट्यानें घडलें असतें ? मजुरांची हलाखी कळली असती ?......असे पुष्कळच प्रश्न आहेत. केवळ वर्तमानपत्रांचा आश्रय त्यांना मिळाला म्हणूनच ते प्रश्न प्रामुख्यानें पुढें आले.

आणखीही दुसरा पुरावा पहा. महात्मा गांधींना कांहीं विचार लोकांपुढें मांडावयाचे होते. त्यांनीं तीन वर्तमानपत्रें चालविलीं. तुरुंगांतून अस्पृश्यता निवारणाचें कार्य साधावयाचें होतें. ताबडतोब एक इंग्रजी व एक हिंदी वर्तमानपत्र काढलें. याच्या आधीं लोकमान्य टिळक, सर फेरोझशहा मेहता, देशबंधु दास, वगैरेनींही वर्तमानपत्रें हातीं ठेविलींच होतीं ना ? केवळ राजकारणासाठींच वर्तमानपत्रांचा जन्म आहे असें नव्हे. प्रि. आगरकरांना सामाजिक सुधारणा घडवून आणावयाच्या होत्या, त्यांनीं केसरी सोडून "सुधारक" काढलाच कीं नाहीं ? ज्योतिषशास्त्राची, उद्योगधंद्याची, शेतकीचीं, शिवणकलेचीं, व्यायामाचीं, वैद्यकाचीं, सनातन धर्माचीं अशीं शाखोपशाखांची सुद्धां नियतकालिकें चालू आहेतच. इतकेंही नको, उद्योग धंद्याला वाहून घेतलेल्या किर्लोस्कर बंधूंनाही दोन (तीन) मासिकें चालविण्याचा मोह झाला तो कशासाठीं ? आणि त्याचें कारण काय ?

उत्तर सोपें आहे आणि तें उघडही आहे. वर्तमानपत्र किंवा नियतकालिक ही एक अजब शक्ति आहे व तिचा नियंता संपादक ही एक बहुमानाची जागा आहे. म्हणून कुठलेंही कार्य साधावयाचें असो, वर्तमानपत्राची मदत घेतल्याविना भागणार नाहीं, हें नक्की समजावें.

दुसऱ्याच एका दृष्टीनें वर्तमानपत्रांच्या कर्तबगारीचा विचार केला पाहिजे. छत्रचामरदंड मुकुटधारी राजापेक्षां वर्तमानपत्राचा संपादक श्रेष्ठ कसा ? तर राजाची सत्ता मर्यादित असते, ती दंडावर अधिष्ठित आ॑. लोकांना तिचा अव्हेर करतां येतो. राजाचे हस्तक पगारी असतात. उलट वर्तमानपत्रें पहा. कोणाला नकळत ते जनमनावर आपला पगडा बसवितात. त्यांना दंड अथवा मुकुट नसतांही त्यांची सत्ता सर्वत्र चालते. जिथें राजशासनाची कांहींच खूण नाहीं अशा ठिकाणीं सुद्धां वर्तमानपत्रांचा अधिकार गाजत असतो राजा हा समाजाच्या आवश्यक घटकापैकीं नाहीं. पण वर्तमानपत्र मात्र रोजच्या अत्यावश्यक गोष्टीपैकीं एक आहे. राजसत्तेचा प्रसार पगारी नोकराकरवीं होतो. वर्तमानपत्राची हुकमत आपणांवर चालावी म्हणून जनता पैसे देऊन तीं विकत घेते. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे राजसत्तेचें अस्तित्वही वर्तमानपत्रांवर अवलंबून असतें. राजसत्ता तर बोलून चालून सर्व शक्तिमान्. तिनें वर्तमानपत्रें चालूंच

दिलीं नाहींत तर त्यांत आश्चर्य नाहीं. परंतु वर्तमानपत्रांना भिऊन त्यांना दडपून टाकणें यांतच त्या कागदी चिठोऱ्याच्या सामर्थ्याची अप्रत्यक्ष कबुली नाहीं का ? असो.

परमेश्वराचे वर्णन असें करतात की " स्थिरचर व्यापुनि अवघा तो परमात्मा दशांगुळें उरला. " आजच्या आपल्या जीवनक्रमांत वर्तमानपत्राचें स्थान पाहिल्यास तोच अनुभव येतो. वर्तमानपत्राचा प्रसार कोठें आणि कसा व का होतो आणि त्यांची कामगिरी किती महत्त्वाची असते, याचें प्रत्यंतर मिळणें कठीण आहे. कारण आपल्या नित्य व्यवसायातील कोणत्या गोष्टी वर्तमानपत्रावर अवलंबून असतात असा प्रश्न विचारल्यास, कोणत्या नसतात ? अशा परत प्रश्नानेंच त्याचा जबाब देतां येतो. अजूनही आपल्याकडे कुठल्याही मंगल कार्यारंभीं अथवा मोठें कृत्य सुरू करण्यापूर्वी गणपतीची पूजा करण्याचा प्रघात आहे. बदलत्या मनूंत गणपतीला तो मान दिला नाहीं तरी चालेल एक वेळ, पण वर्तमानपत्राचें स्मरण प्रथम झालें पाहिजे, त्यांना योग्य तो मान दिला पाहिजे, म्हणजे सगळा कार्यक्रम सुरळीत चालतो, हा व्यवहारी पुरुषांना पटलेला सिद्धांत आहे. त्याचें कारण फक्त एकच. वर्तमानपत्राचा वाढता व्याप व व्यापाबरोबर वाढणारें कार्यक्षेत्र किंवा राजकारणी भाषेंत बोलावयाचें तर त्याचें दिवसेंदिवस वाढणारें साम्राज्य असें म्हणावें. लोकमताला अधिकाधिक मान्यता मिळूं लागली, तसतसें लोकमत बनविणारेही वाढत चालले आणि जन-मन-गण-अधिनायक असा परमेश्वर अलीकडे आपला अधिकार संपादकाच्या हवालीं करून ' पेन्शन ' घेऊन वैकुंठांत अथवा क्षीरोदधींत जाऊन विश्रांति घेत बसला असावा.

जनतेवर न कळत ताबा चालविण्याचें हें साधन दुहेरी आहे. म्हणजे पाहिजे तर त्याचा उपयोग चांगल्या कार्यासाठीं करा किंवा व्यसनें वाढविण्यास करा. त्याला हरकत अशी कोणाचीच नाहीं. परंतु कोणत्याही प्रकारें वर्तमानपत्रां-कडून इष्ट ती कामगिरी करून घ्यावयाची असल्यास संपादक वाकब असावा लागतो. आणि वर्तमानपत्राचें वर्चस्व, वजन, दाब, पगडा काय पाहिजे तें म्हणा, सर्वस्वी संपादकावर अवलंबून असतें. संपादकीय व्यवसाय हा सध्या तरी अत्यंत मानाचा, अधिक शिष्टसंमत व स्वतंत्र असा ' **धंदा** ' आहे. धंदा म्हटलें कीं

लगेच त्यास थोडासा कमीपणाचा व भाडोत्रीवृत्तीचा वास येतो. तो संपादकीय कार्यास नसतो. ‘ व्यवसाय ’ म्हणूनही त्या कामगिरीस संबोधितां येत नाहीं. ‘ पेशा ’ म्हणतां येत नाहीं. ‘ व्यापार’ म्हटल्यास त्याचा मोठेपणा नीटपणें स्पष्ट होत नाहीं. संपादकीय ‘ कला ’ देखील नव्हे. रोजगारासाठीं पाहिजेलें तें करणारे कामगार सध्यां वृत्तव्यवसायांत पुष्कळ दिसले तरी पत्रपांडित्य हें या सर्वांपेक्षां उच्च दर्जाचें खास आहे. शुद्ध धर्मगुरूला किंवा धर्मोपदेशकाला असतो तो मान तर पत्रकाराला असतोच; पण त्याहून अधिक आदर, जास्त मोठेपणा, विशेष विद्वत्ता संपादकाची असते आणि म्हणून वर निरनिराळे लोकांना गुंतवून ठेवणारे मार्ग सांगितले, त्यापेक्षां सर्वांत वरचढ अशी जागा संपादकीय मंडळीसाठीं समाजांत राखून ठेवतात. मात्र त्या स्थानाचा, त्या उच्च पदवीचा दुरुपयोग करणारा, इतर लबाडया करणारांचे मानानें अधिक दंडय ठरतो हें ओघानेंच येतें. धर्मोपदेशकानें नीतिबाह्य वर्तन केलें किंवा वकिलानेंच खोटे पुरावे तयार केले, तर हीं कृत्यें करणारे अधिक शिक्षेस पात्र होतात. तद्वत् वर्तमानपत्रांचें अपेक्षित कार्य न करता त्या बहुमानाच्या व जबाबदारीच्या जागेचा दुरुपयोग होऊं लागला कीं अधिक तीव्र शिक्षा व्हावयास हवी.

परंतु वस्तुस्थिती तशी नाहीं. संपादकावर पडणारी जबाबदारी कोणी कायद्यानें त्याजवर लादली नसल्यानें – किंबहुना स्वयंस्फूर्तीनेंच ती स्वीकारतात म्हणून तिची थोरवी अधिक – तिचा दुरुपयोग केल्यास संपादकाला दंड करणार कोण? संपादकीय स्थान विशेष आदराचें असल्यानें त्या मार्गांत मोहिनी पाडणारे मोह हे असावयाचेच. बाकी मोह मोह तरी कसले म्हणा ? एकच महामोह आहे. आणि तो म्हणजे संपादकीय लेखणी विटाळूं न देण्याचा. व्यक्तिशः निर्भीड असणारीं माणसें संपादकीय खुर्चीत बसलीं कीं बदलतात, हें ठीक नव्हे. निःस्पृहता, सचोटी, प्रामाणिकपणा, इत्यादि गुणांना व्यवहारांत जितका मान मिळतो तितकाच – किंवा कांकणभर अधिकच – वृत्तपत्रव्यवसायांत मिळतो. विद्वत्ता, बहुश्रुतता, विशालदृष्टि, समयसूचकता. ह्याही गुणांशिवाय संपादकीय स्थानाला पूर्तता येत नाहीं. थोडक्यात सांगावयाचें तर व्यावहारिक दृष्टांत घेऊन असें म्हणतां येईल कीं सर्वांत हुशार, चलाख, बुद्धिमान अशा

मुलाला आय. सी. एस्. ला पाठवितात. तसाच पण धनाची आशा फारशी नसणारा विद्यार्थी संपादकीय जागेला योग्य समजावा.

एवढयावरून संपादकीय व्यवसायांत आर्थिक फायदा मुळींच नसतो असें समजूं नये. किंवा उपरीनिर्दिष्ट गुण अंगीं असले कीं झालें, उत्तम संपादक होतां येतें, अशी कल्पना करून घेण्याचेंही कारण नाहीं. द्रव्यलाभासाठींच वृत्तपत्रांत शिरणारा कधींच यशस्वी संपादक होत नाहीं. पैसा मिळविण्यास त्यांत वाव पुष्कळ आहे. पण तसें केल्यानें संपादकीय बहुमान जाऊन तो मनुष्य लुटारू, दरवडेखोर याच्या संभावित वर्गांत पडतो. परंतु केवळ संपादकीय वर्चस्वाला भुलूनच या कार्यांत पडावयाचें असल्यास लक्ष्मीचा अव्हेर करण्याची जबर शक्ति अंगीं हवी. आणि लेखणी पण हुकमी पाहिजे. "माझी विचार-शृंखला तुटली"—"आतां कांहीं सुचत नाहीं"—"पुरेशी माहिती हातीं आलीं नाहीं"—"पुनः केव्हा तरी पाहूं" अशा सबबी वाटेल त्या कचेरींत चालल्या, तरी वर्तमानपत्रांच्या कार्यालयांत क्षणभर टिकत नाहींत. सर्वांना सुटी असली, हरताळ पडल्यानें आहारगृहेंही बंद असलीं, तरी एकवेळ चालेल. परंतु वर्तमानपत्रें बंद असून भागत नाहीं. मोठा देशभक्त स्वर्गवासी झाला – ठेवा दुकानें बंद, शाळा कॉलेजांत हरताळ पाडा, उपवास करा – पण लगेच वर्तमानपत्र घ्या आणि त्याच्या मृत्यूची, स्मशान यात्रेची, ठिकठिकाणच्या दुखवटयाच्या सभांची हकीकत वाचा ! हा कार्यक्रम सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करणारास वर्तमानपत्रांचें महत्त्व कळतें. रविवारीं 'सुटी' सगळयांनीं घ्यावयाची पण त्या दिवशींच वाचायला वर्तमानपत्रें सर्वांत अधिक खपतात. हें सर्व सांगितलें तें अशासाठी कीं, वर्तमानपत्राना कधीं सुटी म्हणून नसते. त्याचें काम अव्याहत चालणारें आहे. मजुरांचा संप, रेल्वेचा संप, फार काय पोस्ट-मनांचा संप हे एकवेळ नडणार नाहींत. पण वर्तमानपत्रांचा संप फार नडेल. इतकेंच काय परंतु कोणताही संप करविणें किंवा केलेला चालू ठेवणें अथवा ताबडतोब मोडणें हें फक्त वर्तमानपत्रांनाच साधेल. इतराना नाहीं.

मग अशा अविरत चालणाऱ्या यंत्रचक्रांत लेखणी हुकमी असलीच पाहिजे. हातीं आलेल्या मजकुरावर दहा मिनिटांत ५०० शब्दांत टीका पाहिजे. त्याचे दूरवर होणारे परिणाम तेथल्या तेथें चार भिंतीच्या खोलींत बसून समजले

पाहिजेत. आणि पुनः मजकूर अमुक शब्दांत संपलाच पाहिजे. अशीही कोंडी असते. वर्तमानपत्रांच्या कचेरींत वरचेवर चाललेली गडबड म्हणजे "जलदी," "तावडतोब" ही व दुसरी "कमी करा" "आणखी थोडें कापा" असली. बरें, शांतपणा मिळेल म्हणावें तर तेंही नाहीं. वरचेवर कोणी ना कोणी बातम्या घेऊन येतच असतो; यंत्राची घरघर चालूच असते; प्रुफांची जा – ये धादल होतच राहते; "मजकूर मजकूर" म्हणून मागणी जुळारी करीतच असतो; घड्याळाचा कांटा आटपा आटपा म्हणतच राहतो.........अशा सर्वांगीण गडबडींत डोकें शांत राखतां आलें पाहिजे; सर्व व्यवधानें संभाळलीं पाहिजेत; तरच मग वृत्तव्यवसाय साधेल. आणि इतकेंही करून पैसा पहावा तर तोही तथातथाच. तेव्हां पडा कशाला या भानगडींत ? अशी वृत्ती बहुतेकांची होते. व तें ठीकच. कारण त्यांच्या हातून विशेष कामगिरी या क्षेत्रांत होण्यासारखी नसते.

परंतु नानारत्ना वसुंधरेंत संपादकीय व्यवसायाकडे आकर्षिले जाणारे असे कांहीं हरीचे लाल असतातच. सर्व अडचणी, त्रास, मेहनत ठाऊक असूनही ते मुद्रणयंत्राच्या घरघरण्याकडे अचूक ओढले जातात, आणि शेवटपर्यंत तेथेंच चिकटून राहतात. त्यांना त्या अडचणींचा त्रास मुळींच वाटत नाहीं. काळ्या शाईचें पीप पाहिलें म्हणजे त्यांच्या टांकाला स्फूर्ति चढते. यंत्राची भिरभिर कानावर पडूं लागल्याबरोबर, लष्करी संगीताच्या तालावर 'लेफ्ट राईट' करीत जाणाऱ्या शिपायाप्रमाणें त्याच्या लिखाणाचा ओघ सारखा पुढें धांवतो. तारा आल्या, मध्येंच बातम्या मिळाल्या, प्रुफें पुढें पडलीं, 'मजकूर' म्हणून ओरड झाली, कीं त्या सर्वांचें त्याला भय असें वाटत नाहीं. उलट निर्मितीच्या आनंदाचें स्मित त्याच्या मुद्रेवर सारखे – तो एकटा असला तरी – झळकत राहतें.

अशा या पेशाला योग्य माणसें जात्याच कांहीं गुणांनीं युक्त असावीं लागतात. त्यांना शिक्षणाची आवश्यकता नसते असें नाहीं. परंतु मुळातच 'तो गुण' नसेल तर मग कितीही शिकवणीचे समुद्र ओतले तरी पालथ्या कुंभाप्रमाणेंच ते राहणार. हें कदाचित् अगदींच ठराविक सांच्यातलें प्रत्येक परंपरेचें किंवा प्रत्येक धंद्यांतील ब्रुवाचें दर्पपूर्ण म्हणणें आहे असें वाटण्याचा

संभव बराच दिसतो. परंतु काहीं प्रत्यक्ष उदाहरणें देऊन तें सिद्ध करतां येईल. जातीचा पत्रपंडित एकदां ह्या व्यवसायांत पडला म्हणजे त्याला इतर कोणत्याही धंद्यात – मग तो कितीही लाभदायक असो – ' राम ' वाटत नाहीं. आणि तो सोडण्याचा विचारही त्याचे मनाला शिवत नाहीं. उलट पक्षीं, पत्रव्यवसायांत शिरलेला इसम वरचेवर पालट करूं लागला कीं समजावें स्वारीची गाडी भलत्याच रुळांवरून घसरली. श्री. न. चि. केळकरांचेंच उदाहरण घ्या. त्यानीं सातारला वकिली चालविली असती तर आज ह्या वयास त्यानीं इतकी मेहनत रोजच्या रोज चालू ठेविली असती? मुळींच नाहीं. आजमितीस त्यानीं आपणांवरील वृत्तपत्राचा बोजा दुसऱ्यांवर टाकला असला, तरी त्याचा वेळ त्या कचेरींतच जातो की नाहीं ? आणि वर्तमानपत्रासाठीं ते अजून लिहितातच ना ? याचा अर्थ दुसरा तिसरा कांहीं नसून केळकर हे अव्वल दर्जाचे पत्रकार असल्यानें त्याना इतर व्यवसायात इतरत्र चैन पडावयाचें नाहीं. तीं यंत्रें, ते कोरे कागद, तें टेबल, ती लेखणी हीं सर्व जशीं काहीं त्याना खेचून नेतात. स्वतः ते थकले आहेत, त्याना विश्रांति पाहिजे, दगदग नको, मेहनत सोसवत नाहीं, सगळें काहीं खरें. पण अंतस्थ उर्मी त्याना वर्तमानपत्राखेरीज इतर कोठेंच जाऊं देत नाहींत त्याची वाट काय ? भगवद्गीतेच्या भाषेंत बोलावयाचें तर

" प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति "

अशा पैकींच त्याचा प्रकार असावा आणि ही प्रकृतीच वृत्तव्यवसायी जनांत आवश्यक आहे. असो.

पत्रकाराची वृत्ति कशी असते हें एकाच उदाहरणावरून कळून येईल. महाराष्ट्रांतसुद्धा ह्या नमुन्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. तशींच रुळ चुकलेला मनुष्यही या धंद्यात शिरून पुनः आपल्या आवडीच्या ठिकाणीं – मात्र धक्के खात खात – गेल्याचीं सुद्धा कांहीं कमी नाहींत. संपादक म्हणून काम करणारे हळु हळू व्यवस्थापकीय शाखेंत शिरतात. किंवा शिक्षणाचें काम पत्करतात, तेव्हां त्यावरून एकच अनुमान निघतें. पत्रकर्त्यांची प्रकृति त्यांचे अंगीं नाहीं. यात कुठलाही कमीपणा मानण्याचें कारण नाहीं.

म्हणून आज वृत्तपत्रव्यवसायांत दिसणारी सर्वच मंडळी त्या जागेला सर्वस्वी पात्र आहेत असें मुळींच नाहीं. वशिल्यानें बरेचसें काम या जगांत

होतें आणि सरकारी खात्यांतही असा गोंधळ पुष्कळ वेळा आढळतो. केवळ पोटार्थी राबणारीं माणसेंहि स्थानमाहात्म्यामुळें वा अन्य कारणामुळें वर्तमानपत्राच्या 'कारखान्यां'त प्रतिष्ठित मानण्याचा प्रघात पडला आहे. कोणालाही मुजेरे वाटेल तितके करावे, मग वाटेल ती जागा मिळण्यास कसली पंचाईत ? प्रश्न इतकाच आहे कीं, खऱ्या पत्रपटूच्या अंगीं कोणकोणते गुण असावे लागतात तें सांगतां सांगता इतके विषयान्तर झालें. असो.

पत्रपांडित्य खरेखुरें अंगीं मुरलें आहे, अशी मंडळी मिळतात कुठें ? ही कलाच मुळीं आपणाकडे अगदी नवीन आहे. शिवाय वृत्तपत्राची वास्तविक शक्ति नीटपणें आकलन व्हावयास पाहिजे अशाना झाली नाहीं असें खेदानें नमूद करावें लागतें. भाडवलवाल्यांनीं त्यांना पैसे पिकविण्याचें साधन मानलें; तात्पुरत्या धावत्या राजकारणांतील चळवळ्यांनीं आपल्या कामासाठीं त्याचा उपयोग करून घेतला किंवा आपल्या मालाची प्रसिद्धी अथवा स्वतःच्या बडेजावीची टिमकी वाजविण्याकरिता वर्तमानपत्राचा आश्रय केला, अशा पैकींच थोडाबहुत प्रकार हल्लीं दिसून येतो. खरें पाहिले तर, युरोपियन व अमेरिकन वर्तमानपत्रांना त्या त्या देशांत जी मान्यता व जे महत्त्व आहे, तें आपणाकडे आढळत नाहीं. याचीं कारणें दोन. परकीय सत्तेखालीं आपण आहोंत हें तर खरेंच. परंतु दुसरें महत्त्वाचें कारण आमचीच आम्हांला कळकळीची, आंतड्याला पीळ पडलेली, जाणीव नाही हेंच. इंग्रजाना वर्तमानपत्राच्या जोरावर आपलें जगभर विस्तारलेलें साम्राज्य टिकवावयाचे आहे. नवीन संपादण्याचेंही त्याचे प्रयत्न चालू आहेतच. त्यांनीं आपलें स्वातंत्र्य टिकविलें तें वर्तमानपत्राच्या सहाय्यावरच, ही काहीं अतिशयोक्तीची बढाई नव्हे. परंतु आपणांसारख्या पराधीन, निरक्षर व इतर जगाच्या मानानें मागासलेल्या देशांत वर्तमानपत्रांचा विशेष उपयोग होण्यासारखा आहे – नव्हे वृत्तपत्राच्या मार्फतच आपणास आपल्या विस्तृत देशांत राजकीय जागृति घडवून आणावयाची आहे; समाजव्यवस्थेंत फेरबदल करावयाचा आहे; साक्षरतेचा प्रसार करून जनतेला शहाणे करून सोडावयाचें आहे; नागरिकत्वाचे हक्क त्यांना समजावून द्यावयाचे आहेत; हिंदुस्थानांत पूर्वी नसलेली एकराष्ट्रीयत्वाची कल्पना रुजवून सर्व प्रांतीयांना एका सूत्रांत गोवावयाचें आहे; एकीनें वागून त्रयस्थाना दूर

ठेवावयाचें आहे.........अशा किती तरी बाबी साध्य करण्यासाठीं वर्तमानपत्रांचाच उपयोग करावा लागेल, यांत दुमत होण्याचें कारण नाहीं.

इतकें विस्तृत व विविध पैलूंचें कार्य वर्तमानपत्रांचा संपादक करूं शकतो हें निर्विवाद आहे. मात्र तो एकाकी नसतो. त्याच्या दिमतीस अनेक मदतनिसांचा ताफा असतो. बातमीदार हा त्यापैकींच एक. ठिकठिकाणच्या बातमीदारांनीं बातमी मिळवावी, नीटपणें लिहून ती वेळेवर संपादकाला मिळेल अशी पाठवावी, इतकें काम बातमीदारांचें. हातीं आलेली बातमी वापरावी कशी व केव्हां हा संपादकीय व्यवसायांतला कार्यभाग. प्रस्तुत पुस्तकांत फक्त बातमीदाराच्या कामगिरीची चर्चा असल्यानें वृत्तपत्राच्या कचेरींत त्याचें स्थान कोणतें आहे तें पाहून मूळ विषयास लगेच प्रारंभ करावा हें ठीक होईल.

"चारचक्षुर्महीपालः" असें राजपुरुषांचें वर्णन आहे. म्हणजे हेर हे राजाचे नेत्रच होत. संपादक स्वतःस एके ठिकाणीं कोंडून घेत असल्यानें व विशेषतः जगांतल्या सर्व ठिकाणची खबर त्याला वाचकांना पुरवावी लागत असल्याने, त्याचे हेर म्हणजे बातमीदार सर्वत्र विखुरलेले हवेत. चीनमध्यें महापूर आला, जर्मनींत बेकारी फार माजली, अमेरिकेंत कापसावर कीड पडली, इंग्लंडमध्यें आगगाड्यांची टक्कर झाली, इराणांत बंडाळी उद्भवली, केनियांत काळ्यागोऱ्यांचा वाद रंगला, गौरीशंकर चढण्यास गेलेले लोक परत फिरले, रशियाला कर्जाची आवश्यकता, एक ना हजार भानगडी जगाच्या ह्या टोंकापासून त्या टोंकापर्यंतच्या प्रत्यहीं वर्तमानपत्रांत येतात. त्या कोणी तरी त्या त्या ठिकाणाहून पाठवीत असलाच पाहिजे हें उघड आहे. त्यांचा विशिष्ट वर्तमानपत्राशीं किंवा बातम्या पुरविणाऱ्या मंडळीशीं प्रत्यक्ष संबंध येऊन अखिल जगभर त्या बातम्या पसरतात. पण तेवढ्यानें बातमीदाराचें काम कमी ठरत नाहीं. तो संपादकाच्याच नव्हे तर तमाम दुनियेच्या डोळ्यांचें काम करतो. जुन्या पुराण्या विराट पुरुषाची कल्पनाच घ्यावयाची असेल तर डोळ्यांच्या ठिकाणीं बसविण्यास फक्त बातमीदारच (ढोबळ अर्थानें वर्तमानपत्र असेंही म्हणतां येईल) लायख ठरेल. मग तो ब्राह्मण, महार, मुसलमान, पारशी, खिस्ती, यहुदी कोणीही असो. बातमीदाराच्या माहितीवर संपादक मल्लीनाथी करणार व बातमीदाराच्याच माहितीवर लोकांची ज्ञानपिपासा तृप्त

होणार. तेव्हां बातमीदार हा कमी लेखण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं. कित्येकांच्या मतें बातमीदाराचा हुद्दा कमी प्रतीचा ठरतो. वृत्तपत्रांच्या कचेरींत काम करीत असलें कीं, त्यांना ' उपसंपादक ' असें उपपद मागें जोडून घेण्याचा मोह होतो. कुठल्याही धंद्यांत कमी अधिक मानाची जागा मानण्याची वृत्ति प्रथमपासूनच होऊं लागली कीं, मग प्रगति खुंटलीच म्हणून समजावें. संपादकाला बातमीदाराचें काम करतां येत नसलें किंवा करण्याची त्याला लाज वाटूं लागली म्हणजे एक रीतीनें नालायकीचें प्रदर्शनच होय. खरें पाहिलें, तर बातमीदारापासूच संपादक चढत जातो. म्हणजे त्याला त्या कामाची पूर्ण माहिती असते आणि म्हणूनच बातमीदाराचें काम करण्यांत कुठलाही कमीपणा वाटत नाहीं. खुद्द संपादकच अशा भावनेनें राहूं लागला म्हणजे इतराना योग्य तो धडा मिळतोच. परंतु बहुतेक लेखकांची चुकीची समजूत झालेली असल्यानें ' संपादकीय ' लिखाणाकडे त्यांचा ( विनाकारण ) ओढा असतो. संपादकाचें काम, सरावलेला बातमीदारच अधिक परिणामकारी करून दाखवितो, हा तर अलिकडे नेहमींचाच अनुभव होऊन राहिला आहे. आणि म्हणूनच नाणावलेले संपादक मुद्दाम बातमीपत्रें लिहितात. एवढयावरूनच ते स्वतःला कमी लेखतात असें मानणें वेडेपणाचें होईल. असो.

वर्तमानपत्रांच्या यंत्रांत सर्वच चक्रें नीट फिरलीं तर उत्तम. नाहीं तर सगळेंच मुसळ केरांत अशापैकीं प्रकार व्हावयाचा. इतर धंदेवाईक धंदे व वर्तमानपत्रांचा धंदा यांत फरक असा आहे:— संपादक व त्याचे सहाय्यक यांना वेळेची मातब्बरी पूर्णपणें कळलेली असावी. ठराविक मुदतींत तयार न झालेला कपडा कमी किंमतीनें विकतां येईल. नासणारें अन्न किंवा खाद्यपदार्थही वेळेवर न बनवितां उशिरा तयार केले तरी एक वेळ खपतील. तोटा सोसावा लागणार नाहीं. पण वर्तमानपत्र वक्तशीरपणानें काढलें नाहीं तर कोऱ्या कागदाइतकीसुद्धां किंमत येणार नाहीं ! कोरा कागद, बातमीदारांचा व संपादकीय शाखेचा पगार, छापण्याची मेहनत व किंमत, असा किती तरी खर्च त्यांसाठीं होत असतो आणि ठराविक वेळ टळली कीं, मग त्याचा कांहीं उपयोग नाहीं. म्हणून वर्तमानपत्र कचेरींतील प्रत्येक घटकावयवास वेळेची विशेष किंमत कळली पाहिजे. गडबड, धांदल, त्वरा, धांवपळ ह्या शब्दांची

आठवण त्या कचेरींतील मनुष्य पाहतांच झाली पाहिजे. रमत गमत काम सावकाशीनें करणारा इसम अशा कचेरींत अगदीं कुचकामाचा ठरेल. कारण वर्तमानपत्रांची आपसांत स्पर्धा चालू असते ती आधीं कोण बातमी मिळवितो, आधीं कोण संपादकाला वर्दी देतो, आधीं कोण छापून वर्तमानपत्र तयार करतो अशा **आधीं आधींचीच** हें लक्षांत ठेवावें.

बातमीदाराला जगाचे डोळे म्हणून काम करावयाचें असल्यानें त्यानें सदैव जागृत रहावें, झोंप कधींच घेऊं नये असा शब्दशः विपर्यास करण्याचें कारण नाहीं. सर्व घडामोडीकडे लक्ष देतां यावें, त्या जाणून घेण्याची इच्छा हवी, कांहीं गोष्टी समजल्या नाहींत तर मनाला रुखरुख लागून रहावी, मनाचें समाधान करण्याकरतां थोडीशी तरी त्रास सहन करण्याची शक्ति असावी, इत्यादि बाबी बातमीदाराच्या स्वभावात असल्या पाहिजेत. पण त्या येथेंच एकदम न सांगतां बातमीदाराच्या कार्याचें व्यापक क्षेत्र समजावून दिल्यानंतर काम पार पाडण्यासाठीं लागणाऱ्या आवश्यक गुणाचा उल्लेख केलेला बरा. एकंदर समाजांत वृत्तपत्रांचें स्थान आणि वृत्तपत्र कार्यालयांत बातमीदाराची जागा ह्या गोष्टी लक्षांत आणण्यासाठींच हें पहिलें मंगलाचरण समजावें.

प्रकरण दुसरें

# बा त मी दा र

वृत्तपत्रांचा धंदा अगदीं आधुनिक असला तरी त्याचें महत्त्व विशेष असल्यानें संपादकीय शाखेंत काम करणें ही मोठ्या मानाची व जबाबदारीची बाब होऊन बसली आहे. समाजात देखील, संपादकीय काम करणारांना उच्चासन देण्याची रीत आहे. कारण लोकसेवा करण्यांत संपादकवर्ग आनंद मानीत असतो. शिवाय जनतेची वकिली करण्याचा स्वयंसिद्ध हक्क संपादकांना असतो आणि ज्या मानानें तो बजावला जाईल त्या मानानें संपादकांची श्रेष्ठता व लोकांना त्यांविषयीं वाटणारा आदर वाढतो. आणखीही एका विचारानें लोक संपादकास मान देतात लोकसेवेसाठी संपादक सार्वजनिक आखाड्यांत उतरतो ( म्हणजे आपल्या कचेरींत खुर्चीवर बसतो ) तेव्हां त्याच्या मानेवर एक तीक्ष्ण तरवार सदैव लटकत असते. तिची परवा न करतां आपलें उद्दिष्ट लोकसेवाव्रत चालू ठेवण्याची चिकाटी जशी असेल, तशी संपादकीय वर्गाची महति वाढत जावयाची हें उघड आहे. समाज सहसा कृतघ्न होत नाहीं. आणि म्हणून वृत्तव्यवसाय करणाऱ्यांस शिष्टसंमत बहुमान मिळतो.

आर्थिक लाभाविषयीं मात्र तसें नाहीं. ह्या धंद्यांत पैसा मिळेलच असें सांगतां येत नाहीं. परंतु लोकसेवा निरपेक्षतया आणि जीवेंभावें केली तर ददात पडणार नाहीं ही खात्री ठेवावी. समाजांत साधारणपणें श्रीमंतीवर मान मरातब मिळतो असें पाहण्यांत येतें. पण वृत्तव्यवसायी हा धनिक नसला, तरी त्याला बहुमान मिळतो. कारण त्याची सेवा लोक विसरत नाहींत. समाजाच्या अनेक घटकांपैकीं अत्यंत उपयुक्त असें कार्य संपादकीय वर्गच बजावीत असतो. त्यांची आपल्या समाजास व देशास आवश्यकता आहे ह्या गोष्टी समाज ओळखतो. ह्या परिस्थितीस आपल्या देशांतील वातावरणच थोडें बहुत कारणीभूत आहे. इतरत्र म्हणजे सुधारलेल्या देशांत वृत्तव्यवसायी हा चांगला पैसा कमावणारा म्हणून समजतात आणि तिकडे साक्षरतेचा प्रसार पुष्कळ झाला असल्यानें व आपल्यासारखी दरिद्रावस्था माजली नसल्यानें वर्तमानपत्रें

पुष्कळ खपतात आणि त्यात काम करणारांना भरपूर वेतन देणें परवडतें. तशी गोष्ट इकडे आहे कोठें ? निरक्षर लोकांचा भरणा मनस्वी, पोटाला एक वेळ भरपूर मिळण्याची मारामार, घरापलीकडे न पाहण्याची वैराग्यवृत्ति आंगीं बाणलेली, अशा सर्वस्वीं प्रतिकूल परिस्थितींत वर्तमानपत्रें खपावीं तशीं खपणें शक्य नाहीं . म्हणूनच इकडील संपादकीय वर्गास अल्प वेतनावर गुजराण करावी लागते. पण अशी दुर्धर स्थिति नाहींशी करण्यास वर्तमानपत्रेंच पाहिजेत. हें कार्य दुसऱ्या कोणत्याही मार्गानें इतकें परिणामकारी व्हावयाचें नाहीं. अस्तु.

हें आख्यान इतकें बाजूला नेलें कारण यांत पडूं इच्छिणारानें प्रथमतः आपल्या मनाची चुकीची समजूत करून घेतली असल्यास तिचें निराकरण करावें. सध्यां सर्वच धंद्यांकडे ( आणि शिक्षणाकडे देखील ) पैशाचा चष्मा लावून पाहण्याची सक्ति परिस्थितीनें साधारण जनतेवर लादली आहे. परंतु त्याबरोबरच दुसराही एक विचार मनांत येण्याचा संभव असतो. केवळ पैशाचींच बाब लक्षांत घेऊन धंदा स्वीकारावयाचा असेल तर त्यानें हा मार्ग पत्करूं नये, हें बरें. आपल्या कर्तबगारीस वाव मिळविणें, लोकसेवा करतां येणें आणि अभ्यासू वृत्ति कायम राखणें या तीन गोष्टींकडे ज्याचें विशेष मन असेल त्यालाच वृत्तव्यवसाय आवडेल. इतरांना नाहीं. हेंही त्याबरोबरच ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, खरोखरच मनापासून काम करून, डोकें चालवून हा धंदा केला तर आर्थिक लाभ देखील भरपूर होईल. आणि खरें म्हटलें तर सर्वच धंद्यांचें असें आहे. पण वृत्तव्यवसायाला सध्यां हें अधिक लागूं पडतें. कारण आपल्याकडे त्या शाखेचा शास्त्रोक्त अभ्यास केलेले इसम फारसे आढळत नाहींत. वर्तमानपत्राचा व्याप वाढता असूनही त्यांना उपयुक्त अशी लायख माणसें मिळत नाहींत अशी परिस्थिती असल्यानें नवीन होतकरूंस यांत पुष्कळ वाव आहे.

नवीन व्यवसाय पत्करतांना सर्वच जण निवळ पैशाकडे पहातात असें नाहीं. कोणाला बैठें काम आवडतें तर कोणास पायावर चक्र पडल्याप्रमाणें नेहमीं भटकण्याची भारी हौस असते; कित्येकांना आपलें डोकें चालविण्यास मिळातें

असें वाटतें तर कांहीं म्हणतात कीं नुसतें यांत्रिक (खर्डेघाशीचें) काम हवें. अशा विविध प्रकारच्या आवडीनिवडींतून पार पडल्यानंतरच आपण एखादें काम पत्करतों. वृत्तपत्रांत काम करावयाचें असल्यास कोणते गुण अंगीं असावे लागतात हें सांगितले म्हणजे आवड कसली असावी तें आपोआप कळेल. 'वर्तमानपत्र आपणांस कसें पाहिजे' याचा आपल्या मनाशीं किंचित् खोल विचार केल्यास त्याच्या संपादकीय वर्गांत आपण गेलों तर काय काय काम करावें लागेल याची बरीच कल्पना येईल. पहिलें मुख्य कलम म्हणजे ठराविक 'ऑफिस टाइम' चा हट्ट चालणार नाही. आपलें काम झाल्याशिवाय जागा सोडावयाची नाहीं. आणि वर्तमानपत्र ठराविक वेळीं बाहेर विक्रीस निघावयाचें असल्यानें नेमून दिलेलें काम लवकर आटोपलें पाहिजे ही जाणीव नेहमींच असावयास पाहिजे. घडयाळांतील प्रत्येक स्क्रू व चक्र व्यवस्थित आणि कार्य-तत्पर असलें तरच तें चालतें; नाहीं तर बंद पडतें. हीच गोष्ट वर्तमानपत्रांची. त्यांतील प्रत्येक घटक व्यवस्थित व नियमित असेल तरच तें चालणार.

पण नुसतें वक्तशीरपणें हजर राहून किंवा वाटेल तितका वेळ कचेरींत बसून वर्तमानपत्राचें काम संपणारें नसतें. लेखकाची लेखणी हुकमी पाहिजे. म्हणजे जेव्हां लागेल तेव्हां आवश्यक असेल तितक्याच जागेंत बसेल असें त्या दिवशीं उचित असलेल्या विषयावर लिखाण तयार पाहिजे असतें. तें देखील इतर वर्तमानपत्रांच्या मानानें चांगलें ठरले पाहिजे किंवा वाचकांनाही तें वाचून समाधान झालें पाहिजे; अशा योग्यतेचें लिखाण अर्थातच संवयीनें लिहितां येईल. परंतु गवयाला लहर असते तशी वृत्तव्यवसायी लेखकाला असून मुळींच चालणार नाहीं. कवींच्या भाषेंत बोलावयाचें तर सुलभप्रसूतीचा लेखक असावा असें म्हणता येईल. गद्यांत शीघ्र कवित्व अंगीं असणारांना हा धंदा बरा. उदाहरणार्थ असें समजूं कीं रात्रीं ९॥–१० चे सुमारास पुण्यांत एका नाटकगृहास आग लागली. आणि मुंबईच्या दैनिकाच्या पुण्यांतील बातमीदारास ते सर्व वर्णन लिहून पाठवावयाचें आहे. तर जेवण सोडूनही आग लागलेल्या ठिकाणीं जाणें हें त्याचें कर्तव्य होईल. स्वतः सर्व गोष्टी पाहून, आवश्यक ती माहिती शेजारीपाजारी व शक्य असल्यास फायर ब्रिगेडचे अधिकारी याजकडून मिळवून, तत्काळ तारा लिहून पाठविल्या पाहिजेत. म्हणजेच दुसरे दिवशीं

सकाळीं प्रसिद्ध होणाऱ्या मुंबईच्या पत्रांत ती बातमी येऊं शकेल. हें न करतां, तो बातमीदार, समजा, असें म्हणूं लागला कीं, " छे, आतां मी ऑफिसचा बांधलेला नाहीं. पाहूं उद्यां सकाळीं काय होतें तें. शेजारचे गोविंदराव गेलेच आहेत, सांगतील काय झालं तें. दगदग करावी कुणी ?" तर हें चालणार नाहीं. ' जाऊन काय करायचें ? ' किंवा ' उद्यां करता येईल ' ही ढकलंपट्टी वर्तमानपत्रांत मुळीच खपत नाही. रात्रीं पुण्यास घडलेला अपघात मुंबईस सकाळीं कळला नाहीं तर वाचक काय म्हणतील हा विचार करून पहावा. " अद्याप ह्या पत्राचे बातमीदार अजून हुषार नाहींत. टाइम्समध्यें पहा बरं कशी शिस्त आहे ती ! "—असे उद्गार आपल्या पत्राबद्दल कोणी काढलेले ऐकणें हे केव्हांही अपमानास्पद होय. कारण ' टाइम्स ' नाही, ' टाइम्स 'चा काका दुसरा कोणी असला, तरी तोही मनुष्यच ना ? त्याची कातडी गोरी असली म्हणून तिसरा डोळा त्याला देवानें नाहीं ना दिला ? मग ' टाइम्स 'ला जें शक्य आहे तें इतर कोणत्याही पत्राला शक्य झालेंच पाहिजे ! यातील आर्थिक प्रश्न आपण तूर्तास बाजूस ठेऊं. पण बातमीदाराला कर्तव्याची जाणीव असण्यास तर कांहीं हरकत नाहीं ना ?

आपणास केव्हाही काम आलें तरी बाहेर जाण्याची तयारी असणें हें बातमीदाराला मुख्य शिफारसपत्र लागतें. बैठ्या कामाची हौस असेल तर बातमीदारी नीट जुळणार नाहीं.

वर सांगितलेल्या गोष्टी वर्तमानपत्राच्या धंद्यांतल्या मुख्य अडचणी म्हणून म्हटलें. पण वास्तविक त्या अडचणी नव्हत. नवशिक्याची कांहीं तरी विपरीत कल्पना असल्यानें वृत्तव्यवसायांतील चांगली, मानाची, बाजूच तेवढी त्याला दिसते; दुसरी परिश्रमाची व मेहनतीची लक्षांत येत नाहीं. म्हणून प्रथमतः हौसेनें स्वीकारलेला हा धंदा बऱ्याच जणाना थोडया दिवसांच्या अनुभवानें सोडावा लागला आहे. परंतु एकदां ही सर्व जाणीव झाल्यावर वृत्तव्यवसाय कठीण वाटण्याचें कारण नाहीं. ' विद्या ही शिकून येत नसते ' ' तेथें पाहिजे जातीचें ' अशासारख्या ठराविक वचनांनीं वाद घालणारांचा सल्ला ऐकून त्यांची कांहीं तरी वेगळीच कल्पना होऊन बसलेली असते. वास्तविक तसें वाटण्याचें कारण नाहीं. प्रयत्न केल्यानंतर असाध्य असें मनुष्यास काय आहे ?

शारीरिक व्यंग असेल किंवा लिहिण्याचा पूर्ण कंटाळा असेल तर प्रश्नच उरत नाहीं. वृत्तव्यवसायाचें थोडें बहुत शिक्षण घेतल्यास साधारण लेखकही पुष्कळ प्रगति करूं शकतो. तेव्हां कोणी तिसऱ्यानें सल्ला दिला म्हणून मात्र आपल्या निश्चयापासून परावृत्त होण्याचें कारण नाहीं. अडचणी सांगून नूतन विद्यार्थ्यास बुजविण्याचा हेतु नसला, तरी ह्या धंद्याची यथार्थ कल्पना नवशिक्यास व्हावी म्हणून प्रथमतःच परिश्रमाची थोडीशी जाणीव करून दिली. पुढें यथावकाश त्याचा विस्तरशः उल्लेख करावयाचा आहेच.

आतां वृत्तव्यवसायामुळें लाभ काय होतात तेंही थोडक्यांत सांगणें क्रमप्राप्त आहे. समाजातील शिष्टसंमत मानाचा निर्देश मागें केलाच आहे. इतर गोष्टींपैकी महत्त्वाची म्हणजे मनाचें समाधान ही बाब विशेष लक्षांत घेतली पाहिजे. वकिलीच्या धंद्यांत खुद्द वकिलाला मनांत ठाऊक असतें कीं, हीं कुळें विनाकारण भांडतात व आपली धन करतात. वकिलांमुळेंच शेतकरी किंवा इतर कुळें बरींच नाडलीं जातात हेंही वकील पूर्णपणें ओळखून असतो. समाजात भांडणें चालतात तोपर्यंत आपली सद्दी असल्याची जाणीव वकिलांना असतेच. डॉक्टरांनाही आपण विनाकारण लोकाना लुबाडतों हें कळतें. पण प्रपंचाचा भार सोसावयाचा असल्यानें डॉक्टर काय किंवा वकिल काय थोडेसे कठोर बनतात. ( ह्या नियमाला काही अपवाद अर्थातच आहेत. ) पण वर्तमानपत्रकारांशी तुलना केली तर समाजातील उपयुक्ततेच्या मानानें वकील व डॉक्टर दोघेही फिक्के पडतात. संपादकाला आर्थिक लाभ नसतो. मेहनत अधिक पडते आणि सरकारी रोष, कारागृह, छळ ह्या तरवारी मानेवर लोंबत असून पुनः आर्थिक लाभ म्हणावा तर तोही बेताचाच. 'न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति' या भगवद्वचनानुसार समाजाला अशा कार्यकर्त्यांची किंमत कळते व त्याला मान मिळतो खरा. पण सर्वांत जास्त किंमत स्वतःच्या मानसिक समाधानास द्यावी लागेल. वृत्तव्यवसाय करतांना आपण नुसतें रंगीत पाणी देऊन सहा आणे मिळविले म्हणून किंवा कर्जेदलाली वाढवून फी उपटली म्हणून मनाला बोचणी कधींही लागणार नाहीं. उलटपक्षीं लोकसेवा करण्याची उत्कृष्ट संधि आपणांस मिळाली व तिचा दुरुपयोग न करतां सदुपयोग करीत असल्याबद्दल

जो संतोष व जें समाधान मनांत वाटतें त्याची बरोबरी दिवाणगिरीचा पगार मिळाल्यानेंही होणार नाहीं. याशिवाय आपली अभ्यासी वृत्ति कायम राहिल्या-बद्दल किंवा रोज नवें नवें ज्ञान शिकण्याची सक्तीच आपणावर होत असल्याचा सात्त्विक आनंद वाटतो तो निराळाच.

ह्या अगदीं तत्त्वज्ञानाच्या गोष्टी झाल्या असें कोणास वाटेल. परंतु ह्या व्यतिरिक्त अशीही एक मोहक बाब वृत्तव्यवसायांत आहे, तिचीसुद्धां विचारी व स्वतंत्र वृत्तीच्या लेखकांना भुरळ पडते. दुसऱ्या कोणाचें ' बोलणें ' सहन न करणारा स्वाभिमानी ( तापट ? ) मनुष्य विनाकारण वरिष्ठ अधिकाऱ्यापुढे हांजी हाजी करावयास नको म्हणूनही हा धंदा पत्करतो. वृत्तव्यवसाय विशेष प्रतिष्ठित असल्यानें आणि त्यांत सर्वच बाबींचा समावेश होत असल्यानें वर्त-मानपत्राच्या बातमीदाराचा प्रवेश वाटेल तेथें होऊं शकतो. खान-पाणंदीकर विवाह, आर्यभूषणची आग, कोठल्या तरी संस्थानिकाचा अधिकारदान समारंभ, प्रे. पटेलाच्या शवाची मिरवणूक, गव्हर्नमेंट हौसमधील मेजवानी, खंडाळयाच्या घाटातील अपघात, कोर्टातील विविध प्रकारचे खटले, क्रिकेटचे सामने, मारवाडी विद्यालयातील सभा, कायदेकौंसिलच्या बैठकी...काहीही समारंभ, दुःख प्रदर्शन किंवा इतर कसलाही जमाव असो, बातमीदार तेथें हक्कानें जाऊं शकतो व त्याला विशिष्ट सवलती मिळतात. मज्जाव असा त्याला कोठेंच नाही असे म्हणतां येतें. सर्वांत आश्चर्य वाटण्यासारखी बाब म्हणजे अशा वेळीं ' खाशा ' मंडळींत समाविष्ट होऊनही तो कोणाचा मिंधा नसतो. कोणी त्याला हां हूं म्हणणार नाहीं. उलट सर्वच त्याला खूप करण्यासाटी धडपडतांना दिसतील. कितीही मोठा सरदार किंवा उमराव असला तरी बातमीदाराला संतुष्ट ठेवण्याची तो पराकाष्ठा करतो. बातमीदार मात्र आपल्या रास्त जागेपेक्षां खालीं उतरत नाही. हा देखावा पाहून सर्वांसच आश्चर्य वाटतें. आणि समाजांतील विशिष्ट मानाची जागा म्हणून मागें म्हटलें ती ही. सरकारी अधिकाऱ्यांशीं वागतांना सुद्धां कसल्याही प्रकारची भीति बाळगण्याचें कारण बातमीदारांस नसतें. " सर " " सर " करण्याची किंवा कंबर लवविण्याची तर मुळींच पाळी येत नाहीं. शहरांतील प्रतिष्ठित प्रस्थें जेव्हा आपल्या उपास्य देवतेपुढें ' घालिन लोटांगण वंदिन चरण ' करीत असतात तेव्हा हा बातमी-

दार जसा काहीं त्या साहेबाच्या तोडीचा अधिकारी म्हणून उभा असतो, हा प्रकार खरोखरच पहाण्यासारखा नसेल काय ? ही जी स्वतंत्र व निर्भीड जागा समाजात वृत्तव्यवसायी जनांस मिळते ती टिकविणें किंवा तिचा सदुपयोग करून घेणें हें अर्थातच व्यवहारी पुरुषाला साधतें. तो प्रश्न सध्या आपण विचारात घेत नसून बातमीदार होण्यापासून काय फायदे व तोटे आहेत याचीच छाननी कर्तव्य असल्यानें थोडक्यांत सांगितलें.

समाजात व लोकात बातमीदाराचा बोज राहूनही त्याला मानाची जागा मिळते व मनास शांतिसमाधान वाटतें, तें का व कसें हें वर सांगितलेंच आहे. आता एक दोन उदाहरणें देऊन अशा प्रसंगीं देखील लोकसेवेस बाव किती भरपूर मिळतो हें दाखवावयाचें आहे. सिंध प्रांतात काहीं वर्षांपूर्वी जल-प्रलयानें कहर उडविला तेव्हा मुंबईच्या ‘ टाइम्स ’ चा बातमीदार तिकडे गेला होता. नुसती बातमी मिळविणें व फोटो घेणें हीं कामें करीत असता त्यानें होडी बऱ्याच जणास उपयोगासाठीं देऊन त्याचे प्राण वाचविले आणि कित्येक बायकापोरांस जवळ होतें तेवढे अन्नवस्त्र देऊन त्यांनाही जीवदान दिलें. बातमी काढता काढतां त्याला हें काम करण्यास संधी मिळाली तिचा त्यानें योग्य उपयोग केला. तसेंच ‘प्रताप’ चा बातमीदार तिकडे होता त्यानें एका शोकाकुल मातेचें मूल प्रवाहपतित होतें तें आणून देऊन तिचा शोक कमी केला. पण याही-पेक्षां दुसरी एक महत्त्वाची कामगिरी करण्याचा प्रसंग प्रस्तुत लेखकावर आला होता. आत्मस्तुतीचा दोषारोप टाळण्यासाठीं ही गोष्ट सांगू नये असें वाटतें. परंतु वर्तमानपत्राच्या बातमीदाराचे हक्क व सवलती किती व कशा असतात, ह्याचें यथार्थ ज्ञान त्या प्रसंगानेंच होईल म्हणून ती हकीकत सांगितल्यावाचून राहवत नाहीं. वाचकांनीं क्षमा करावी.

बगदादमध्यें माझ्या वास्तव्याच्या पहिल्याच दिवशीं सायंकाळीं कांहीं हिंदी मंडळींनीं आपल्या घरीं उपहाराला म्हणून निमंत्रण केलें होतें. तेथें निवडक चार पाच हिंदी बांधव जमून मजशीं काहीं विचार विनिमय करणार असल्याची सूचना मला अगाऊ देण्यांत आली होती. पूर्वीचा माझा कोणाशींच परिचय नव्हता किंवा कोणाकडून परिचयपत्रही आणलें नव्हतें. तरीही गेल्याबरोबर मुख्य विषयाकडे वळून त्याचें म्हणणें काय हें ऐकून घेतलें. इराकी रेल्वे-

खात्यांतील ती बडी हुद्देदार मंडळी असून सर्वच माझ्यापेक्षां वडील दिसत. त्याच्यांतील प्रमुख तर माझ्या दुप्पट वयाचा असेल. त्याला चांगला सहासातशें पगार व इतर भत्ता मिळे. पण त्याचा वरिष्ठ अधिकारी त्याला फारच त्रास देत असे असें दिसे. विशेषतः त्याच आठवडयांत एक नवें सर्क्युलर निघून निवळ हिंदी व अँग्लो-इंडियन ( म्हणजे खिश्चनसुद्धा त्यांत धरले होते ) असा पक्षपात तेथें नव्हता तो उपस्थित झाला होता. रेल्वेंतील वरिष्ठानें हा धडधडीत अन्याय केला, त्याला कायद्याचा आधार नव्हता. इतकेंच काय पण ज्याचेकडे ती पक्षपाती सवलत झुकली होती, ते सुद्धा तिजबद्दल कुरकुर करत. ती गोष्ट साहेबानें केवळ लहरीच्या भरांत केली होती, तरी उदार मनानें परत घेण्याचें धारिष्ट्य त्याला नव्हतें. हिंदी मनुष्यानें - काळ्या अदमीनें - आपणांस शहाण-पण शिकवावें हीच बाब त्याचा अपमान करणारी वाटे. म्हणून तो आपल्या हिंदी हस्तकाचें ऐकेना.

ह्या वृद्ध हिंदी गृहस्थाचा तर त्या प्रकरणीं साहेबानें पुष्कळच अपमान केलेला दिसला. मला सर्व प्रकार सांगत असता त्याच्या डोळयांतून टिपे गळलीं! मला काय करावें हें समजेना. " आम्हाला तुम्हीं देवदूतासारखे भेटलात. आमची वास्तपुस्त करण्यास आज १५-१६ वर्षांत कोणीही हिंदु-स्थानांतून आलें नाहीं. तुम्ही तरी आतां हिंदी वर्तमानपत्रातून आमचें गाऱ्हाणें पुढें मांडा " असें त्यांनीं अगदी काकुळतीस येऊन सांगितलें. दोन अडीच तास त्यांचीं गाऱ्हाणीं ऐकत होतों. शक्य तितकी खटपट करण्याचें त्यांना आश्वासन दिलें आणि जरूर पडल्यास त्याच्या वरिष्ठाला भेटून या प्रकाराबद्दल माहितीहि विचारण्यास मी तयार असल्याचें त्यांना सांगितलें. आणि एक तोडगा म्हणून असेंहि सुचविलें कीं, ' हिंदी पत्रांचा बातमीदार येथें आलेला असून तो लवकरच हाय कमिशनरला ( बगदादमध्यें राहणारा इराकचा जवळ जवळ गव्हर्नर असा इंग्रज अधिकारी ) भेटणार असून हिंदी जनतेचीं गाऱ्हाणीं त्यांचेपुढें माडणार आहे, ' ही बातमी त्या रेल्वेसाहेबाच्या कानावर घालून ठेवा. त्याबरोबर साहेबांस असेंही कळविलें होतें कीं, बगदादमधील बहुतेक हिंदी लोक त्या बातमीदारांस भेटले असून त्यांनीं आपापलीं गाऱ्हाणीं त्यास निवेदन केल्यामुळें तो हाय कामिशनरला भेटण्यास निघाला आहे.

इतका शह पुरे झाला. दुसरे दिवशीं हाय कमिशनरकडे जाण्यापूर्वीच तो वृद्ध हिंदी गृहस्थ धांवत धांवत मजकडे आला आणि हंसत हंसत म्हणाला, " तुमची युक्ति फार उपयुक्त ठरली. साहेबानें लगेच तें सर्क्युलर परत घेतलें. तुम्हास त्यानें भेटीला बोलाविलें आहे. " रेल्वेतील सर्व हिंदी नोकरांना आनंद झाला. किती तरी अँग्लो इंडियन, मुसलमान, हिंदू, रेल्वेंत काम करणारे होते. त्यांनीं आपापल्या वैयक्तिक अडचणी मला सांगितल्या आणि यातून मार्ग सुचवा अशी करुण स्वरानें विनंति केली. सर्वांच्या तक्रारी खऱ्या होत्या. पण एक सहजासहजी दूर झाली तशी गोष्ट सर्वांच्या बाबतींत होणें शक्य नव्हतें. बगदादला माझा मुक्काम फार तर तीन दिवस होणार होता, तो दहा दिवसांवर गेला ! कारण सर्वांच्या अडचणी निदान ऐकून तर घ्यावयास पाहिजेत ना ? त्या सर्वांना इतका आनंद झालेला दिसे कीं जसा कांहीं प्रत्येकाच्या घरचाच मनुष्य कोणीं भेटला आहे !

नंतर यथावकाश हाय कमिशनर व इराकचे मुख्य प्रधान यांस भेटून मी हिंदी नोकरांचा प्रश्न काढला; थोडीशी तरफदारी केली. त्यांनींही निदान आश्वासनें दिलीं, वगैरे प्रकार अगदीं अलाहिदा सोडला तरी हिंदी बांधवांची मला सेवा करता आली ही गोष्ट काय दर्शविते ? गव्हर्नरच्या तोडीच्या इंग्रज अधिकाऱ्यांशीं आपल्या परदेशस्थ बांधवांची वकिली करण्यास मिळावी आणि तींतही कोणत्याही प्रकारचा उच्च नीच भाव न मानतां, ही गोष्ट केवळ मी वृत्तव्यवसायी होतों म्हणूनच शक्य झाली ! हाय कमिशनरच्या कचेरींतील किती तरी हिंदी गृहस्थाना त्यावेळीं माझा हेवा वाटला आणि " तुम्ही बातमीदार म्हणजे खरोखर देवाचे लाडके पुत्र आहांत " असें त्यांनीं म्हटलें.

सांगण्याचा मतितार्थ हा कीं ह्या धंद्यात धोका असला, पैसा भरपूर न मिळाला तरी उपरिनिर्दिष्ट ज्या सवलती मिळतात त्या अन्यत्र कोठेंही मिळत नसल्याने वृत्तव्यवसायाचें महत्त्व कांहीं निराळें आहे. मात्र स्वतःच्या समाधानाला किंवा मनोदेवतेला न मानता केवळ लौकिक कल्पनानींच चालणारा इसम असेल, तर त्यानें असल्या फंदांत पडूं नये हें उत्तम. धंदा चांगला का वाईट हें ज्याचें त्यानेंच ठरविलें पाहिजे. त्याबद्दल दुसऱ्याकडे चौकशी करणें किंवा तिऱ्हाइताच्या मतावर आपली निर्णयशक्ति अवलंबून

ठेवणें म्हणजे पर्यायानें मी वृत्तव्यवसायास नालायक आहे अशी कबुली देणेंच होय.

आजन्म विद्यार्थी रहाण्याची मनोभूमिका असली तर वृत्तव्यवसायांत किती तरी मनोरंजक विषय अभ्यासावयास मिळतात. मानवस्वभावाचा इतका सूक्ष्म अभ्यास या धंद्यांत घडतो कीं त्याचा फायदा पुढें पावलीं पावलीं कळून येतो. वाङ्मयाशीं निकट परिचय घडून उच्चदर्जाचा सात्विक आनंद अनुभवण्यास मिळतो. कोणाही अधिकाऱ्याची, श्रीमंताची अथवा लब्धप्रतिष्ठिताची आपणास परवा नसते; त्यांना भिण्याचें किंवा उगाच कंबर लवविण्याचें कारण रहात नाहीं; सर्वांत अधिक महत्त्वाची फायद्याची बाब अशी कीं बातमीदारीपासून सुरवात केली तरी संपादकीय खुर्ची काहीं त्याच्या आवाक्याबाहेरची नसते. संपादकाला बातमीदाराचें काम यावेंच लागते. इतर धंद्यांत तसें नसतें. डॉक्टराचे कॉंपौंडर किंवा वकिलाचे कारकून कितीही सुशिक्षित असले किंवा त्यांनीं पुष्कळ वर्षे नोकरी केली, तरी त्यांना डॉक्टर इतका मान मिळावयाचा नाहीं. पूर्वी वकिलाचा कारकून होता तो फार तर "मु० वकील" होईल. आणि साध्या कारकुनाचींच कामे त्याला करावीं लागतील. त्यांची दुय्यम जागा त्याना कधींच सोडतां येत नाहीं. फार तर कॉंपौंडरांत किंवा कारकुनात त्यांचा नंबर पाहिला लागेल. परंतु तशी गोष्ट वृत्तव्यवसायांतली नाहीं. ह्या धंद्यांतल्या अनुभवावरून उच्चपदप्राप्ति अवलंबून असल्यानें पत्रपांडित्य शिकणाऱ्या सर्वांच्या आवाक्यातली ती आहे. ह्यातच वृत्तपत्राचें महत्त्व दिसते.

अशा व्यवसायाची शास्त्रोक्त शिकवण देणे हा या पुस्तकाचा उद्देश आहे.

प्रकरण तिसरें

# बा त मी ची व्या ख्या

बातमीदाराचें काम म्हणजे वृत्तव्यवसायांतील अगदीं पहिली पायरी असल्यानें त्या कामाची नीट कल्पना करण्यासाठीं अभ्यास कसा चालवावा, साधनसामग्री कोणती जमवावी वगैरे गोष्टींचा नंतरच विचार केलेला बरा. पूर्वतयारी व मनोवृत्ति कशा प्रकारची असावी याचें थोडक्यांत विवेचन मागें झालें. आतां बातमीदारीचें शिक्षण कोठें मिळतें, तें कसें आत्मसात् करावें आणि तें करीत असतां कोणत्या गोष्टींकडे विशेष लक्ष द्यावयाचें असतें ह्याचाच विचार कर्तव्य आहे.

वर्तमानपत्राच्या विविध अंगापैकीं बातमी देणें हेंच मुख्य काम असल्यानें वृत्तव्यवसायास प्रारंभ बातमीदारापासून होतो. बातमीला वृत्तपत्राचें मुख्य आंग म्हटलें तें अशासाठीं कीं, बहुजन समाज संपादकीय लिखाणापेक्षां बातमीकडेच विशेष आकर्षिला जातो. प्रांताचें, जिल्ह्याचें, किंवा तालुक्याचें प्रमुख पत्र असेल त्या मानानें त्याचें महत्त्व निराळें साधारणपणें प्रांताचे ठिकाणीं दैनिक आणि जिल्हा तालुका यांसाठीं साप्ताहिक अशी वाटणी आपोआपच झाली आहे. मुंबई पुण्यासारख्या शहरीं सुशिक्षितांचा भरणा अधिक असावयाचा; तारा, टपाल ह्यांची सोयही तेथेंच चांगली असते आणि छपाईची व्यवस्था देखील अन्यत्र तशी सोईची होत नसल्यानें दैनिकांसाठीं हींच दोन शहरें बरीं. प्रांतिक पत्रें प्रांताच्या राजधानींतूनच निघावयाचीं. जिल्ह्याचें मात्र तसें नसतें. ताज्या बातम्या म्हणजे विलायतेहून किंवा हिंदुस्थानांतील इतर भागांतून येण्याचा संभव फारसा नसतो. त्यांचें कार्यक्षेत्रच मुळीं जिल्ह्यापुरतें आकुंचित असल्यानें जिल्ह्यांतील बातमीस त्यांच्या पत्रांत प्राधान्य मिळतें. म्हणून दैनिकांत बातमी देणें किंवा साप्ताहिकांत बातमी देणें यांत पुष्कळ फरक आहे.

ज्या वर्तमानपत्रांशीं आपला संबंध येणार त्याचा पहिल्यानें थोडासा बारकाईनें अभ्यास केलेला असला म्हणजे बरें पडतें. त्याचा खप कोठें अधिक

होतो, त्यांतील कोणता भाग वाचक अगोदर वाचतात आणि तो कां, इत्यादि गोष्टींचा तपास काढलेला असला म्हणजे सोय होते. कारण गिरणीमजुरांत खपत असलेल्या पत्रांत द्यावयाच्या बातम्या व मध्यम वर्गात प्रसार असणाऱ्या वर्तमानपत्रांतील बातम्या यात फरक असणारच. ही गोष्ट साधारणपणें पत्राच्या किंमतीवरून ताडतां येते. दोन दिडक्यास मिळणाऱ्या पत्रांत आणि एक आण्यास विकणाऱ्या पत्रांत फरक असतो तो हाच. पैशाला मिळणारीं पत्रें कोणत्या वर्गात अधिक फैलावतात आणि त्यात कोणत्या बातम्या येतात हें पाहिलें म्हणजे आपल्या वाचकाची माहिती आपणास कां हवी तें समजेल. उदाहरणार्थ असें समजा कीं, मुंबईस परळ विभागांत पाव आण्याचें एक दैनिक अत्यंत लोकप्रिय आहे. तर त्यात साहित्यसंमेलनाची चर्चा, पंचांगवाद किंवा अशाच शास्त्रीय विषयावरील लेख अथवा तत्संबंधीं बातमी देऊन काय उपयोग होईल ? याच्या उलट, पुणें शहरांत व इतरत्र खपणाऱ्या वर्तमानपत्रांत गिरणी कामगारांच्या चळवळी आणि तत्संबंधीं बातम्या दिल्या तर वाचक वाचतील काय ? घडलेल्या गोष्टीचें उदाहरण द्यावयाचें तर मुंबईतील दैनिकांत व साप्ताहिकांत ( प्रभात, श्रीलोकमान्य वगैरेंत ) मजुरासंबंधीं जी महत्त्वाची बातमी वाचावयास मिळते ती ज्ञानप्रकाश किंवा केसरींत येत नाहीं हें देतां येईल. याचें कारण उघड आहे. प्रत्येक पत्राचा वाचकवर्ग निराळा असल्यानें त्याला जें आवडेल तेंच लिखाण घालण्याकडे कल ठेवावा लागतो. नाहीं तर वर्तमानपत्र चालावयाचें नाहीं आणि कसेंबसें चालविलेंच तर चालविण्याचा हेतु साध्य होणार नाहीं. संपादकीय लिखाणांविषयीं प्रस्तुत कांहींच लिहावयाचें नसल्यानें बातमीदाराच्या दृष्टीनें आपण वर्तमानपत्राकडे पहात आहोंत. आणि वर्तमानपत्रांतील बातमीदाराचा भाग कसा भरून काढावयाचा हेंच आपणास चर्चावयाचें आहे.

आपल्या भोंवतालच्या जगात प्रत्यहीं काय घडलें हें जाणण्याची इच्छा मनुष्यमात्रास निसर्गतःच आहे. प्रथमतः आपलें कुटुंब, मग गांव, तालुका, जिल्हा, प्रांत, देश, खंड व नंतर सर्व पृथ्वी अशा चढत्या क्रमानें हें जिज्ञासेचें चक्र वाढत जातें. ह्याचेही पलीकडे जाऊन आकाशांतील सूर्य, ग्रह व तारे ह्यासंबंधींही माहिती मिळविण्याची इच्छा मनुष्याचे मनांत उद्भवते. आणि त्या सर्व इच्छा तृप्त करण्यासाठीं वर्तमानपत्राचा अवतार आहे असें म्हणतां

येतें. आपल्या कौटुंबियांची माहिती खासगी पत्रव्यवहारानें कळते तशी ती कांहीं बाबतींत वृत्तपत्रांवरूनसुद्धा कळते. स्थानिक पत्र असल्यास त्यांतून त्या गांवची खबर पसरते किंवा तालुक्याच्या अथवा जिल्ह्याच्या पत्रात त्याचा समावेश होईल. अशा चढत्या पायरीनें वर्तमानपत्राविषयीं आवड व कार्यक्षेत्र वाढत जातें. याच्या उलट ज्या वर्तमानपत्रात पुष्कळ जिल्ह्याची खबर असते त्या पत्राला त्या त्या जिल्ह्यात गिराइकही पुष्कळ मिळत, असा हा अन्योन्य संबंध आहे. ज्ञानप्रकाशांत नगर, सातारा, सोलापूर ह्या किंवा दुसऱ्या आणखी जिल्ह्यांची बातमी वरचेवर येते म्हणून त्या त्या ठिकाणीं ज्ञानप्रकाशचा खप वाढतो हें साहजिकच होय. यावरून एक गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती ही कीं वाचकांना काय पाहिजे तें ओळखून त्यांना तेवढें दिलें कीं वर्तमानपत्र अधिक खपलेंच पाहिजे. बातमीपत्राला किंवा घडामोडीला महत्त्व येतें त्याचे कारण मुंबईच्या वाचकांस सोलापुरची हालहवाल कळावीशी वाटते; पुण्याच्या वाचकाला सोलापूर आणि मुंबईकडील खबर समजाऊन घेण्याची उत्सुकता असते आणि खुद्द सोलापुरीं राहणारांना आपल्याबद्दल इतर ठिकाणच्या पत्रात काय लिहून आलें तें पाहण्याची उत्कंठा लागते. मिळून काय, तर सर्वांचीच उडी वर्तमानपत्रांवर पडते आणि त्याचा प्रसार वाढतो.

इतकें लक्षात घेतल्यानंतर बातमीचा मजकूर कां व किती द्यावा लागतो याची कल्पना येईल. स्थानिक बातमीस पहिला मान, नंतर जवळच्या तालुक्याची, त्यानंतर जिल्ह्याची अशी ही क्रमपरंपरा वाढवीत जावें लागतें. हिंदुस्थानांतील राजकीय घडामोडीशी प्रत्येक नागरिकाचा निकट संबंध असल्यानें दिल्ली अथवा सिमला येथे राजकारणासंबंधीं काय वाटाघाट चालू आहे किंवा हिंदुस्थानला राजकीय सुधारणा देण्याविषयीं लंडनमध्यें भरलेल्या परिषदेंत काय घडत आहे ह्या बाबीदेखील हिंदी वाचकांना महत्त्वाच्या वाटतील. तेव्हां सर्व बातम्याचा भाग एकत्र यावयाचा असला तरी त्यांत ही वर्गवारी पाडावी लागते. आणि विलायती किवा हिंदुस्थानातील इतर महत्त्वाच्या बातम्या पुरविणारी एक कंपनीच असल्यानें तत्संबंधीं विवेचन आपल्या क्षेत्रात तूर्त तरी येत नाहीं. रूटर व असोशिएटेड प्रेस याचा धंदा बातमीदाराचाच. पण त्यांचा व्याप इतका मोठा आहे कीं त्यासंबंधीं पुढे स्वतंत्रच उल्लेख करावा लागणार आहे. आपल्या कामापुरतें इतकें पहावयाचें कीं वर्तमानपत्रात बात·

मीचे रकाने भरण्यासाठीं ह्या दोन कंपन्याकडून आलेल्या बातम्यांचा, इतर बातमीपत्राप्रमाणें उपयोग होतो. स्थानिक बातमीदाराचें काम मात्र करावयाचें राहतें. तें कोणीं व कसें करावयाचें असतें हें पाहिल्यानतर मग बातमीपत्रांचा विचार करण्यांत येईल.

बातमीदाराचे अगदीं ढोबळ असे दोन प्रकार पडतात. एक स्थानिक बातमीदार म्हणून असतो तो वर्तमानपत्र ज्या ठिकाणीं प्रसिद्ध होतें तेथें राहून संपादकीय शाखेच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं काम करतो. आणि दुसरा देखील संपादकाच्या सूचनेप्रमाणेंच चालणारा; पण वृत्तपत्राशीं त्याचा प्रत्यक्ष संबंध येत नसून पत्रव्यवहारानें बातमीचीं पत्रें तो पाठवीत असतो. अर्थातच ज्या मानानें आवश्यकता असेल त्या मानानें असे गांवोगांवचे बातमीदार संपादकांनीं नेमलेले असतात. परंतु तिसऱ्याही एका प्रकारचा बातमीदार वर्ग आमच्याकडे अस्तित्वांत येत आहे. शब्दार्थाप्रमाणें चालल्यास तो बातमीदार ठरेल आणि रूढार्थानें तो ठरणारही नाहीं. तरीही साधारणपणें त्याला बातमीदार म्हणण्याला प्रत्यवाय नाहीं. कारण आपल्यांत अधिक कार्यविभागणी इतकी व्यवस्थित कोठें आहे ? एका व्यक्तीसच ४।५ प्रकारचीं कामें करावी लागतात. तेव्हा ह्या तिसऱ्या वर्गांतील बातमीदाराचें काम देखील वर दर्शविलेल्या दोन्ही बातमीदारांस करावें लागेल किंवा ह्याच्या उलट प्रकारही होऊं शकेल. म्हणून सर्वांच्या कार्याचा व्याप किती असतो हें पाहिलें पाहिजे. ह्या बातमीदारास नेहमीं बैठें काम असतें. व वर्तमानपत्रात बातमी देणें हें काम तो आपल्या खुर्चीवर बसूनच करतो. अलीकडे देशी वर्तमानपत्राचें जीवित परावलंबी फार झालें आहे. तें इष्ट का अनिष्ट हा मुद्दा वेगळा. पण इंग्रजी अथवा इतर देशी पत्रातून बातम्या भाषांतरून घेण्याचा प्रघात जारीनें वाढत चालल्यानें बैठया बातमीदाराचें कामही वाढतें आहे. बहुधा इंग्रजी पत्रांतील बातम्याचीं भाषांतरें करणें हेंच सध्यांच्या तिसऱ्या वर्गांतील बातमीदाराचें काम होऊन बसलें आहे. बातमी म्हटलीं कीं मग ती कोणत्याही भाषेंतली असो, तिची तात्त्विक चर्चा सर्वत्र सारखीच लागूं पडते. मराठींत जी बातमी आहे ती इंग्रजींत बातमी नव्हे असें होणार नाहीं. मात्र इंग्रजी वाचकवर्ग वेगळा, त्याच्या आवडी निराळया म्हणून बातम्यांत फेर पडण्याचा संभव असतो खरा. पण तेवढा वगळल्यास सर्व बातम्या एकाच सदरांत येतील. यासाठीं हालत्या बातमीदाराच्या

कार्याविषयींची चर्चा बैठ्या बातमीदारासही आवश्यक व उपयोगी आहे. त्याच्या कार्याचा स्वतंत्र उल्लेख पुढें करावा लागेल तेव्हांच त्याविषयीं अधिक लिहावें. कारण तें काम देखील वाटतें तितकें सोपें नसून नुसत्या भाषांतरकारावर सोंपवून चालणारें नसतें. असो.

दोन्हीं प्रकारच्या बातमीदारांस काम जवळ जवळ तेंच करावें लागलें तरी स्थानिक बातमीदार होणें ही, नवशिक्या वृत्तव्यवसायी मनुष्याची, पहिला धडा गिरविण्याची पहिली संधि होय. कारण त्याला स्वतःला जबाबदारीनें असें फार थोडें काम करावें लागतें. संपादकीय शाखेच्या एक किंवा अनेक प्रमुखांच्या सूचनेप्रमाणें त्याला चालावें लागतें. आणि तो जवळ जवळ सांगकाम्या असल्यासारखाच असतो. सांगितलेलें काम करतांना मात्र त्याला पुष्कळच बुद्धि खर्चावी लागते. दैनिक, साप्ताहिक किंवा पाक्षिक अशीं वृत्तपत्रें घेतलीं तर त्यांत दैनिकालाच बातमीदारांची जास्त आवश्यकता लागते हें उघड आहे. साप्ताहिकाला त्याच्या खालोखाल आणि पाक्षिकाला त्याहून कमी अशी ही उतरती परंपरा आहे. दैनिकाच्या बातमीदाराचें काम कसें असतें व तें कोणत्या रीतीनें पार पाडता येतें हें पाहिलें म्हणजे साप्ताहिकाचें किंवा पाक्षिकाचें काम करता येणे अवघड वाटणार नाहीं. म्हणून बातमीदाराच्या कामाची ओळख करून घेतांना दैनिकाच्या स्थानिक बातमीदारापासून प्रारंभ करणे श्रेयस्कर.

परंतु बातमी कशाला म्हणतात हा पहिला प्रश्न सोडविल्याविना बातमीदाराचें काम तरी कसे समजणार? बातमीची व्याख्या करणें सोपें नाहीं. ' घडलेल्या हकीकतीची माहिती ' असें बातमीचें लक्षण सांगता आलें तरी तेवढ्यावरून सर्वच ' बातम्या ' वर्तमानपत्रांतील बातम्यांच्या पंक्तीस बसवितां येणार नाहींत. आणि वर्तमानपत्रांतील बातम्या म्हणजे कांहीं विशिष्ट प्रकारचा शिक्का मारलेल्या असेंहि नव्हे. मागें एकदां म्हटलेंच आहे, कीं वर्तमानपत्रें हीं अगदीं अलीकडचीं असलीं तरी ' बातमी ' ऐकण्याची व म्हणून ती सांगण्याची मनुष्याची उत्कंठा फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे आणि ती नवी नाहीं. पौराणिक कालांत देखील बातमीदार असत. मात्र ते आपल्या बातम्या स्वतःच जाऊन सांगत; त्या छापून घेण्याची सोय तेव्हां नव्हती. बातमीदाराचें आद्य दैवत म्हणून " नारद " समजले जातात याचें कारणही हेंच कीं पुराणांतील उत्कृष्ट बातमीदार म्हणून नारदमुनींचें वर्णन करतां येईल. नारदांनीं आपल्या कलेचा

उपयोग केला तसाच सर्वांनीं करावा असा आग्रह खुद्द नारदांचाही नाहीं. असो. सांगावयाचें इतकेंच कीं बातमीची चटक ही चाकोलेट किंवा (लाल) टोमॅटो यांच्या चवीप्रमाणें आधुनिक नसून मनुष्यमात्राच्या उपजत आवडीपैकीं ती एक आहे. असें असल्यानें बातमी कशाला म्हणावें हें कळणें सोपें होतें.

समजा, तीन चार मंडळी संध्याकाळचे सुमारास एकत्र जमली. सर्वच जण एकाच ठिकाणीं रहाणारे. रोज सायंकाळीं जमून गप्पा ठोकण्याचा त्यांचा परिपाठच असे. तेव्हा त्याच्यात ' बातमी ' मिळूं शकेल कीं नाहीं ? आणखीही पुढें असें समजावें कीं त्यांच्या ओळखीचा असा त्यांचा एक स्नेही फारा दिवसानीं त्याना भेटण्यास त्याच वेळीं आला. तर त्यांच्या काय गोष्टी चालतील ? प्रथम कोणता प्रश्न निघेल ?

पण इतकें तरी दूर जा कशाला ? आपणच कोठें परगांवीं गेलों तर आपणास भेटणारी मंडळी आपणांस काय काय प्रश्न विचारतील हें पाहिलें किंवा त्यांनीं न विचारतांही आपण त्यांना काय सांगूं याचा विचार केला तर ' बातमी ' कशाला म्हणतात हें कळून येईल.

प्रथमतः हवापाणी, कुशल प्रश्न होतात. अमक्याचें कसें आहे. तमका काय करतो, * * ला मूल बाळ कांहीं झालें कीं नाहीं, * * * चा पगार कधीं वाढणार अशा घरगुती गोष्टीही बऱ्याच होतात. आणि नंतर " कांहीं तरी सांगा " ला सुरवात होते. तुम्हीही " कांहीं तरी " सांगतांच. टांग्यांत बसून स्टेशनला आल्याचें तुम्ही सांगत नाहीं. घोड्याला चार पाय होते, शिंग नव्हतें हें ही तुम्ही कोणास कळवत नाहीं. आगगाडींत बसण्यासाठीं प्लॅटफार्मवर जाण्यापूर्वी तिकिट काढलें, गाडीला इंजिन लागलें, त्यांतून धूर निघत होता, वगैरे गोष्टींबद्दल एक चकार शब्दही तुमचे तोंडांतून येत नाहीं. पण वाटेंत एका स्टेशनवर उतरून पाणी पिणाराची गाडींत बसतांना धांदल कशी झाली, चालत्या गाडींत तो बसूं लागला तेव्हां पाय घसरून तो प्लॅटफॉर्मवर पडून थोडक्यांत कसा बचावला, सांखळी ओढून गाडी कशी थांबवली ह्या प्रकाराचें सविस्तर वर्णन तुम्ही कराल आणि प्रत्येक मनुष्याला तें ऐकावेसें वाटेल. त्या गांवचे लोक तुमचेकडे येतील; तुम्हांला ती हकीगत पुनः पुनः विचारतील आणि निघून जातील.

तुम्ही नंतर " तुमच्याकडील नवल विशेष " म्हणून विचाराल. होय नाहीं करतां करतां बोलण्यास सुरवात होईल. रोज सकाळीं उठून ते काय करतात, केव्हां स्नान करतात, जेवतात किती वाजतां आणि काय पदार्थ खातात इत्यादि संबंधानें त्यांच्या तोंडून एक अवाक्षरही निघावयाचें नाहीं. पण, ' परवा ते प्रो. पोतदार व्याख्यानासाठीं आले होते येथें. त्यांना फराळाला बोलावलें होतें ' वगैरे माहिती आपोआपच बाहेर येईल कीं नाहीं तें पहा.

आणखीही एक दोन उदाहरणें घेऊं. तुमचा धाकटा भाऊ वसंता तुम्हाला बरेच दिवसांनीं भेटला. तुमच्याकडे लडिवाळपणें तो आला, अंगावर चढला वगैरे सर्व घरगुती प्रकार झाले. पण त्यानें येताच तुम्हांस काय सांगितलें ? " दादा, दादा, आपल्या चंपीला पहा सात पिल्लें झालीं. सगळें कुत्रेच आहेत. कसे पांढरे शुभ्र दिसतात पहा. अजून त्याचे डोळे उघडले नाहींत......... "

त्याचें पुराण झालें सुरू. कुत्र्यावरून तो आपल्या खेळण्याकडे गेला. नवीन खेळ कोणते आहेत, ते कोणी, केव्हां आणले, मोडण्यास कारण काय झालें, ती त्याची आगगाडी कशी धावते, वगैरेविषयीं तो सप्रयोग वर्णन तुम्हांस सविस्तरपणें सांगेल. आणि आपण कधीं लहान नव्हतों, आपणास तें ठाऊकच नाहीं अशा भावनेनें तुम्ही ते नीट ऐकाल, पहाल, हंसाल, हें सगळें होईल. किती तरी नव्या ( अर्थात वसंताच्या दृष्टीनें ) गोष्टींची तो तुम्हास माहिती देईल. आणि स्वतःचें बोलणें संपलें म्हणजे मग तुम्हास ' गंमत ' सांगा म्हणून मागें लागेल. इतर वडील मंडळींना ज्या गोष्टी तुम्ही सांगितल्या नाहींत त्या, उदाहरणार्थ आगगाडीचा रंग कसा होता, ती कशी जोरानें पळते, शिटी कशी वाजते, किती माणसें बसलीं होती, डब्यात मुलें बसलेली होती तीं कोणासारखी दिसत, काय काय खोडया करीत, वगैरे पुष्कळ विषयांची ' नवी माहिती ' तुम्ही वसंताला द्याल. ह्यांचा उल्लेख देखील तुम्ही इतर मंडळींशीं बोलताना केला नव्हता.

ह्यावरून ' बातमी ' कशाला म्हणतां येईल याचा अंदाज होता. ' घडलेलें वृत्त ' तें सर्व ' बातमी ' च्या सदरांत बसत असलें तरी ' बातमी ' सापेक्षतेनें उपयोजितां येते हें वरच्या दोनतीन उदाहरणांवरून स्पष्ट होतें. घडलेल्या गोष्टींत ताजेपणा पाहिजे हें खरें; पण घडण्याच्या किंवा समजण्याच्या ताजेपणा-

पेक्षां नवलाईस म्हणजे आश्चर्योत्पादनास अधिक महत्त्व आहे. कारण चंपीला पिलें झालीं, ही जरी अगदी ताजी घडलेली गोष्ट असली तरी ती 'बातमी' होऊं शकत नाहीं. परंतु एका पिल्लाला तीनच पाय आहेत असें आढळलें तर ती बातमी होईल. किंवा त्यात दोन जुळीं पिलें असलीं, दोन तोंडें, आठ पाय, पण शरीरें एकत्र सांधलेली दिसलीं तरी ही बातमी होते.

नुसत्या नवलानेंच एकाद्या बाबीला बातमीचें स्वरूप येतें असें नाहीं. गांवोंगांवीं किंवा घरोघरही बायका बाळंत होतात. त्यांना मुलेंबाळें होतात. पण * * * संस्थानच्या राजेसाहेबांना पुत्ररत्न झालें ही बातमी आहे कीं नाहीं ? ह्या ठिकाणीं साधारण गोष्टीला — पुत्रजन्माला — बातमीचें महत्त्व आलें तें संस्थानिकांमुळें, म्हणजे व्यक्तिमाहात्म्यामुळें. संस्थान फार मोठें. त्याचे प्रजाजन पुष्कळ. आणि म्हणून बऱ्याच लोकांचे लक्ष संस्थानिकांच्या घरगुती गोष्टीकडे लागलेलें असले तर आश्चर्य नव्हे. व्यक्ति ज्या मानानें समाजात स्थान पटकावून असेल त्या मानाने त्या व्यक्तीच्या हालचालींस, प्रापंचिक घडामोडीस बातमीचें स्वरूप येते. रोजीं हजारों उतारू पुण्याहून मुंबईस जातात येतात. पण ती बातमी होऊं शकत नाहीं. याच्या उलट गव्हर्नराची स्वारी मुंबईस केव्हां पोहोंचणार, पुण्यास पुनः केव्हां परतणार वगैरेविषयींची माहिती बातमी होऊं शकते. कारण गव्हर्नरांची राजकीय थोरवी !

बाबूलालचें नांव प. खानदेशातील शहादें गांवापलीकडे कोणास ठाऊक नव्हतें. तेथल्या एका भुसारमालाच्या व्यापाऱ्याचा तो पुतण्या. परंतु त्याच्या मृत्यूची हकीकत बातमी होऊं शकली. त्याच्या लग्नाची वरात निघाली तेव्हा घोडें कशाला तरी बुजलें आणि तो घोडयावरून पडून पुष्कळ दूरवर फरफटत गेला; व जखमामुळे थोडया अवकाशांत मेला. बायकोच्या हातात लगाम किंवा रिकिबींत पाय नसल्यानें तिला नुसतें लागलें; ती फरफटत गेली नाहीं. बाबूलालचें नाव बातमींत आलें काय किंवा न आलें काय सारखेंच. शहादे कोठें आहे हें ठाऊक नसलेल्यानासुद्धां हें वृत्त 'बातमी' वाटेल याचें कारण व्यक्तिमाहात्म्य नव्हे, तर मृत्यु घडून येण्याचें कारण व प्रसंग हें आहे. अनपेक्षित रीत्या मरण ही बाब सर्वांचेच मनात खेद उत्पन्न करते, आणि म्हणून असे विचित्र अपघात बातमीच्या सदरात येऊन बसतात.

लाखों रुपयाचें नुकसान करणारी आग किंवा दहा बारा उतारूंना जाया करणारा आगगाडीचा अपघात अशापैकीं बाबी बातमीच्या रकान्यात बसतात. व्यक्तिमाहात्म्य, नवलाई, किंवा अजब प्रकार यात नसला तरी जीवितास आणि मालमत्तेस धोका पोहोंचल्याची माहिती त्यात आहे. मनुष्य प्राण्याच्या मनांत अनेक विकार उद्भवतात. त्यांपैकीं बहुतेकांचा जीविताशीं किंवा मालमत्तेशीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष संबंध येऊन पोहोंचतो असें दिसेल. हा मनुष्यस्वभाव आहे. त्यामुळें मनांत अनुकंपा, सहानुभूति उत्पन्न होते.

आतां इतक्या विवेचनानंतर 'बातमी' कशाला म्हणतात हें कळलेंच असेल आणि म्हणून भूगोलातील व्याख्येप्रमाणें बातमीची सुटसुटीत व्याख्या करतां येणें किती कठिण आहे हेंही लक्षात आलें असेल. बातमी विविध प्रकारची असूं शकते, पण ती बातमी होते याचीं थोडक्यांत कारणें आपण पाहिलीं. आणखी किंचित् खोलांत शिरल्यावर 'बातमी' विषयींची यथार्थ कल्पना येईल आणि ही गोष्ट बातमीच्या योग्यतेची आहे कीं नाहीं असा संदेह सहसा पडणार नाहीं.

पुनः मागच्या उदाहरणाकडे थोडेसें पाहिलें पाहिजे. तुमच्या व वसंताच्या ज्या गोष्टी झाल्या त्या बातमीच्या सदरांत कां येऊं शकणार नाहींत याचा थोडा विचार करूं. तसेंच तुमचें मूलबाळ, पगारवाढ, लगीन, वगैरे संबंधींचें बोलणें बातमी म्हणून उपयोगांत आणता येईल कां? याचें उत्तर देण्यासाठीं पुनः काहीं प्रश्न विचारावे लागतील. वसंताशीं बोलत असताना तुमचेजवळ तिसरा कोणीच तें ऐकत नव्हता. इतर घरची मंडळी आपापल्या कामांत चूर होती. कारण त्या गोष्टींत त्याना काहीं 'तथ्य' वाटलें नाहीं. तसेंच तुमच्या घरगुती बाबींविषयीं बोलणें झालें तेव्हाही तुमच्या कुटुंबीयाव्यतिरिक्त कोणा तिऱ्हाइतास त्यात काहींच वाटलें नसते. परंतु त्या गाडीखालीं सापडणाऱ्या उतारूची हकीकत तुम्हीं सांगितली, ती मात्र लगेच शेजाऱ्यापाजाऱ्याकडून पुढें त्यांच्या स्नेही सोबती मंडळींत कशी पसरली तें पाहिलेंत ना? हें असें कां होतें? चंपीला सात पिलें झालीं, तेव्हा कोणींच तिकडे लक्ष दिलें नाहीं. फार काय, तिचीं ५-६ वेतें झालीं हें देखील कोणास ठाऊक नव्हतें. पण एका पिल्लास तीन पाय आहेत असें समजताच सकाळसंध्याकाळ गल्लींतील मंडळी तें पाहण्यास येऊं लागली! कारण काय? समाजांतील बऱ्याच घटकांना आश्चर्य वाटत असलेली बाब चंपीला सात पिलें झालीं ही नसून यातील एकाला तीनच पाय आहेत ही होय. तसेंच तुमच्या

घरगुती गोष्टींची आवड घराबाहेरच्या मंडळीना कशी असेल? घराबाहेरच्या मंडळींना आगगाडीवरचा अपघात ऐकावयासा वाटला; पण मूलबाळ झाल्याची किंवा पगारवाढीची माहिती फक्त निकट संबंधीयांनाच अधिक आवश्यक होती. तीच गोष्ट वसंताच्या बातम्यांची. त्या तर घरांतलि मंडळींपैकीं खुद्द तुमच्यांपैकीं कोणी मन लावून ऐकल्याही नाहींत. याचे कारण शोधून काढलें म्हणजे वृत्तव्यवसायांतील एक महत्त्वाचा धडा लक्षांत येईल. वाचकांपैकीं अधिकांत अधिकांस वाचावीशी वाटली किंवा वाचून आपणांस ठाऊक नव्हती ती गोष्ट कळली असे वाटलें, तरच त्या मजकुरास बातमी म्हणतां म्हणतां येईल. मग ती बातमी राजकारणाची असो किंवा एकाद्या सामाजिक समारंभाची असो किंवा व्यापारी घडामोडीची असो, ती वर्तमानपत्रांत येण्याच्या योग्यतेची ठरते. या व्यतिरिक्त खेळांची बातमी, बँकांच्या देवघेवीची बातमी, नाटक कंपन्यांची बातमी वगैरे प्रकार वाचकांच्या आवडींवरून आणि मुख्यतः वर्तमानपत्राच्या सवडीवरून केले जातात. कारण ' खेळाडू ' * वाचकांना, क्रिकेटपटु देवधर कोलंबोस गेले होते तेव्हां त्यांनीं तेथें कसा विजय संपादन केला हें कळण्याची उत्सुकता असते तर, नवरोजी बायकोजी पोरवाला शेटजींस विलायती हुंडणावळीचा दर जाणण्याची उत्कंठा असते. रंगेल गुलाबरावांस गंधर्वांचें ' स्वयंवर ' कोठे लागलें आहे हे समजल्यावाचून चैन पडावयाचें नाही. असे विविध वाचक वर्तमानपत्रांचे असल्याने त्या त्या विषयांची बातमी देणें वृत्तपत्रकारांचें कर्तव्य होऊन बसतें. असले बातमीदार अर्थात् तत्तत् शास्त्रीय तज्ञ असतात. तेव्हां त्यांचा इतर बातम्यांशीं विशेष संबंध येत नाहीं. आपण तूर्त सर्व साधारण बातम्यांचाच विचार करणार आहोंत.

---

* ह्या ठिकाणीं घोड्यांच्या शर्यतीचा उल्लेख करणें प्राप्त आहे. हें घातुक व्यसन असून त्यानें समाजाचा अनेक परीनें नाश होतो. म्हणून तत्त्वनिष्ठ देशी वृत्तपत्रकार ' रेसिस ' संबंधीं कसलीही माहिती आपल्या पत्रांत येऊं देत नाहींत. याच्या उलट ' हा राजेशाही खेळ ' किंवा ' खेळांचा राजा ' असें गोंडस नांव देऊन इंग्रजी पत्रें दिवसांतून दोन दोन तीन तीन वेळां आपल्या पत्राच्या पुरवण्या प्रसिद्ध करतात. आपणांस शर्यतीविषयीं विचार मुळींच करावयाचा नसल्यानें त्यांचा उल्लेख टाळला आहे.

प्रकरण चवथें

# बातमी मिळवावी कशी ?

बातमी कशाला म्हणतात हें एकदां कळलें म्हणजे ती कशी मिळवावी हा प्रश्न साहजिकच उद्भवतो आणि आतां त्याचाच विचार करावयाचा आहे. आपल्या या विचारास आपणांस वारंवार एकाद्या वर्तमानपत्राची आवश्यकता लागणार आहे. कारण आपला अभ्यास त्याशिवाय पूर्ण व्हावयाचा नाहीं. आपलें ताजें वर्तमानपत्र उघडून पाहिल्यास त्यांतील बातमी आपण प्रथम पाहतों. त्यांत आपणांस चौपाटीवरील सभेची हकीकत आढळते. लाहोर येथें झालेल्या बाँबच्या स्फोटाचें वर्णन, बंगाल्यांत पुरानें उडविलेला कहर, मद्रासच्या हायकोर्टानें 'गांधी' टोपीवरील निर्बंध गैर कायदा असल्याचा दिलेला निर्णय, वायव्य-सरहद्दीवरील पुंडावा इत्यादि विविध बातम्या आढळतात. अर्थात ह्यांपैकीं बहुतेक 'असोशिएटेड प्रेस'च्या मार्फत (म्हणजे त्यांच्या बातमीदारां-मार्फतच) आलेल्या असल्या तरी त्यांचें वर्गीकरण करतां येतें. अपघातात्मक बाबींची बातमी वेगळी आणि ठराविक कार्यक्रमानुसार घडून येणारी वेगळी. सभा, संमेलनें किंवा कोर्टांतील खटले ह्यांची बातमी केव्हां व कोठें मिळेल हें निश्चितीनें सांगतां येतें, तसें अपघातांचें नाहीं. आज बरोबर अकरा वाजून तेवीस मिनिटांनीं २३८९ नं.ची मोटार अमुक ठिकाणीं उलटी होणार आहे असें कोणाही मानवी प्राण्यास सांगतां येत नसल्यानें तत्संबंधीं बातमी कोठें व कशी मिळेल ह्याविषयीं सकृद्दर्शनीं कोडें पडेल. पण तीही मिळण्याचे मार्ग आहेत. ओघाओघानें त्यांचा विचार करूं.

आपल्या वर्तमानपत्रांतील स्थानिक बातम्या वाचल्यास चौपाटीवरील सभा, क्वीन्सरोडवरील मोटारींची टक्कर, वरळीच्या बाजूस समुद्रतीरीं सांपडलेलीं पती-पत्नीचीं प्रेतें, देशसेविकांना झालेली शिक्षा, भेंडीबाजारांत लागलेली लहानशी आग, भायखळा भागांत पाण्याची उडालेली हाकाटी, सकाळच्या विलायती बोटीनें आलेल्या सर * * ची मुलाखत.......इत्यादि बातम्या आपल्या दृष्टीस पडतात. आतां त्या मिळाल्या कशा ह्याचा किंचित् विचार केला तर काय

कळेल ? चौपाटीवरील सभा होणार असल्याचें गाजत होतेंच. त्यावेळीं तेथें गेल्यावर काय झालें तें समजतेंच. तीच गोष्ट देशसेविकांच्या खटल्याची. त्याचा निकाल आज लागावयाचा हें मागेंच ठरलेलें होतें. विलायतेहून सर * * येणार अशी तार आली होतीच. अशा कांहीं पूर्वसंकेतानुसार घडणाऱ्या बाबी आहेत त्यांची अडचण विशेष नसते. पण भायखळ्यांत फुटलेला नळ, वरळी-कडे सांपडलेलीं प्रेतें, क्वीन्सरोडवरील मोटारींची टक्कर ह्या गोष्टी मात्र आक-स्मिक घडून आल्या आहेत. त्यांच्यावर पाळत ठेऊन बसूं म्हटलें तरी शक्य नसतें. मग त्यांची बातमी तत्काळ मिळणार कशी हा प्रश्न पडतो. परंतु कसलाही अपघात झाला असला तरी त्याची प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष नोंद कोणत्या तरी सरकारी कचेरींत किंवा निमसरकारी संस्थेंत सांपडते. आगीची नोंद ‘ फायर ब्रिगेड ’ च्या ऑफिसांत असावयाची आणि ठिकठिकाणच्या पोलिस चौक्यांवर त्यांच्या टापूंत घडलेल्या अपघाताची, खून दरवडयाची किंवा तसल्याच अप-घातांची नोंद असते. ती मिळविण्यांत मात्र चातुर्य आहे. कारण सरकारी अधिकारी कोणत्याही कायद्यानें बातमीदाराला बातमी देण्यास बांधले नाहींत. परतु वृत्तव्यवसायी म्हटला कीं त्याची जेथें तेथें ओळख अगदीं जन्मसिद्ध असल्याप्रमाणें असते. त्याला कांहीं सवलती मिळतात. आपल्या धंद्याच्या जोरावर आणि सुस्वभावानें वागून बातमीदार वाटेल तेथें जातो आणि पाहिजे ती बातमी मिळवून आणतो. कारण पोलिसांशीं मित्रासारख्या गप्पागोष्टी मारून आपणास हवी असेल ती बातमी त्याच्याकडून काढणें ही साधी बाब नव्हे. बातमीदाराच्या आंगीं असणाऱ्या अनेक गुणापैकीं ‘गोड बोलणें’ हा एक आहे. प्रसंगानुसारच त्याला काय काय गुण आंगीं असावे लागतात हें नीट समजावून सांगता येइल.

पोलिस कचेरींत किंवा चौकींत अपघातांची नोंद असली, तरी ती रोजच्या रोज वेळेवर कळण्याची व्यवस्था करावी लागते. मुंबईसारख्या अफाट शहरांत स्थानिक बातमीदारास कार्यक्षेत्र वाटून देतात. त्या त्या भागांत घडणाऱ्या अपघातांची किंवा इतर बातमीची जबाबदारी त्याचेकडे असते. रोजच्या कार्य-क्रमांत दिवसांतून दोन अथवा अधिक वेळां जरूरीप्रमाणें आपल्या टप्प्यातील पोलिस चौक्या, फायर ब्रिगेड, इस्पितळें इत्यादि ठिकाणीं फेरी मारावयाचीच, असें ठरवून टाकावें लागतें. अशा रीतीनें वेळ फार जाईल अशी भीति वाटते

आणि प्रारंभीं प्रारंभीं तसें होतें खरें. परंतु पुढें फार वेळ फुकट जात नाहीं असें कळून येईल. कारण बातमी मिळाली तर वेळ व्यर्थ गेला असें वाटणार नाहीं. शिवाय तेथील मंडळी तुमचें काम इतक्या तत्परतेनें व आस्थेनें करीत राहतील कीं तुम्हालाच आश्चर्य वाटेल ! त्याविषयीं किंचित् विस्तारानें लिहिणें आवश्यक आहे.

पोलिस चौकीवर अपघात नोंदले आहेत की नाहीत याची चौकशी करण्यासाठीं जावयाचें आहे असें धरून चालूं. तेथे कांहीं त्या अधिकाऱ्याचा सरसुपरिंटेंडंटच आला आहे अशा ऐटींत जाऊन काम होईल अशी भावना सपशेल चुकीची ठरते. तुसडी ( किंवा निःस्पृह पाहिजे तर म्हणा ) वागणूकही मुळींच उपयोगी पडणार नाहीं. 'गोडबोल्या' मनुष्याची सर्वत्र चहा कां होते त्याचें कारण लक्षांत आणावें. पोलिसांना दिवसभर कष्टदायक, कंटाळवाणें काम करावें लागतें. त्यांच्यावर दोषारोप करून त्यांना शिव्या हासडणारे किंवा त्यांना 'बोलणारे' अधिकारी असतातच. तेव्हां जेणें करून त्यांना थोडें तरी बरें वाटेल, बोलण्याला हुरूप चढेल अशी कृति व उक्ति तुमची असली पाहिजे. त्यांचें काम शिक्षेसारखें; त्यांत बोलण्यास कोणी नाहीं; साधारण जनतेची वक्रदृष्टि राज्यपद्धतीवर नसून पोलिसांवरच, अशा विपरीत परिस्थितींत पोलिस असतात. त्यांचेकडूनच, त्यांना एक छदामही न देतां बातमीदारांस आपलें काम करून घ्यावयाचें असतें. ह्या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे कसें वागावयास पाहिजे याची कल्पना येईल. चौकीवर गेल्याबरोबर, "तुमच्याकडे कोणता अपघात घडला तो सांगा" असें शिकंदरी ऐटीनें फर्मावून चालेल काय याचा विचार करावा. आपणच पोलिसचे जागीं असतों तर आपणांस तिऱ्हाइताचा असा हुकमी प्रश्न ऐकून काय वाटलें असतें हें मनांत आणावें. आणि मग "रामराम शिपाई दादा" अशा शब्दांनीं अथवा पोलिसाला थोडेसें इंग्रजी येत असल्यास "सुप्रभात" ( गुड मॉर्निंग )चा उपयोग करून बोलण्यास प्रारंभ करावा. इंग्रजींत वंदन केलें तर अशा लोकांना फार आवडतें, आपला तो बहुमान झाला असें ते समजतात आणि अशानें आपलें कार्य सुलभ होतें. नुसतें. "रामराम" किंवा 'गुड मॉर्निंग' म्हटल्यानें आपण पोलिसांस नमस्कार केला, यांत आपला अपमान झाला, लवूं नये त्याचेपुढें

डोकें वांकविलें अशा प्रकारच्या विचित्र कल्पना असणारानीं ह्या वृत्तव्यवसायाचा मार्ग मुळींच चोखाळूं नये हें बरें. असो.

अशा गोड शब्दांनीं सुरवात झाल्यावर प्रथमतः आपण कोण याची ओळख करून द्यावी लागते. पत्र नवीन असलें तर त्याची माहिती द्यावी. आपल्या पत्राचे एक दोन अंक त्यांना द्यावे. नाहीं तर पूर्वीच्या बातमीदाराचे जागीं आपण आलों असलों तर तसें सांगावें. मात्र सांगतांना विशेष खबरदारी घ्यावयाची ती दोन बाबीसंबंधानें. एक आपण पोलिसाला " आत्मवृत्त " सांगत नाहीं ही जाणीव ठेवावयाची आणि दुसरी म्हणजे आपल्या पूर्वीच्या बातमीदारांवर किंवा अन्य कोणावरही प्रथम भेटींत टीका करण्याचा मोह आवरण्यासंबंधीं. इतकें झाल्यावर मी रोज येत जाईन, असें सांगून जावें व जाण्यापूर्वी पुन्हां " रामराम " अथवा 'गुड् डे' करण्यास विसरूं नये. हेतु हा कीं, येन केन प्रकारेण त्याला आनंदी ठेवावयाचें. कारण त्याकडून आपला कार्यभाग साधावयाचा आहे. असो. पुढें पुढें असें आढळून येईल कीं तुम्हीं येण्यापूर्वीच तुमचेसाठीं सर्व तयारी करून ठेवली असून पोलिस तुम्हांस मनोभावें मदत करीत आहेत. पुनः दुसरीही एक खबरदारीची सूचना द्यावीशी वाटते व ती म्हणजे अतिप्रसंग टाळण्याविषयींची. वर सांगितलेल्या रीतीचा अर्थ पोलिसाशीं सलगी वाढविण्याचा किंवा त्याच्याशीं मैत्री जोडण्याचा नव्हे. कांहीं कांहीं अधिकारी स्नेही होण्याच्या योग्यतेचे असले तरी त्यांची पारख ' झटपट रंगाऱ्या ' प्रमाणें होत नाहीं. आपल्या सलोख्याची सीमा मनाशींच ठरवून ठेवावी. ती सहसा आपण ओलांडूं नये. त्यांसही तिचें उलंघन करूं देऊं नये. आब न जाईल असें रहावें आणि कार्यभाग तर उरकून घ्यावा. ह्या गोष्टी किंचित अवघड आहेत. पण विचारानें वागल्यास त्यांत त्रास मुळींच वाटणार नाहीं.

एकदां पोलिसाशीं कसें वागावयाचें हें कळलें म्हणजे मग इस्पितळें, फायर ब्रिगेड अशा ठिकाणाबद्दल इतक्या सविस्तर सूचना द्यावयाची आवश्यकता उरत नाहीं. आपल्या गोड शब्दांचा मोबदला देऊन त्यांचेकडून आपणांस आपलें काम करवून घ्यावयाचें आहे, हें सदैव लक्षांत बाळगावें. ही अशी मंडळीदेखील तुमचेसाठीं काम करतात, त्यांत त्यांचाही स्वार्थ असतोच. त्यांना

बोलणीं ऐकावीं लागतात तीं खाण्यासाठींच ! त्यांचें कामच असें असतें कीं, मनाचे सर्व व्यापार थंडावून जातात. आणि एखाद्या निर्जीव यंत्राप्रमाणें विकाररहित त्यांना व्हावें लागतें. अशांना कोणीं साध्या गोष्टी बोलावयास मिळालें तरी आनंद होतो. तुम्ही इतर ठिकाणच्या खबरा, गांवांत प्रसृत असलेली बातमी त्यांना सांगितली म्हणजे त्यांना आनंद झाला तर आश्चर्य नाहीं. असें परस्परांचें कार्य साधतें. तेव्हा मोठ्या कुशलतेनें अशा सरकारी व निम-सरकारी ठिकाणाहून आपणांस अपघाताची माहिती मिळवितां येते.

पण तेवढयावर मुळींच भागत नाहीं. ती माहिती पोलिसांना पुरेशी असली, तरी वर्तमानपत्रांत त्याहून अधिक हकीकत पाहिजे असते, व ती कशी मिळवावी हेंही पाहिलें पाहिजे. क्वीन्स रोडवर मोटारीचा अपघात झाला म्हणून आपण वाचलें त्याविषयीं काय काय माहिती पोलिसांकडून मिळेल असा विचार केला तर इतर अवांतर पण आवश्यक माहिती कोणती तेंही समजेल. ज्या दोन मोटारींची टक्कर झाली त्यांचे नंबर, हाकणारांचीं नांवें, कोणकोणत्या दिशेनें येत होत्या, चूक कोणाकडे होती आणि जखमी माणसें किती झालीं वगैरेची नोंद पोलिसाना ठेवावीच लागते आणि ती ठेविली जाईल देखील. पण इतक्यावरच बातमीदाराचें काम भागत नाहीं. एवढया माहितीवरून लिहावयाचें म्हटलें तर:—

> " आज दुपारीं ३॥ वाजण्याचे सुमारास येथें क्वीन्स रोडवर मरीनलाइन्स स्टेशननजीक नं. Z २३८४ व नं. Y ८० ह्या दोन मोटारींची टक्कर होऊन सात आठ माणसाना दुखापती झाल्या आहेत. दोन्ही मोटारी निकामी झाल्यासारख्या दिसतात. जखमी इसमांना तत्काळ हास्पितळांत पोहोंचविलें आहे. कोणाकडे चूक होती याविषयीं अद्याप सविस्तर माहिती कळली नाहीं. "

इतकी माहिती अर्थातच अपुरी आहे. यापेक्षां अधिक हकीकत पोलिसां-कडून मिळणें शक्य नसलें तरी त्याहून भिन्नमार्गांनें अधिक विस्तृत हकीकत कळण्याची शक्यता असते. नुसते मोटारीचे नंबर देऊन भागत नाहीं. मोटारींत कोण कोण मंडळी होती हें सांगावें लागतें. जखमी इसमांचीं नांवें मिळाल्यास

उत्तम. इस्पितळांत जाऊन जखम्यांची अगदीं ताजी खबर मिळवितां आल्यास फारच बरें. तसेंच मोटारींतील मंडळींची कांहीं जास्त माहिती मिळाली, ती कोठून आली, कोठें चालली होती वगैरे समजलें तर बातमी विशेष वाचनीय ठरेल यांत संशयच नाहीं. कदाचित् ती मोटार एखाद्या संस्थानिकाची असेल, किंवा कोणी डॉक्टर आसन्नमरण अशा रोग्याला वाचविण्यास जात असेल.... आणखीही पुष्कळ प्रकार असे असूं शकतील कीं जेणेंकरून त्या अपघाताच्या बातमीस अधिकाधिक महत्त्व येईल. आपणांस वाचकांची सेवा करावयाची आहे हें बातमीदारानें केव्हांही विसरूं नये. आणि सेवा करावयाची म्हटली कीं, ती शक्य तितकी परिपूर्ण करीत असावी. उगीच 'सेवा केली' 'कर्तव्य बजावलें.' ह्या शपथेंतून मोकळें होण्यासाठीं जुजबी काम केव्हांही करावयाचें नाहीं — तसें करून भागणार नाहीं — हें पक्कें ध्यानांत ठेवावें. लोकांना काय जाणण्याची उत्सुकता असते आणि तें आपण बरोबर कळवितों कीं नाहीं याचें आत्मनिरीक्षण नेहमीं चालू ठेविलें म्हणजे काय करावयास पाहिजे हें कळेल.

मोटारीच्या अपघातांविषयीं पुढें सांगावयाचें राहिलें. तें असें कीं, प्रत्येक अपघात घडून येतो तेव्हां स्वतः बातमीदार तेथें हजर नसला तरी इतर कोणी तरी तेव्हां तेथें यदृच्छया येतोच. त्याचेकडून आपणास पुष्कळ गोष्टी कळतात. त्याचें टिपण करावें. त्यांना प्रश्न विचारून अधिक माहिती काढावी. तसेंच इस्पितळांत जाऊन जखमी माणसांना विचारून किंवा तेथील डॉक्टरांकडून आपणांस हवी असेल तितकी अवांतर हकीकत मिळवावी. जखमी लोकांच्या प्रकृतिमानाकडे लक्ष द्यावयाचें असतें हें या ठिकाणीं विसरून चालणार नाहीं. बहुतेक वेळां इस्पितळांत नेलेले जखमी इसम बेशुद्ध होतात आणि त्यांना कसलाही त्रास सहन करण्याची ताकद राहिलेली नसते. डॉक्टरांची सुद्धां आज्ञा त्यांना कोणतेंच — बोलण्याचे सुद्धां — श्रम करूं न देण्याची असते. अशा वेळीं आपलें काम अधिक महत्त्वाचें असल्याचा विनाकारण बहाणा करून त्यांच्या स्वास्थ्यास धक्का लावण्याचा प्रयत्न मुळींच करूं नये. डॉक्टरांनीं अशा रुग्णांची बरीच माहिती लिहून घेतलेली असते आणि तिचा बातमीदारास उपयोग करून घेतां येतो. मात्र पुनः पुनः तोंडांत नेहमीं 'साखर' धरण्याचा सल्ला द्यावासा वाटतो.

मोटार मालकांकडून किंवा जखमी मंडळींच्या आप्तेष्टांकडून कित्येक वेळां उपयुक्त बातमी कळते. त्यांना भेटून ती मिळवावी. अशा प्रसंगींसुद्धां केवळ स्वार्थी दृष्टी ठेऊन आपणांस पाहिजे तेवढेंच मोजक्या शब्दांत बोलून निघून जाऊं नये. बातमीदार झाला म्हणजे तो माणुसकी विसरला असें होत नाहीं. एखादे वेळेस अपघात झाल्याची पहिली खबर बातमीदाराकडूनच कुटुंबीयांस कळते. तेव्हां घरातील जाणत्या मनुष्यास एका बाजूला नेऊन सावकाशीनें तो न घाबरेल अशा बेतानें सर्व प्रकार नीट समजाऊन द्यावा. त्याची चिंता दूर करावी. निष्कारण काळजींत त्याना पाडूं नये. उलट एक वेळ त्या अपघाताची यथार्थ कल्पना न देतां अगदीं साधीच जखम झाली आहे असें सांगितलें तरी चालेल. पण अतिशयोक्तीचें वर्णन करण्याची कित्येकांना संवय असते तसें होऊं नये. त्यानें विपरीत परिणाम घडण्याचा संभव बराच असतो. विशेषतः घरांत वृद्ध मंडळी किंवा स्त्रिया असतील तेव्हां या सूचनांकडे अधिक लक्ष पुरवावें लागतें. सहानुभूतीचे चार दोन शब्द बोलून अवश्य ती मदत करण्याची तयारी दर्शवून मगच तेथून जावें. ही इतकी सविस्तर शिकवण विषयांतराचा दोष पत्करूनही द्यावी लागते, कारण हा धंदा करणारे नव्यानेंच समाजांत वावरत आहेत. समाजाला देखील चांभारचौकशीला येणाऱ्या या मंडळींची ओळख नाहीं. त्यांचें काम किती महत्त्वाचें आहे हें सर्वांनाच नीट-पणें कळलें आहे असें नव्हे. तेव्हां अपरिचित कार्यांत गैरसमज होण्याचा पुष्कळच संभव आहे. आणि पुष्कळ वेळां अश्लाघ्य असें वर्तन नवशिक्या बातमीदारांकडून अजाणता घडतें, तें घडूं नये, त्यांचा मार्ग सुकर व्हावा यासाठींच ह्या अनुभवाच्या खडया गोष्टींची इतकी विस्तारानें वाच्यता करावी लागत आहे.

ही सर्व विस्तृत माहिती मिळवितांना एक गोष्ट प्रामुख्यानें लक्षांत ठेवावयास पाहिजे. आणि ती अचूकतेची. वर्णन, हकीकत, वृत्तान्त आपण कमी दिला तर एक वेळ चालेल. परंतु सविस्तर वर्णन पण तें चुकीचें देऊन चालणार नाहीं. त्यानें आपल्या वर्तमानाचा बोज कमी होतो तो होतोच; पण एखादेवेळीं कायद्याच्या कचाटींत संपादक सांपडून पत्राला आर्थिक नुकसान सोसावें लागतें. बातमीदाराची क्षुल्लक चूक झाली तरी तिला जबाबदार संपादकच असतो. आपल्या हलगर्जी-पणामुळें दुसऱ्यास शिक्षा भोगण्याचा प्रसंग यावा यासारखी आपत्ति कोणतीच

नाहीं. बातमीदार पुढें येऊन, 'मी असें केलें, मला शिक्षा द्या' असें म्हणूं लागला तरी कायदा संपादकालाच धरतो. तेव्हां प्रत्येक बाब तोलून, घासून, पुसून, पारखून घेतलेल्या माणकांप्रमाणे असावी. यासाठीं वेगवेगळ्या ठिकाणची माहिती एकत्रित केल्यानंतर विश्वसनीय कोणती व ती का याचेंही कारण दर्शवावें लागतें. अशा प्रसंगीं बातमीदार हा केवळ संजयाचेंच काम करीत असतो. वाचकांना तो अपघात पाहतां आला नाहीं, खुद्द बातमीदारानेंही तो प्रसंग प्रत्यक्ष पाहिला असेल अथवा नसेल; पण त्याचें वर्णन असेंच करावयास पाहिजे कीं, त्यांत कोणावर जाता जातां ' लेखणीसौख्य ' घेऊं नये. झालें तसें सांगतां येणें ही सोपी बाब नव्हे. असो.

वरचा मोटारींचा अपघातच पुढें चालू ठेवावयाचा असल्यानें त्यांतील अधिक माहिती काय काय मिळते तें पहावयाचें आहे. अपघात घडला त्यावेळीं तेथें हजर असलेली मंडळी भेटली नाहीं तरी, मरीन लाइन्स स्टेशनवरील कोणी तरी रेल्वे अधिकाऱ्यानें तें पाहिलें असेल. त्याला त्या अपघाताची थोडी बहुत माहिती असावी. जवळपास असलेल्या इमारतींतलि कांहीं बिऱ्हाडकरूंना तर ह्यासंबंधीं पुष्कळच हकीकत कळलेली असेल. पोलिसांकडून आपणास मिळाली तेवढी हकीकत पुढील चौकशी करण्यासाठीं पुरेशी असते. इस्पितळांत जाऊन जखमी इसमांचीं नावें, धंदा, पत्ता मिळतो. त्याची दुखापत कितपत आहे त्याचा तपास लागतो. त्याच्या घरीं जाऊन थोडीशी वैयक्तिक माहिती कळते. इतकें झाल्यावर त्या अपघाताचें वर्णन असें होईल.

आज दुपारीं ३॥ वाजण्याचे सुमारास प्रिन्सेसस्ट्रीट क्वीन्सरोडला येऊन मिळतो तेथें मोटारींचा फारच भयंकर अपघात होऊन डॉ. × × × F. R. C. S. यास जबर दुखापत झाली. शिवाय इतर चार माणसें दुखावलीं. त्यात श्री. × × × व त्यांची कन्या ह्या दोन स्त्रिया आहेत. पेडर रोडवर शेट × × × ह्याच्या मुलाला पाहण्यासाठीं डॉ० आपल्या Y. ८० नं. च्या मोटारींत बसून प्रिन्सेस स्ट्रीटवरून क्वीन्सरोडला मिळत असतानांच कुलाब्याकडून येणाऱ्या Z २३८४ नं. च्या मोटारीशीं टक्कर झाली. दोन्ही मोटारहांक्यास थोड्याबहुत जखमा झाल्या

असून २३८४ च्या मोटारींतील दोन्ही स्त्रिया मात्र भीतीनेंच विशेष घाबरलेल्या दिसतात. त्यांना थोडें फार खरचटलेलें आहे. डॉ० च्या डाव्या हातास बराच मार लागलेला असून त्यांच्या डोक्यास कशाचा तरी जोराचा घाव बसल्यामुळें एक मोठी खोक डाव्या कानावर पडलेली आहे. सुदैवानें त्याच वेळीं दुसरे एक डॉक्टर ऑपेरा हाउसकडून येत होते. त्यांनीं आपली मोटार थांबविली. सर्वांना जरूर तो मलमपट्टी बांधून तात्काळ इस्पितळांत पोहोंचविलें. मोटर नं. ८० चा ड्रायव्हर अजून बेशुद्धच आहे असें कळतें. कारण त्याच्या तीन जखमा हातावर, पोटाच्या बाजूस आणि डोक्यावर असल्यानें त्यांतून रक्तस्राव फार झाला. ह्या ड्रायव्हर शेजारचा एक इसम कांहीं जखम न होता निसटला असें दिसतें.

डॉ. ×××चा मोटारहाक्या आज १०–१२ वर्षें मुंबईत काम करणारा असून दुसरा मात्र गेल्या वर्षींच परवाना मिळालेला आहे. वळणावर डॉ. × × × च्या मोटारहाक्यानें हॉर्न वाजविलेला होता असें म्हणतात आणि दुपारच्या वेळीं रस्त्यावर रहदारी विशेष नसते तेव्हां कुलाब्याकडून येणारी मोटार जरा अधिक वेगानें जात असावी. त्यामुळें हॉर्न ऐकूं आलें नसावें किंवा ऐकूं आल्यानंतरही मोटार थांबविता आली नाहीं अशापैकींच कांहीं तरी प्रकार होऊन दोन्हीं मोटारी निकामी होऊन पडलेल्या दिसतात. डॉ. च्या मोटारीचा विमा उतरलेला आहे म्हणतात. श्री. ××× ह्या आपल्या बंधूस पोहोंचविण्यासाठीं बोरीबंदरवर गेल्या होत्या. आदल्याच आठवड्यांत ते विलायतेहून आले आणि लाहोरला कामासाठीं पंजाब मेलनें रवाना झाले. म्हणून स्टेशनवर त्यांची भगिनी व भाची गेल्या होत्या. दोघांनाही मलमपट्टी बांधून घरीं पोहोंचविलें आहे.

ह्या किंवा अशा बऱ्याच गोष्टी भरून ती अपघाताची बातमी वाचनीय करावयाची. बातमीदारानें ती माहिती कशी काढली याचें वाचकांना कौतुक वाटावें. इतर लोकांना तोंडातोंडी ह्या गोष्टी कळतात. पण त्या तशा कळण्यापूर्वी चलाखीने आपलें काम आटोपून सर्व माहिती देण्यांत बातमीदाराची कर्तबगारी दिसून येते. आणि त्या वर्तमानपत्राचा खप, बोज आणि दर्जा वाढतो.

आतांपर्यंत झालेल्या विवेचनावरून कोणत्या कोणत्या कारणास्तव लोकांना बातम्या वाचाव्याशा वाटतात हें कळलें असेलच. नाहीं पेक्षां थोडें अधिक स्पष्टीकरण केलें म्हणजे बातमी मिळवितांना कोणत्या चष्म्यानें पहावें व कोणती माहिती घ्यावी आणि कोणती टाकावी हें कळेल. मोटारीचाच अपघात घ्यावयाचा तर प्रथमतः अपघाताच्या बातमीस महत्त्व कां हा प्रश्न उद्भवतो. मनुष्य केव्हां ना केव्हां तरी मरणार हें जरी प्रत्येकास ठाऊक असलें तरी मरण जेणेंकरून जवळ येतें, अचानकपणें येऊन मानवास ग्रासून टाकतें, इत्यादीं-मुळेंच मनुष्याचे मनांत अनेक विकार व विचार उद्भवतात. आपणही मनुष्यच आहोंत......आपणही पुष्कळ वेळां मोटारींत बसतो......आपला जुना मित्र तर स्वतःच मोटार हांकतो......इत्यादि नाना भीतिप्रद कल्पना एका निमिषार्धांत मनापुढें येतात. आणि असा अपघात फार वाईट असें वाटावयास लागतें. म्हणून अपघाताच्या बातम्या लोक वाचतात. वाचून पुष्कळ हळहळ-तात; कांहीं थोडे धडा घेतात. त्यांतल्या त्यांत वृद्ध माणसें, मुलें, स्त्रिया, अशी मंडळी असली कीं जात्याच मनुष्याच्या भावना जागृत होतात. म्हणून बातमी देतांना वयोवृद्ध मनुष्य, लहान मूल किंवा स्त्रिया यांचा संबंध पहावा लागतो. करुणा, माया किंवा शोक उत्पन्न करण्याची ही जिवंत साधनेंच होत. स्त्री-जातीस, ' बाबालोकांस ' आणि वयोवृद्धांस समाजांत वावरतांना निसर्गसिद्ध पण अलिखित हक्क व सवलती आहेत आणि समाज देखील कुरकुर न करतां त्यांना ते बजावूं देतो, याचें कारणही उघड आहे. त्याच कारणासाठीं बातमींत त्यांच्या संबंधाला महत्त्व आहे. परदेशी कापडाच्या दुकानापुढें पिकेटिंग करणारा-वर रोज खटले होत आहेत. पण त्यांचा उल्लेख ' कंठाळी ' स्वरूपांत होतो. " २६ स्वयंसेवकांस पिकेटिंगबद्दल मॅजिस्ट्रेटनीं प्रत्येकीं सहा महिने सक्त मजुरीची शिक्षा ठोठावली. " पण दोनच स्वयंसेविकांवर त्याच गुन्ह्याबद्दल खटला चालू असला तर त्यांच्या बारीक सारीक गोष्टी सांगून २–२॥ कॉलम

खर्ची घालण्यास संपादक परवानगी देतो याचें कारण 'आरोपी' कंकण विभूषित आहेत हेंच होय! ह्या एकाच उदाहरणावरून बातमी मिळवितांना व्यक्तिमाहात्म्याकडे किती लक्ष द्यावें लागतें हें कळेल.

दुसरी बाब सविस्तर माहिती देण्यासंबंधीं. "पांच इसम जखमी झाले" असें संदिग्ध म्हटल्यानें फार घोटाळा उडतो. ते कोण आहेत, सध्या कोठें आहेत, त्यांची प्रकृति सुधारत आहे किंवा नाहीं हें जाणण्याची प्रत्येक वाचकाची इच्छा असते. त्या अपघातांत सांपडलेल्या मनुष्याची स्वार्थासाठीं किंवा परार्थासाठीं धडपड असेल, त्या मानानें लोकाना त्यांची अधिक चौकशी करावीशी वाटते. म्हणून इतके दिवस अज्ञात असलेला गोमा गणेश एकदम 'लोकमान्य वीर' होऊं शकतो आणि तें काम वृत्तपत्रांच्या मार्फतच होत असतें. म्हणून बातमीदारास दूरदृष्टि ठेऊनच विचार करावा लागतो. समजा, बाबू गेनूच्या बलिदानाचे वेळीं त्याला कसलीही थोर यदवी न देता एकाद्या नवशिक्यानें "एक कांग्रेस स्वयंसेवक मोटार पुढे आडवा पडला व मोटर गेली तरी हालला नाहीं" असें लिहिलें तर त्यांत त्याची केवढी भलतीच चूक होईल! त्या वर्तमानपत्रावर एकदम बहिष्कार पडेल! आणि त्याचें कारण फक्त दूरदृष्टीचा व खऱ्या चष्म्याचा अभाव.

तिसरी बाब सहानुभूतीची. आपणांस सर्वांशीं सहानुभूतीनें कां वागावें लागतें हें पाहिलें पाहिजे. वाचकांत सर्वच जण अपघातांत सांपडलेल्यांचे स्नेही असतील असें नव्हे. कित्येक अकारण वैरी देखील असतील. परंतु खासगी अथवा वैयक्तिक भावनाना वृत्तपत्रांत बातमी देतांना किंमत देऊन चालत नाहीं. समुदायाच्या भावनांकडे, समाजाचें एक मन आहे, असें मानून पहावें लागतें. वर्तमानपत्र एकाच व्यक्तीकरतां असलें तर गोष्ट वेगळी. तेव्हां, मोटारीचा अपघात वर्णन करतांना एखादा ड्रायव्हर निष्काळजी असल्याचे ठाऊक असलें तरी तसें शाबीत झाल्याखेरीज त्याचा उल्लेख करूं नये. एक तर त्यायोगें त्याची बदनामी होऊन संपादकावर फिर्याद होऊं शकते आणि दुसरी मुख्य म्हणजे अपघाताचे वेळीं हे दोष काढणें अप्रशस्त व गैर आहे. अपघाताचें प्रथम वर्णन देतांना केवळ घडलेल्या गोष्टीसच प्राधान्य देऊन जेणेंकरून वाचकाच्या मनांत सहानुभूति व पुढील बातमी जाणण्यासाठीं कुतूहल उत्पन्न होईल अशाच बाबींचा निर्देश करावा. समाजातील सर्व घटकांमध्यें आत्मीयत्वाचें वारें

खेळावें म्हणून सहानुभूतीच्या दृष्टीची जरूरी आणि आपल्या पत्राला गिराईक सारखें मिळत रहावें म्हणून कुतूहल वाढविण्याची आवश्यकता. अपघातांत सांपडलेल्या व्यक्तींची नावें, त्यांचा थोडासा इतिहास, दूरान्वय लावून एकाद्या थोर व नामांकित नागरिकांशीं संबंध वगैरे गोष्टी देण्यांत, वाचकांचें कुतूहल जागृत करावें हा हेतु असतो. शिवाय वाचकानांही असल्या बाबतींत अधिकाधिक शिरून चौकशीचें लोण कोणत्या तरी थोरामोठयाचे दारीं नेऊन पोहोंचविल्याविना बरें वाटत नाहीं.

आणखीही गोष्ट सांगावयाची राहिली, डॉ. × × × एका रोग्याला पहाण्यासाठीं जात होते. त्यांचें काम अर्धवटच राहून उलट त्यांनाच इस्पितळांत जावें लागलें. परंतु त्यांनीं जखम झाली असतांनाच "××× शेटना कळवा कीं मला येतां येत नाहीं" असें म्हटलें किंवा दुसेर जे डॉक्टर अपघात झालेल्या ठिकाणीं आले होते त्यांस सांगून "× × × शेटजीकडे पेडर रोडवर मुलगा आजारी आहे, मला जातां येत नाहीं. तुम्हीं जा" अशी विनंति केली तर ही बाब बातमींत येऊं शकेल. याच्या उलट दोन्हीं ड्रायव्हरांची सारखी चाललेली बाचाबाची त्याज्य म्हणून तिकडे पहाण्याचें कारण नाहीं. मनाचें औदार्य, कर्तव्यनिष्ठा, स्वार्थत्याग इत्यादि उच्च सद्गुणांचा परिपोष होईल अशाच गोष्टींना महत्त्व देऊन बाकीच्या नेहमींच्या व्यवहारांतील क्षुद्र बाबींकडे कानाडोळा करणें हें बातमीदारास कळलें पाहिजे.

मोटारीचा हा अपघात उदाहरण म्हणून घेतला. त्याची माहिती किती द्यावयाची, कशी मिळवावयाची आणि कोणती वगळावयाची इत्यादि बाबींचा सविस्तर विचार झाल्यानंतर आणखीही कांहीं प्रकारचे अपघात कसे निवेदन करावयाचे तें सांगितल्यावर इतर बातमीकडे वळावें हें बरें.

प्रकरण पाचवें

# अपघात निवेदन

मोटारीची टक्कर घडून येते तशाच प्रकारें अत्यंत अनिश्चित असे किती तरी अपघात घडत असतात. त्याची बातमी देण्याचे प्रसंगही बातमीदारांवर नेहमीं नसले तरी मधून मधून येतात. आगी लागण्याचा संभव कापसाच्या वखारी अधिक जेथें आहेत तेथें असावयाचा. आणि वस्तुतः प्रत्येक ठिकाणीं आग लागणें व मालमत्तेचें नुकसान होणें ह्या गोष्टी शक्य असल्या तरी साधारण वाचकांचे मानानें मुंबई सारख्या व्यापारी शहरांतील आगींना महत्त्व येतें. एखादे वेळीं मात्र दोन दोनशें तीन तीनशें झोंपडया पेटून पुष्कळच प्राणहानि होते तेव्हां देखील बातमी महत्त्वाची होऊं शकते. याच्या उलट, पुष्कळ वेळां डोंगरांवरील वणवे पेटून नुकसान बरेंच होत असलें तरी त्याची बातमी वर्तमानपत्रांत येत नाहीं. याचें कारण त्यांचा प्रत्यक्ष असा मनुष्याशीं कांहीं संबंध येत नाहीं. पण एकादा शेतकरी किंवा त्यांचीं बरीचशीं गुरेंढोरें आगींत सांपडून शहरगांवीं इस्पितळांत आलीं तर त्या वणव्याची बातमी द्यावी लागेल. नुसता अपघात झाला एवढयानें प्रत्येक घडामोड बातमी होऊं शकत नाहीं हें मागें अनेक उदाहरणें देऊन स्पष्ट केलेंच आहे.

आगींचें वर्णन देतांना खालील बाबींचा उल्लेख अवश्यमेव केला पाहिजे. नाहीं तर ती बातमी अपुरी वाटते.

१. आग कोठें, व कशी लागली

२. जीविताची आणि / अथवा मालमत्तेची हानि

३. आग विझाविण्याचे प्रयत्न कोणी, कसे केले

४. आगीचें कारण

५. विमा उतरला आहे किंवा नाहीं

६. इतर अवांतर प्रसंग अथवा गोष्टी

प्रत्येक अपघातांत हें नीट लक्षांत ठेवलें पाहिजे कीं कोठें, केव्हां, काय, घडलें याचा प्रथमतः वाचकांस नीट उलगडा झाला पाहिजे. नुकसानाची

बाब कळवावी लागते याचें कारण तिकडेच प्रथम प्रत्येकाचें लक्ष लागतें. नाहीं तर १००।२०० रुपयांचें नुकसान करणारी आग बातमीच्या सदरांत येऊं शकत नाहीं. परंतु आग लागण्याचें कारण विचित्र असेल, किंवा ती एखाद्या नामांकित दुकानदाराच्या वखारीस लागली असेल तर मात्र ती बातमी होऊं शकेल. घडलेल्या हकीकतीस बातमीचें महत्त्व देण्यास ज्या गोष्टींची अवश्यकता असल्याचें सांगितलें त्यापैकीं एक अथवा अनेक बाबीं मिळून, संबंध एका क्षुल्लक अपघाताशीं आला तरी तो बातमीच्या वर्गात जाऊन बसेल. तें बातमीचें लक्षण सदा सर्वदा लागूं पडणारें म्हणून लक्षांत ठेवावें.

आग विझविण्याच्या प्रयत्नांचा उल्लेख करतांना एक सूचना देऊन ठेविली पाहिजे. पहिल्या पहिल्यानें बातमीदारानें नुसती निरीक्षकाचीच दृष्टि ठेवणें आवश्यक आहे. पूर्वग्रहांचा परिणाम कांहीं काळ तरी काढून टाकावा लागतो. मुंबईची व्यवस्था वगळली तर बहुतेक सर्व ठिकाणीं आगीच्या बंबावर – ते ठेवणाऱ्या संस्थांवर – सडकून टीका करावी असा अनिवार मोह होण्याच्या योग्यतेची त्यांची कार्यक्षमता असते. तीच गोष्ट पोलिस, हलक्या दर्जाचे सरकारी नोकर व बरेचसे बेपरवा नागरिक यांच्यासंबंधीं दाखवितां येईल. आगवाल्यानें आगीचा बंब वेळेवर आणला नाहीं, पोलिसानें अपघात होत असता जखमी झालेल्यास योग्य मदत केली नाहीं किंवा रस्त्यांत एखादा मुलगा आपल्या सायकलच्या धक्कयानें पडला असला तरी तिकडे लक्ष न देता आपल्याच तोऱ्यांत नागरिक निघून गेला, आणि म्हणून त्याचें वर्तन गर्ह्य व निंद्य ठरत असलें तरी त्यांवर ताशेरा झाडण्याचें काम नवाशिक्या बातमीदारानें करावयाचें नसतें. अपघाताचें वर्णन करतांना तर मुळींच नाहीं. त्या त्या व्यक्तींचे दोष दाखवून त्याना ताळयावर आणण्याचे मार्ग वेगळे आहेत. मात्र बातमी देण्यांत कोणत्याही प्रकारची कसूर करूं नये. अचूक माहिती, टीका टाळूनही देतां येते. "आगीचा बंब सुस्थितींत ठेवण्याची म्युनिसिपालिटीस आवश्यकता वाटत नसल्यानें आग विझत आली तरी देखील तो पाठविला नाहीं" असा समोरासमोरचा वार न करतां, "आग लागून तीन तास झाले तरी ती विझविण्यासाठीं बंब येऊं शकला नाहीं. कदाचित् त्यांत कांहीं बिघाड झाला असावा" अशी सूचित टीका केलेली अधिक बरी. कारण टीका करण्याची चटक एकदा लेखणीस लागली कीं मग तिचें रूपांतर व्यसनांत होऊन स्वैर

वर्तनास प्रारंभ होतो. वर्तमानपत्र एकाद्या निःपक्षपाती न्यायाधीशानें चालविलें असलें तर कदाचित् त्यात घडलेल्या गोष्टी जशाच्या तशा येतील. परंतु बातमीच्या प्रत्येक सदरांत थोडी बहुत प्रचार दृष्टीची टीका येत असल्यानें व ती कशी करावयाची याचें ज्ञान शिकावयाचें असल्यानें प्रथमतः वृत्तात घडला तसा लिहिण्याचा म्हणजे त्यांत टीकेचा अंश न आणण्याचा धडा गिरवितां येणें आवश्यक आहे, म्हणून ही सूचना आधीं दिली.

राजकारणांतील बातमी देण्याचे वेळीं वरील महत्त्वाचा मुद्दा नीटपणें लक्षांत येईल. पण तूर्तास आपण अपघाताचीच चर्चा करीत असल्यानें त्याविषयीं लिहितांना काय खबरदारी घेतां येईल ते पाहूं. मोटारीखालीं एखादा गरीब मजूर सांपडून अत्यवस्थ झाला तर त्यासंबंधीं वर्णन करतांना बातमीदाराची मनोवृत्ति जिकडे झुकली असेल त्या मानानें त्याचें धोरण राहील उदाहरणार्थः—

१ अलीकडे मोटर-हाके फारच बेदरकारपणें मोटारी चालवितात. त्यांना दुसऱ्याच्या जीविताची मुळीच परवा नसते.

२ मुंबईत राहून सुद्धां नागरिकांनीं मोटारीपासून आपला बचाव कसा करावा याकडे लक्ष देऊं नये म्हणजे काय ? रस्ता जसा कांहीं त्यांना आंदण मिळाल्याप्रमाणें रस्त्यातून ते जातात व वाहतुकीला विघ्नें आणतात.

३ भाडवलवाल्याना अहंकार किती असतो व गरीब मजुराच्या प्राणाबद्दल ते किती बेफिकीर असतात हें या अपघातावरून दिसून येईल.

४ पाश्चिमात्य सुधारणेचा मोठा दोष तो हाच. या नवीन यंत्र-यांनानीं दळणवळण सुलभ होतें खरें; पण त्यांचा आहार दांडगा दिसतो. मनुष्यरक्ताचा त्यांना रोजचा खुराक पाहिजे. रोजीं दोन तीन तरी बळी मोटारीला द्यावे लागतातच.

अशा टीका करून अपघाताचें वर्णन करतां येईल. आणि बहुतेक बातमीदारांच्या हातून कळत वा नकळत ती होतेच. कारण बातमीदारास आपलें मत विसरण्याची – आपले स्वत्त्व वेगळें राखण्याची – संवय नसते. अगदीं नेहमीं ढोबळपणें डोळ्यात भरणारें उदाहरण हिंदु-मुसलमानाच्या तंट्याचें पहावें. अपघातापैकींच ही हकीकत आहे. " हिंदूंनीं वाद्यें वाजवून कुरापत काढली " असें मुसलमान म्हणतात तर " मुसलमानानींच आगळीक करून मशिदींतून हल्ला केला " असें हिंदूंचें म्हणणें असतें. आणि ज्या त्या पक्षाचीं पत्रें आपल्याच मतांना – आपल्या बाजूच्या बातमीदारांना – मान्यता देतात.

तेव्हां हें सर्व लक्षांत ठेऊन प्रथमतः निःपक्षपाती दृष्टीनें प्रत्येक घडामोड पहाण्याची निरीक्षण शक्ति वाढविणें नवशिक्या बातमीदाराचें काम आहे. बातमीला कोणता रंग चढवावयाचा किंवा तिजकडे कोणत्या चष्म्यांतून पहावयाचें हें मागाहून ठरवूं

आगीच्या अपघातासारखें आणखीही पुष्कळ अपघात असतात. त्यांतही खालील माहिती अगोदर मिळविली पाहिजे हें लक्षात ठेवावे.

**आगगाड्यांची टक्कर — किंवा कसलाही अपघात**

केव्हा, कोठे, कसा...

प्राणहानि – इतर नुकसान ( टपाल )

जाया झालेल्याची शक्य तो नावें – हुद्दा – त्यांची सोय उपचार इतर उतारूंची व्यवस्था अपघाताचें कारण – पुढील व्यवस्था

आगगाडीतून महत्त्वाचें टपाल जात असल्यानें त्यास हानि पोहोंचली आहे कीं काय हें पाहिलें पाहिजे. कारण टपालात पुष्कळांचे हितसंबंध असतात. पिशव्या जळाल्या किंवा गमावल्या असल्या तर त्या कोठल्या, रजिस्टर्ड, इन्शुअर्ड का साध्या टपालाच्या वगैरे शक्य ती सविस्तर माहिती मिळवावी. उतारूंच्या बाबतीतही तीच गोष्ट. कोणत्या वर्गाचे किती उतारू दगावले त्यांचीं नावें, हुद्दा वगैरे सर्व पूर्ण माहिती मिळेल तितकी द्यावी. कारण " रायचूर पॅसेंजर मधील २७ उतारू जखमी झाले " असेंच नुसतें लिहिल्यानें सर्वच असंदिग्ध राहतें. आणि वाचकापैकीं कोणाचे तरी संबंधी त्या आगगाडींत असणार, त्यासाठीं त्यांना काळजी वाटणें साहजिकच आहे. अर्धवट बातमीनें काळजी वाढते हा तर आपला नेहमींचाच अनुभव आहे. म्हणून होतां होईल तों बातमी पूर्ण असावी. काळजी करणारांना चिंतेचें कारण उरूं नये, अशा प्रकारची तिच्यात बातमी असली म्हणजे ती वाचून वाचकांना समाधान वाटतें आणि वर्तमानपत्राची उपयुक्तता त्याच्या लक्षांत येते. तसेंच आगगाडीचें वर्णन देतांना गाडी कोणती हें नक्की सांगावें. कारण ' मद्रास मेल ' म्हणजे कोणती गाडी हें ओळखतांना वाचकाना संदेह पडूं नये. ' मद्रास मेल ' म्हणजे मद्रासला जाणारी किंवा मद्रासहून येणारीही असूं शकते. त्यामुळें उडणारा घोटाळा टाळण्यासाठीं इंग्रजीत ' अप ' किंवा ' डाऊन ' असें म्हणतात, पण पण मराठींत स्पष्टपणें कोठून येणारी किंवा कोणीकडे जाणारी तें निर्दिष्ट करावें; म्हणजे समजुतीचा घोटाळा उडणार नाहीं.

याचप्रमाणें खून, आत्महत्या, मारामारी वगैरे प्रकारच्या अपघातांत नीट काळजीपूर्वक बातमी द्यावी लागते. त्यातील मुख्य मुद्याच्या गोष्टी : —

१ कोण, कोठला राहणारा, केव्हां दिवंगत झाला

२ खून ( आत्महत्या ) कशा रीतीनें झाला

३ उघडकीस केव्हां व कसा आला

४ मृताचा थोडा इतिहास जेणंकरून आत्महत्येच्या वा खुनाच्या कारणांवर प्रकाश पडेल

५ पोलिस तपासाला यश कितपत आलें

६ उर्वरित कुटुंबियाची हकीकत

असल्या अपघातांत एक वेगळीच काळजी घ्यावी लागते ती म्हणजे मृताची किंवा इतर कोणाही व्यक्तीची वा संस्थेची बेअब्रू होऊं न देण्याची. ‘ खून ××× नें केला असला पाहिजे ’ अथवा ‘ आत्महत्या करण्याचें कारण हें होतें ’ असें बातमीदारानें विधान भरपूर आधाराविना करूं नये. कारण खून अथवा आत्महत्या या सरकारी दप्तरांत दाखल होतातच आणि त्यांचा निश्चयात्मक निर्णय सरकारी अधिकाऱ्यांस लावावा लागतो. तो तसा जोपर्यंत लागला नाहीं तोपर्यंत वर्तमानपत्राच्या बातमीदारांस काय किंवा संपादकांस काय, खून अमुक एका व्यक्तीनें केला असें निश्चित विधान करण्यास हक्क पोहोंचत नाहीं. तीच गोष्ट आत्महत्येची. आत्महत्या केल्या-बद्दल सरकारी रिपोर्ट आल्याविना किंवा ती शाबीत झाल्याखेरीज तें वृत्त संशयित असल्यासारखेंच धरून चाललें पाहिजे. म्हणजे तत्संबंधीं बातमी द्यावयाची नाहीं असें नव्हे. तर अशा वेळीं नक्की कसलेंच विधान न करता माहीत असतील त्या गोष्टींचा निर्देश करून ‘ हें असें असावें ’ ‘ असें कळतें,’ ‘ तसें म्हणतात,’ ‘ असें दिसतें,’ इत्यादि संशयात्मक विधानेंच नेहमीं ठेवणें अनेक दृष्टींनीं इष्ट असतें. कारण खून व आत्महत्या यांचें नैतिक महत्त्व वेग-वेगळें आहे. ××× नें आत्महत्या केली असें दडपून दिलें आणि मृत सत्कुलो-त्पन्न असला तर त्याचे वंशज किंवा वारस अशा बातमीस हरकत घेऊन अब्रूनुकसानीचा दावा मांडतील. न्यायकोर्टात काय बाहेर येईल आणि काय निकाल लागेल याचा कोणीं तर्क करूं नये. आपण स्वतः कांहीं पाहिलें असलें किंवा कोणी विश्वासू गृहस्थानें आपणास कांहीं बातमी कळविली असली, तरी

तिजवर सर्वस्वी अवलंबून राहूं नये. बातमींत समाविष्ट करण्याची प्रत्येक गोष्ट आपणा स्वतःस कोर्टांत सिद्ध करून दाखवितां येईल काय, याचा बातमीदारानें मनाशीं विचार करावा व मगच तें विधान अथवा ती हकीकत बातमीत गोवावी. म्हणजे सहसा कायद्याच्या कचाटींत सांपडण्याचा प्रसंग येणार नाही. ( बातमीदाराच्या चुकीमुळें संपादक व मुद्रकच शिक्षेला पात्र होतो. बातमीदार बहुधा कायद्याच्या बंधनापलीकडे गेलेला असतो हें लक्षांत ठेवावयास पाहिजे.)

दुसरीही एक गोष्ट ध्यानात घेणें आवश्यक आहे. मृत्यूचा प्रसंग म्हणजे सर्व मतभेद विसरण्याचा; वैरभाव मनांतून घालविण्याचा व मृताचे गुणानुवाद गाण्याचा असतो. ही भावना अखिल मानवजातीची आज तागायत आहे – पुढेंही राहील. तेव्हा कोणत्याही प्रकारें मृताचे संबंधीं अथवा स्नेहीसोबती दुखाविले जाणार नाहींत अशी काळजी घेणे बातमीदाराचें काम आहे. मृताचे दुर्गुण अथवा त्याचीं दुष्कृत्यें सांगण्याचें काम टाळण्याची ही एकच वेळ असते. आपला प्रतिपक्षी असला तरी मृत्यूनंतर त्याचें गुणवर्णन तेवढें करून दोषांकडे कानाडोळा केल्यानें विरोधकांचा विरोध सात्विक कोटीप्रत पोहोंचतो. लोकमान्य टिळकानीं ना. गोखले याच्या मृत्युप्रसंगीं केलेले वर्तन ह्या विधानाची यथार्थता पटवून देईल. चुकूनसुद्धा मृताच्या अब्रूवर शिंतोडा उडेल असें वाक्य आपल्या बाबतींत येऊं न देण्याची खबरदारी घेणें बातमीदाराचें काम आहे. काहीं वर्षांपूर्वी शेट नरोत्तम मुरारजी याना लोणावळ्यानजीक वाघदरींत पडून मृत्यू आला. ही बातमी देताना ‘ शेटजींनीं आत्महत्या केली ’ असें दर्शविण्याचा प्रयत्न काहीं वर्तमानपत्रांनीं केला. पण सरकार दरबारीं तो अपघात असाच नमूद झाला असल्यानें त्या वर्तमानपत्रांनीं खात्रीलायक विधान ठोकलें असतें तर त्यांचेवर अब्रूनुकसानीची फिर्याद खास झाली असती. असो. मुख्य मुद्दा हा कीं मृताच्या संबंधीयास न दुखवितां, कोणतीही महत्त्वाची बाब वाचकांपासून लपवून न ठेवतां आणि कायद्याच्या कचाटींत न येता बातमी देणें हें बातमीदाराचें काम आहे.

बातमीच्या सदरांत मृत्यूचे किंवा खून आत्महत्येचे प्रकार येतात, तेव्हा त्यांतील सूक्ष्म भेद ध्यानात घेतला पाहिजे. सर्वच खून किंवा सगळ्याच आत्महत्येच्या कथा बातमीच्या कसोटीस पूर्णपणें उतरणार नाहींत. परंतु घोर

स्वरूपाच्या बहुतेक गुन्ह्यांची अशीच गत असल्यानें ते बातमींत आपोआप येतात. व्यक्ति, स्थल, काल यापैकीं कशालाही त्या ठिकाणीं महत्त्व येत नसून गुन्हा – जीवितास धोका देणारा गुन्हा – म्हणूनच त्याला बातमीचें महत्त्व प्राप्त होतें. इतर गुन्ह्यांचीही तीच गोष्ट.

आतां नैसर्गिक कारणानें मृत्यू घडून येतो, तेव्हाची बातमी कशी द्यावयाची हे पाहिलें पाहिजे. या प्रसंगात मात्र व्यक्तीसच अधिक मान्यता असते. आणि म्हणून मृत्यूची बातमी दिल्यानंतर त्या व्यक्तीचे चरित्र थोडक्यात सांगावें लागतें. चरित्र म्हणतांच नेहमीच्या ठराविक कल्पना असतात त्याच्याशी बातमीदारास फारसें कर्तव्य नसतें. सार्वजनिक आयुष्यांत घडून आलेल्या महत्त्वाच्या बाबीचाच तेवढा उल्लेख केला म्हणजे चरित्रातील माहिती पुरेशी होते. वंशावळीचा किंवा बालपणीच्या लीलांचा समावेश बातमीदाराला पाहिजे असलेल्या चरित्रात होऊं शकत नाही. ग्रंथकार असेल तर प्रथम ग्रंथ कधीं बाहेर पडला हे सांगून इतर पुस्तकांची यादी जोडावी लागते. पुढाऱ्याची मुख्य कामगिरी, सरकारी अधिकाऱ्याची बढती कशी होत गेली तिची परंपरा, श्रीमान् व्यापारी असल्यास त्याच्या कार्याचा व्याप, दानधर्मात खर्च केलेलें द्रव्य, इत्यादि सार्वजनिक दृष्टीनें महत्त्वाच्या असतील तेवढ्याच गोष्टींचा निर्देश बातमीदारास करावयाचा असतो. आणि ही सर्व माहिती शक्य तोंपर्यंत बिनचूक असली पाहिजे. मृत्यूचे बाबतीत आवश्यक असलेली माहिती :—

१ कोण, कोठे राहणारा हुद्दा...
२ कधी, कसा, कोठें वारला
३ कारण, उपचार, अंतकाळची थोडक्यांत स्थिती
४ वय, प्रेतयात्रेचे वर्णन
५ लौकिकदृष्ट्या नुकसान, उर्वरित संबंधीयांची माहिती
६ सार्वजनिक कामगिरी

ह्या प्रसंगीं देखील एक जबाबदारी बातमीदारावर असते. आणि ती म्हणजे ही बातमी देताना कसल्याही भावना न दुखविता मृतांच्या आप्तेष्टाना समाधान वाटेल, सहानुभूति दाखविणारे कोणी तरी आपणांस भेटले असें त्याना वाटावें अशाच प्रकारें ती बातमी दिली जावी. किंबहुना असेंही म्हणता येईल कीं,

जनता मृतानें केलेली कामगिरी विसरली असल्यास तिची जाणीव करून देऊन मृताबद्दल आपलें कर्तव्य बजावण्यास सर्वांना उद्युक्त करणें हेंही बातमीदाराचें कर्तव्य होय. आणि शिकंदरी फर्मानें सोडून बहुजन समाजाला वळवितां येणें सरकारला देखील दुर्घट वाटतें. मग वर्तमानपत्राची काय कथा? त्याना वेगळेच उपाय योजावे लागतात. असो.

चरित्रपर माहितीची आवश्यकता मृत्यू कोणत्या कारणानें घडून आला तरी लागतेच. कारण मनुष्य जगांतून नाहींसा झाला कीं त्याची सार्वजनिक कामगिरी जनतेपुढें तत्काळ आली म्हणजे आपण ज्याला मुकलों त्याची खरी किंमत ठरविण्यास सोईचें होतें. बहुतेक प्रसंगी थोर मनुष्याच्या हयातींत त्याची रास्त योग्यता साधारण जनतेस कळत नाहीं. परंतु त्यानें केलेली सेवा लोक विसरत नसतात. म्हणून ... ... अशी लोकसेवा करणारी व्यक्ति अतःपर आपणांस लाभणार नाहीं इतकें कळलें, की मग मात्र लोक त्याबद्दल हळहळूं लागतात.

मोटार व आगगाडीचे अपघात, मृत्यू, आत्महत्या वगैरे अनपेक्षित घडामोडींतून बाहेर पडल्यानंतर अपेक्षित प्रसंगांकडे आपणास वळलें पाहिजे. पण तत्पूर्वी अगदीं क्वचित् येणाऱ्या एक दोनच अपघातांची थोडक्यात बोलवण करणें क्रमप्राप्त आहे. अतिवृष्टीनें उडणारा कहर किंवा घर कोसळल्यानें होणारी जीवित – व अर्थ – हानि यांच्या बातम्या देण्याचा प्रसंग नेहमींचा नसला, तरी तत्संबंधीं आपली तयारी ठेवणें आवश्यक आहे. घर कोसळलें तर तें कोठलें, कोणाचें, कधीं बांधलेलें, नुकसान किती झालें इत्यादि माहिती मिळविल्यानंतर आंत राहणारासबंधीं संपूर्ण चौकशी केली पाहिजे. विशेषतः अपघातांत सांपडलेल्या मंडळीची अधिक कसून माहिती मिळवावी लागते. आजूबाजूच्या लोकांनीं काय मदत केली, घरांतून मंडळी बाहेर काढतांना एखादा ‘ वर्णनीय ’ प्रसंग घडला कीं काय, वगैरे आगीच्या वेळीं गोष्टी लक्षांत ठेवावयाच्या त्या या प्रसंगीं देखील लागूं पडतात.

अतिवृष्टीनें उडविलेला कहर बहुविध असतो. एका घराकडे अथवा कुटुंबाकडे लक्ष न जातां गांवेंच्या गांवें त्यामुळें धोक्यांत येतात. तेव्हां आपलें दृष्टिक्षेत्र वाढवून तिकडे पहावें लागतें. लहान मुलांची विचारमर्यादा नियमित असल्यानें

त्यांना थोर कल्पनांचें आकलन होत नाहीं, तशी बाब बातमीदारानें स्वतःचे बाबतींत होऊं देऊं नये. अपघातांत एकाद दुसरी व्यक्ति, फार तर १०–१२ माणसें सापडतात. परंतु अतिवृष्टीचे किंवा महापुराचें तसें नसतें. त्या योगें बऱ्याच कुटुंबांस, पुष्कळ खेडयापाडयाना धक्का लागतो; कित्येक वेळा समूळ नाहींसे होण्याची पाळी येते. आणि बातमीदाराची मुख्य अडचण ही कीं, ती स्थिति सर्वच प्रत्यक्ष जाऊन पाहणे त्याला बहुधा अशक्यप्राय असतें. तेव्हां एकाद-दुसरें खेडें पाहून त्यावरून इतरांची स्थिती स्वतः अजमावून – आणि हा अदमास बरोबर असावा लागतो – तत्संबंधीं माहिती द्यावयास पाहिजे असते. ह्या प्रकारचें काम अर्थातच महत्त्वाचे व जोखमीचेही असतें. म्हणून नवशिक्या-वर तें सहसा पडत नाहीं. त्यासाठी खास बातमीदार नेमला जातो. खास बातमीदाराचें या विवेचनात पुढें स्वतंत्र प्रकरण राखून ठेवलें असल्याने त्याचा विचार येथें नको. नवशिक्यावर असा प्रसंग आलाच तर त्याला थोडीशी माहिती असावी म्हणून अतिवृष्टीच्या अपघाताचा निर्देश केला इतकेंच. कारण हे अपघात सांगून येत नसतात.

वर अपघाताचे जे थोडे प्रकार सांगितले त्यावरून कसल्या कामगिरीवर बातमीदाराना जावें लागते याची कल्पना येईल. बातमीदाराच्या कार्यक्षेत्राचा हा एक भाग झाला. यात वावरल्याशिवाय खरी बातमी मिळावयाची नाहीं. आणि अशा अनेकविध अडचणींतून जावयाचें म्हणजे मनाची, शरिराची आणि जनसेवा करण्याच्या आवडीची तयारी कितपत असावयास पाहिजे याचा अंदाज येईल. अपघातात सापडलेल्यास प्रथमोपचार देण्याचा अथवा आगींतून बायकापोरांस वाचविण्याचा प्रसंग बातमीदारावर येणें अशक्य नव्हे. सर्व प्रकारच्या संकटातून जाण्याची शारिरीक व मानसिक सिद्धता तर असाव-यास पाहिजेच. पण त्याही बरोबर आपणांवर संपादकानें टाकिलेली जबाबदारी नीट ओळखून, समाजातील आपणास बजावावयाचें काम दृष्टीआड होऊं देतां कामा नये. कित्येकाची अशी समजूत असते कीं, आपण आपल्या कार्यक्षेत्रा-बाहेर जाऊन सार्वजनिक काम थोडेसें केलें म्हणजे आपण कृतकृत्य झालों. आपण कर्तव्यच्युत झालों याबद्दल आपणास माफीच मिळाली पाहिजे. पण अशा लोकांनीं हें लक्षांत ठेवावें कीं स्वकार्यरत राहूनच अधिक कामगिरी

बजाविली तर त्याबद्दल त्या व्यक्तीस शाबासकी मिळेल. परंतु आपलें काम करावयाचें सोडून कितीही लोकोपयोगी दुसरें कार्य केलें तर त्याबद्दल श्रेय त्या कर्त्यास देतां येणें मुष्कील होईल. म्हणून बातमीदारानें आपलें अंगीकृत कार्य न सोडता मिळालेल्या संधीचा फायदा घेऊन एखादे सार्वजनिक कृत्य केलें तर ती बाब खरोखरीच प्रशंसनीय ठरते. आणि अशा प्रकारें आपली कार्यक्षमता वाढविणें यांतच मानवी प्रगतीचें बीज आहे. असो.

विषयांतर करून इतकें ब्रह्मज्ञान सांगितलें त्याचें कारण हें कीं, बातमीदारास आपल्या आंगच्या अनेक गुणांचा पूर्ण विकास होऊं देण्यास येथें भरपूर वाव असतो. तो तसा करून घेणाराच खरा बातमीदाराच्या धंद्यास लायकीचा. बाकीचे इतर म्हणजे त्यांजवर बातमीदाराचा आळ आला अशापैकींच समजावे. ह्या सर्व गोष्टीचा विचार केल्यास, चलाखी, समयसूचकता, सौजन्य, गोड स्वभाव, मीठें भाषण, इत्यादि गुणांची आवश्यकता बातमीदारास कां असते तेंही समजेल. आणि आत्मनिरीक्षण करून नसतील ते गुण संपादन करण्याकडे प्रवृत्ति जाईल.

शेवटची बाब पोषाखासंबंधी राहिली. याविषयीं आणखी विवेचन पुढें यावयाचें असलें तरी आतांपर्यंतचे विविध प्रसंग पाहतां एकच ठराविक प्रकारचा पोषाख ठरवून चालणार नाहीं. पोलिस वगैरे सरकारी लोकांशी मिळून मिसळून वागण्यांत साहेबी वेष चांगला तर आपल्याच देशबांधवांत मिसळण्यासाठीं स्वदेशी पोषाखाचा अवलंब केला पाहिजे, हें उघड आहे. कालस्थित्यनुरूप वेष बदलावे लागतात म्हणून त्याबद्दल बातमीदारानें कुरकुर करून भागणार नाहीं. अशी चतुरस्त्र तयारी झाली म्हणजे बातमीदाराचा प्रथम मार्ग सुरळीतपणें पार पडतो आणि एकदां रुळावर चालू लागलेली गाडी नीट अखेरपर्यंत जाते.

प्रकरण सहावें

# बातमी लेखन

बातमी मिळविण्यासाठीं तयारी कशी करावी आणि तें काम पार पाडीत असतांना साधारणपणें कोणत्या अडचणी येतील यासंबंधीं माहिती इतका वेळ सांगितली. आतां बातमीदाराच्या दुसऱ्या कामगिरीचा उल्लेख करावयाचा आहे. पत्रपटूंना नेहमींच दुहेरी काम पडतें. प्रथमतः काय पाहिजे, तें कोठें मिळेल व तें मिळवावें कसें याचा विचार करून तें हातीं आल्यानंतर भिन्न-रुचीच्या हजारों वाचकांना समजेल व त्यापासून अर्थबोध होईल अशा शब्दांनीं तें व्यक्त करणें. यांत दुसरें काम आहे तेंच अधिक महत्त्वाचें आहे. एक वेळ बातमी मिळवितां आली नाहीं तरी चालेल. पण ती लिहावी कशी हें कळलें नाहीं तर त्या इसमानें वृत्तव्यवसायांत पडूं नये हें बरें. कारण बाहेरचीं हिंडण्याफिरण्याचीं कामें कांहीं शारीरिक व्यंगामुळें करतां आलीं नाहींत तरी प्रत्यक्ष कचेरींत बसून बातम्या देणारा एक बातमीदारांचा वर्ग असतोच. भाषांतराचें काम बहुधा त्यांना पडतें आणि त्यांत कसलें कौशल्य असें बहुतेकांस वाटतें. म्हणून बैठ्या भाषांतरी बातमीदाराकडे संपादकांचें बहुधा दुर्लक्ष असतें. परंतु शास्त्रीय दृष्टि लावून पाहिलें किंवा वृत्तव्यवसायाचा अभ्यास करावयाचा म्हणून ठरविलें, तर अशा कोत्या विचारांचा परिणाम कळून येतो. उदाहरणार्थ नामांकित वर्तमानपत्रांतील उतारे तारीखवार घेऊन दोषस्थलें दाखवितां येतील. परंतु केवळ अभ्यासासाठींच उदाहरणें घेतलीं असल्यानें त्यांच्या संग्राहकाचा उल्लेख टाळला आहे. हीं दाखविण्याचा किंवा त्यांजवर टीका करण्याचा उद्देश इतकाच कीं, बातमी देतांना ती कशी परिपूर्ण असावी लागते आणि ती तशी नसली तर काय अनर्थ होईल हें नवशिक्याच्या लक्षांत यावें व त्याचे हातून अशा चुका होऊं नयेत.

बातमीदाराच्या कार्यक्रमांत अनेक कामें पडतात. त्यांत लेखनविभागाचाच येथें विचार करावयाचा आहे. अगदीं नित्याचें, व रगाडा चालविणारें असें काम

म्हणजे इतर वृत्तपत्रांतील ' वर्तमानसार ' काढणें. विशेषतः आपल्या पत्रांची प्रचलित कालीं या बातमी देण्याचे बाबतींत अत्यंत कमालीची अनास्था दिसून येते. एक तर तीं सर्वस्वी परावलंबी म्हणजे इंग्रजी पत्रावरून बातमीची तहान भागविणारीं आहेत. आणि त्यातूनहि अधिक खेदाची गोष्ट म्हणजे ज्यांचे व आमचे हितसंबंध परस्परभिन्न आहेत अशांच्या ओंजळीनेंच आमची प्रमुख पत्रें बातमीचें पाणी पीत आहेत. या अनिष्ट प्रकाराची जबाबदारी किती आहे हें सांगण्याचें हें स्थल नाही. शिवाय ती बव्हंशीं संपादकीय मंडळीवर जात असल्यानें बातमीदाराचा यात फारसा दोष नाहीं. फक्त आहे ही बाब शोचनीय असें मानून प्रस्तुत विवेचनाकडे वळूं.

बातम्यासाठीं इंग्रजी दैनिकें पुढें टाकून दिल्यावर त्यातील कोणती बातमी घ्यावयाची व कोणती सोडावयाची याची माहिती, ' बातमी ' कशाला म्हणतात, तिला महत्त्व का व केव्हां येतें इत्यादि चर्चा केली तेव्हा सांगितलेंच आहे. तदनुसार बातमी निवडण्याचें काम झाल्यानंतरच मग लेखनास प्रारंभ होतो. बातमी लिहिताना तिजपासून पूर्ण अर्थबोध झाला पाहिजे हें मुख्य तत्त्व लक्षांत ठेऊनच लेखन करावे. काय काय मजकूर व खुलासा बातमींत द्यावा लागतो याची चर्चा करण्यासाठीं प्रत्यक्ष व्यवहारातलीं उदाहरणें घेणेंच श्रेयस्कर.

> "—गोंडाचा प्रसिद्ध बंडखोर सरदार गजन याला तेरा वर्षे सक्तमजुरीची शिक्षा झाली. याला पकडण्यासाठीं सरकारनें एक हजार रुपयाचें बाक्षिस लावलें होतें."

ही बातमी छापलेली आहे. ती वाचून थोडाबहुत अर्थ कळतो. पण त्याविषयीं माहिती पुरेशी आहे असें वाटत नाही. प्रथमतःच प्रश्न उद्भवतो कीं, हा प्रकार घडला तरी कधीं व कोठें ? त्याला उत्तर बातमीच्या मजकुरात मिळत नाहीं. परंतु देशवार प्रांतवार, जिल्हावार अशी वर्तमानसाराची मांडणी असेल तर तें हुडकून काढणें कठीण नाहीं. पण ' खून – अत्याचार – शिक्षा ' ' दंगे मारामाऱ्या ' ' आग – अपघात – उत्पात ' अशा वर्गवारीनें वर्तमानसार लावलें असेल तर ह्या बातमीपासून अर्थ निघणार कसा ? हा वर्णिलेला ' समारंभ ' कोठला हें समजलें नाहीं तर त्यात वाचकांना गोडी वाटावी कशी ? आतां ज्या बातमीदारानें तें भाषांतर केलें तो व त्याचे पक्षपाती

म्हणतील कीं ‘ गोंडाचा बंडखोर ’ राहणार गोंडवनातच. म्हणजे ही बातमी वऱ्हाड मध्यप्रांतातील आहे. इतकें ढोबळ स्थान कळलें असें धरून चाललें तरी अर्थबोध पुरा होईल काय ? किंवा ‘ गोंडवन ’ म्हणून एक प्रदेश आहे व त्यांत गोंड लोक राहतात ही माहिती वाचकास आहे असें का समजून चालावें ? मराठी पाचवी सहावींत शिकलेला भूगोल ज्याच्या डोक्यातून पार नाहींसा झालेला नाही अशाना कदाचित् तें समजेल. पण बहुतेक वाचक-वर्गाची स्मरणशक्ति लक्षात घेतली तर गोंड ही एक हिंदुस्थानातली जात आहे असें फारच थोडयाना सागता येईल. शिवाय मराठी वृत्तपत्राचें ह्या बाबतींतलें वैशिष्ट्य ठाऊक असलें तर अशा बातम्यात स्पष्ट खुलासा करण्याचें कारण कळून येईल. बरें, पुढें पाहूं. ‘ प्रसिद्ध बंडखोर सरदार गजन ’ असें बातमींत म्हटलें आहे. तो प्रसिद्ध कां झाला ? आणि ‘ प्रसिद्ध ’ असता तर असा प्रश्नच उद्भवला असता काय ? ‘ मी वर्तमानपत्राचा वाचक आहे खरा; पण हा ‘ प्रसिद्ध गजन ’ मजपुढें आजच प्रसिद्ध झालेला दिसतो ’ असें बहुतेक वाचक म्हणतील. किंवा काहीं जण असा विचार करतील कीं पत्रांत ‘ प्रसिद्ध ’ म्हणून ज्या अर्थी छापले आहे व आपणास तो ठाऊक नाही, त्या अर्थी हा दोष आपलाच आहे. अशा हेतूनें ते स्पष्ट बोलणार नाहींत. परंतु बातमी देणा-रानें कोणत्या दृष्टीनें विचार करावयास पाहिजे हें समजण्यासाठींच ह्या शंकाकुशंका निघत आहेत. ‘ प्रसिद्ध ’ म्हणण्यापूर्वी तो खरोखरच प्रसिद्ध असला तर ठीक नाहीं तर प्रसिद्धीस येण्याचीं कारणें अथवा कृत्यें देऊन ‘ दरोडे घालण्यांत पटाईत ’ असें म्हटलें पाहिजे. बंडखोर म्हणजे तो काय करतो किंवा त्यानें काय केलें याचा नीट अर्थबोध होत नाहीं. कारण त्यानें बंड उभारलें तें कोणा विरुद्ध ? ‘ इंग्रज प्रभू ’ च्या विरुद्ध तर नव्हे ? आणि तसें असेल तर तत्संबंधीं बातमी स्वातंत्र्यानें २–४ कॉलम पटकाऊन बसणारी झाली पाहिजे. मग वर्तमानसाराच्या खिचडींत दोन सवादोन ओळींत त्याला कां बसविलें ? हे प्रश्न उद्भवतातच. तेव्हां बंडखोर म्हणजे काय याचा स्पष्ट खुलासा होणें इष्ट, आवश्यक व अगत्याचें आहे.

आतां पुढला विचार शिक्षेचा. तेरा वर्षें सक्त मजुरीची शिक्षा त्याला झाली तीं कां ? कशासाठीं ? त्यानें गुन्हा तो काय केला ? ह्यावर कांहीं प्रकाश पडतो

काय ? तेरा वर्षे शिक्षा मिळविण्यासाठीं केलेला गुन्हा असा तसा नसेल. दोन चार खून, ५०–६० हजारांची चोरी, वगैरेचा आरोप त्याजवर असून तो पूर्णपणें शाबीत न झाल्यानें नुसत्या सक्त मजुरीवर तो सुटला असेल. त्याचे साथीदार किती तरी असतील. त्यांनाही ऐपतीप्रमाणें शिक्षा ठोठावल्या असतील. इत्यादि प्रकाराचें वर्णन किती तरी होईल. म्हणजे ‘ सरदार गजन ’ हा खरोखरीच प्रसिद्ध असता तर त्याचे प्रतापी पराक्रम इतक्या थोडक्यांत आटोपता आले नसते. अस्तु. याच ठिकाणी भाषेचा दोष कसा टाळावा किंवा योग्य शब्द कसा योजावा ते सांगितले पाहिजे. गाईला कावलड ‘झाली’ तशापैकीं ह्या शिक्षा ‘ होत ’ नाहींत. त्या ‘ देतात ’ किंवा ‘ ठोठावतात. ’ विशेषतः तेरा वर्षे सक्त मजुरीची शिक्षा ‘ ठोठावलेली ’ च असते. ती दिली म्हणणें एक वेळ बरें दिसेल पण ‘ झाली ’ हे अगदींच अप्रस्तुत. बारकाईने प्रत्येक शब्द पहावा लागतो तो अशासाठीच. तो वाचून त्या बातमीतील स्वारस्य, उद्दीपित अथवा जागृत होणाऱ्या भावना, नीटपणे प्रकट व्हाव्या म्हणून योग्य शब्दाचीच योजना करावी लागते. आणि ‘ पत्र पांडित्य ’ ( Journalism ) म्हणतात तें यालाच.

बातमीतला पुढला भाग ‘ एक हजार रु. बक्षिसाचा ’ आहे. हें मुद्दाम सांगण्याचा – बातमी भाषांतर करणाराचा – हेतु इतकाच कीं ‘ प्रसिद्ध सरदार गजन ’ बरेच दिवस सांपडत नसे. तो फरारी होता म्हणून सरकारनें पकडून देणारास एक हजार रुपयाचें बक्षिस देऊं केलें होतें. हा भाग महत्त्वाचा आहे खरा. परंतु त्यानेंही काम अर्धवटच केलें. म्हणजे बक्षिस कोणाला मिळालें, तो सरदार सांपडला कसा, कधीं व कोठें वगैरे जाणण्याची उत्सुकता वाचकाचे मनात उत्पन्न करून ती पुरविणारी बातमी दिली नाहीं. हा दोष अक्षम्य होय. एकवेळ अपुरी माहिती देऊं नये. पण ही अशी अर्धवट दिल्यानें काय होतें, इकडे पत्रकर्त्यांनी – त्यांच्या बातमीदारांनीं – लक्ष दिलें तर अशी चूक ते कधी करणार नाहींत. समजा दोन दिडक्याचीं दोन पत्रें पुण्यात रोज सकाळीं विकतात. एकात वरील प्रमाणें अर्धवट बातमी आहे. ती वाचून लोकाची जिज्ञासा व कुतूहल बुद्धि साहाजिकच जागृत होते. परंतु तिचें समाधान न झाल्यानें दुसऱ्या पत्रांत तत्संबंधी कांहीं अधिक खुलासा आहे का पाहण्यासाठीं तें पत्र विकत घेतात. आणि त्यांत जर सविस्तर माहिती दिलेली असली तर

पहिल्या पत्राची ती गिराइकी तुटलीच व दुसऱ्याची वाढलीच म्हणून समजावे. अशासाठीं वाचकांच्या नजरेनें प्रत्येक बातमीकडे पाहिल्यास कोणती बातमी अवश्य पाहिजे व कोणती नको तें तावडतोब कळून येईल आणि यदाकदाचित् ज्या इंग्रजी पत्रावरून ती घेतली त्यांत ती आढळली नाहीं तर त्या प्रांताचें अथवा जिल्ह्याचें पत्र पाहून त्यांतून ती सविस्तरपणें वाचून तिचा थोडक्यांत साराश द्यावा लागेल. असें करण्यास थोडीशी मेहनत पडते खरी; पण ती वरिष्ठांच्या डोळ्यांत भरल्याविना रहात नाहीं. आणि मग अशा बातमीदाराची बढती होण्यास अवधि कसचा ? ( प्रत्येक वर्तमान पत्राच्या कचेरींत परत भेटीसाठीं येणाऱ्या पत्राचा ढीग तसाच पडून राहतो. त्यांचा उपयोग फार असतो. साधारणपणें बहुतेक सर्व जिल्ह्याचीं पत्रे अशा वेळीं उपयोगीं पडतात. )

दुसरी एक बातमी पहा :—

'संप–सत्याग्रह'

"–विजापूर येथें ता. १२ पासून गांवांतील सर्व टांगेवाल्यांनी संप पुकारला आहे. १०५ टांगे संपांत सामील झाले आहेत."

ह्या बातमीत मुख्य दोष असा कीं संप का केला आहे त्याचा मुळींच उल्लेख नाही. शिवाय ही बातमी प्रसिद्ध झाली वीस तारखेस म्हणजे संप झाल्यापासून सात आठ दिवसांनीं. खरें पाहिलें तर असले संप २।४ दिवसांतच मिटतात व नुसत्या निर्देशापलीकडे त्यास महत्त्व प्रांतिक पत्रांत नसतें, कारण काहीं तरी क्षुल्लक स्थानिक तक्रारीमुळें असले संप संभवतात व लगेच ती तक्रार दूर झाली कीं ते मोडतात. पण या संपांत कारणच दिलें नसल्यानें किंवा तो लवकरच मिटला म्हणून त्याचा तसा उल्लेख करावयाचा राहून गेला, व बातमी अर्धवट राहिली. बरें, संपाचें पुढें झालें काय ? गांवांत टांगे चालत नाहींतच कीं काय ? उतारूंचे बरेच हाल होत असतील ? टांगेवाल्यांचेही एक प्रकारें हालच. कारण पांच सहा दिवस धंदा नाहीं. तर त्यांचें चालावें कसें ? इत्यादि अनेक शंका वाचकांचे मनांत उद्भवतात. पण त्यांचें निरसन करण्यास ही बातमी असमर्थ आहे.

अशा बातम्या देताना बातमीदारानें एक खबरदारी बाळगावी लागते. ज्याचा थोडक्याच अवधींत निकाल लागावयाचा असतो किंवा अधिक सविस्तर खुलासा कळणें शक्य असतें, अशाच्या अर्धवट ' खबरी ' छापावयास देऊंच नये. शेवटच्या घटकेपर्यंत त्यांत सविस्तर खुलासा येईपर्यंत वाट पाहून नंतर सर्व संकलित बातमी एकदम द्यावी — म्हणजे बातमी अर्धवट रहात नाहीं.

आतां बातमींतला दुसरा दोष. विजापूर येथें एकदां म्हटल्यानंतर 'गांवांतील' ह्या शब्दाचें प्रयोजन काय ? विजापूर व गांव वेगळें समजावयाचें कीं कसें ? पुण्यास खडकी, लष्कर, शहर, भांबुर्डा असे वेगवेगळाले भाग आहेत तसा तर विजापूर येथें प्रकार नाहीं ना ?

पुढें आणखी पहा. ' सर्व टांगेवाल्यानीं संप पुकारल्या ' चें एकदां सांगितल्यानंतर ' १०५ टांगे संपांत सामील ' असल्याचें सांगण्याचें कारण काय उरतें ? त्यापेक्षां ' विजापुरात एकंदर १०५ टांगे आहेत ' असें म्हणावयास पाहिजे होतें. असो.

आतां तिसऱ्याच एका प्रकारची बातमी घेऊं.

> " — मेनेमने ( स्मर्ना ) येथील लष्करी न्यायसभेपुढें २१४ लोकांची चौकशी चालू झाली असून त्यांत शीख दरवेशी वगैरे लोकांबरोबर १६ स्त्रियाहि आहेत. स्मर्नाच्या भागांत लष्करी कायद्याची अंमलबजावणी जोरांत चालू आहे."

हीं बातमी परदेशची आहे. तुर्कस्थानांत लष्करी कायद्याच्या अंमलाखालीं २१४ लोकांची चौकशी चालू असल्याचें तीवरून समजतें. पण आपणांकडे पेशावरकडे महिनेच्या महिने ' मार्शल लॉ ' पुकारला गेला होता तसा स्मर्ना विभागांत सुरू झाला कीं काय ? त्याचें कारण काय ? स्मर्ना कांहीं ब्रिटिश राज्यसत्तेखालीं नाहीं. किंवा तेथें परकीय नोकरशाहीची हुकमत चालत नाहीं. मग मार्शल लॉ किंवा लष्करी कायदा कां व केव्हां पुकारला गेला ? इत्यादि अनेक प्रश्न उद्भवतात आणि त्याचें उत्तर त्या बातमींत मिळत नाहीं. २१४ लोकांचा एकदम खटला चालला तेव्हां त्यांचा गुन्हा तरी काय होता ? बरें.

त्यात ‘ शीख – दरवेशी ’ वगैरे लोक आहेत असें दिसतें. तुर्कस्थानांत शीख गेले कसे ? ते हिंदी प्रजाजनच असले पाहिजेत आणि त्यांना तुर्कस्थानांत जाऊन लष्करी कायद्याचे कचाटींत सापडण्याचा प्रसंग कां आला ? इत्यादि चौकस प्रश्न साधारण बुद्धीच्या माणसालासुद्धा सुचतील. परंतु त्याचें समाधानकारक उत्तर बातमींत आहे कोठें ?

हा प्रकार कधींचा चालू आहे किंवा बातमींत वर्णिलेला प्रसंग कधीं घडला हे बातमींत मुळीच सांगितलें नाही. शिवाय शेवटी “ लष्करी कायद्याची अमलबजावणी जोरांत चालू आहे, असें म्हणून पुनः ‘ कां ’ ही जिज्ञासा अधिकच जागृत केली. अशा अनेक कारणांस्तव ही बातमी दोषमिश्रित आहे.

ह्या तीन वेगवेगळया बातम्या घेऊन त्याचे दोष पाहिले. आता बातमी स्वतंत्रपणें कशी लिहावी तें पाहिलें पाहिजे. बातमीचें महत्त्व ज्यावर अवलंबून असेल तो भाग प्रथमतः वाचकांचे डोळ्यांत चटकन् भरेल अशा प्रकारें वाक्यरचना असावी हें कोणासही कळण्यासारखें आहे. व्यक्तीवरच भर दिल्यानें बातमी ‘ बातमी ’ होत असते तेव्हां :—

> “—सांगली संस्थानचे अधिपति श्रीमंत अप्पासाहेब पटवर्धन विलायतेहून आपल्या परिवारासह ‘ व्हाइसरॉय ऑफ इंडिया ’ या बोटीनें ता. ६ रोजीं सकाळीं मुंबईस परत आले. ”

ही नुसती घडलेल्या गोष्टीची खबर आहे. कोण कधीं व कोठें या एकदम मनांत येणाऱ्या प्रश्नांस त्यांत उत्तर मिळतें खरें, परतु इतर अवांतर माहिती दिल्याविना ती बातमी पुरी होऊं शकत नाही. त्या अधिक सविस्तर तपशिलाला मर्यादा असते; पण ती पत्राचा सांगली संस्थानांत खप, संस्थानिकाविषयीं पत्राचें धोरण आणि हातीं असलेली जागा यावरच ती अवलंबून राहील. परंतु अगदीं आवश्यक अशी माहिती द्यावयास पाहिजे ती ही :—

> “...धक्कयावर महाराजाना भेटण्यासाठीं संस्थानची बरीच मंडळी हजर होती. रा. टे. कॉन्फरन्ससाठीं श्रीमंत इंग्लंडला सहकुटुंब गेले असून तिकडील कार्य आटपतांच ते परत फिरले. मुंबईत दोन दिवस राहून स्वारी सांगलीस जाईल. ”

इतक्या वाक्यांची आवश्यकता आहेच. त्यात मग कांहीं विस्तार करावयाचा असेल तर तो धोरणानुसारच करावा लागेल. आणि म्हणून बातमीदारास आपण ज्या पत्राला बातमी देतों त्याच्या धोरणाची पुरेपुर माहिती असावी लागते. हें धोरण, वेगळें असें कोणी कधीं जाहीर करीत नाहीं. बातमी देण्याची तऱ्हा, अग्रलेखाचा रोख व इतर लेखांतील विचार यांवरूनच वर्तमानपत्राचें धोरण अधिक स्पष्ट होत असतें. त्यासाठीं आपला ज्या पत्राशीं संबंध येतो तें बातमीदारानें नेहमीं काळजीपूर्वक वाचलें पाहिजे. कारण वेगवेगळ्या प्रसंगींच धोरण प्रकट करण्यास वृत्तपत्रांना अवसर मिळत असतो. सांगलीच्या महाराजांचेंच उदाहरण घेऊन त्याची अधिक फोड करतां येईल. संस्थानी स्वराज्यांतील एकतंत्री अंमलावर सर्रहा टीका करावयाची हाच जर एकाद्या पत्राचा शिरस्ता पडलेला असेल तर, "महाराजांनीं ह्या प्रवासांत प्रजेचे २–२॥ लाख रुपये उडविले" अशा आशयाची मेख मध्यें मारावी लागेल किंवा स्त्री दाक्षिण्य दाखवून सामाजिक सुधारणेचा पुरस्कार करण्याचें कंकण बांधलेलें वर्तमानपत्र असलें तर इतर बाबींकडे दुर्लक्ष करून "राणीसरकारनीं विलायतचा प्रवास करण्यांत दाखविलेल्या मनोधैर्याबद्दल अभिनंदनाचा वर्षाव" करावा लागेल. आणि मग विलायतेत गेल्याबरोबर "जसा देश तसा वेष" स्वीकारल्याबद्दल किंवा "परदेशीं नवोनव फॅशन्स प्रतिक्षणीं डोळ्यापुढें दिसत असतां आपल्या आर्यत्वाला जागून छानछोकीचा मुळींच अवलंब केला नाहीं म्हणून" कोणत्या ना कोणत्या कारणासाठीं राणीसरकारचे गोडवे गावे लागतील. म्हणून कोणत्या वेळीं कोणतें लिहावयाचें या विषयीं माहिती मिळविणें आवश्यक असतें. असो.

वर्तमानपत्र हें तात्पुरतें वाचनासाठी आहे अशी बहुतेकाची समजूत असते आणि ती बव्हंशी खरीही आहे. कारण त्यांचा आधारभूत ग्रंथासारखा उपयोग व्हावा अशा प्रकारें काळजीपूर्वक तीं संपादिलींहि जात नाहींत आणि म्हणून वाचकही त्या दृष्टीनें त्यांचेकडे पहात नाहींत. परंतु वर्तमानपत्रें हीं प्रचलित इतिहासाला म्हणजे इतिहास लेखकाला व वाचकाला सारखींच उपयोगी असल्यानें कित्येक उच्च दर्जाच्या पत्रांना आणखीही बरीच माहिती द्यावी लागते. वर्तमानपत्रें पाहिजेत तर देवोत अथवा न देवोत, पण बातमीदारीच्या अभ्यासासाठीं मात्र आणखीही बरीच माहिती पत्रपटूंना जमवून ठेवावी लागते. ती केव्हां उपयोगी पडेल याचा नेम नसतो.

> "... सांगलीचे अधिपती ता. ×× रोजीं मुंबईहून रा. टे. परिषदेसाठीं लंडनला जाण्यासाठीं निघाले आणि तेथें पोट कमिट्यांच्या बैठकींत ××× वर कडाक्याचा वाद माजला तेव्हां त्यांनीं दाक्षिणी संस्थानांची तरफदारी उत्त॰ प्रकारें केली. एकूण पावणे तीन महिने महाराज विलायतेंत राहिले."

ही माहिती "सांगलीकर" ह्या सदराखालीं वृत्तपटूनें आपल्या चोपडींत लिहून ठेवावी. समजा, सांगलीकरांचा पुणेकरातर्फे सन्मान करण्याचा समारंभ ठरला असेल तर तेव्हा ह्या मजकुराचा उपयोग होईल. किंवा पुढच्या नूतन वर्षारंभीं श्रीमंतांस एकादी पदवी अथवा दुसराच बहुमान मिळाला तर आतापर्यंतची त्यांची कर्तबगारी थोडक्यांत द्यावी लागेल. ती दिल्यानें बातमीदाराचें कौशल्य दिसून येईल आणि त्या वर्तमानपत्राचा खप वाढेल. हीं अशा प्रकारचीं विविध व अनपेक्षित येणारीं कामें असल्यानें, पत्रपटूनें आपल्या संग्रहीं निरनिराळया व्यक्तींचीं थोडक्यांत चरित्रें, त्यांच्या विषयींची थोडी बहुत माहिती, वाङ्मयीन, शैक्षणिक अथवा व्यवसायीन कर्तबगारी किंवा मर्दुमकी यांचीं टाचणें जय्यत ठेवावीं व जसजसा एकादा प्रसंग घडेल तसतशी त्यांत वाढ करीत जावी.

दुसऱ्याच एका दृष्टीनें जरी अशा घडामोडींकडे पहावयाचें झालें तरी सर्व माहिती ही पाहिजेच. फक्त तिचा उपयोग कसा करावयाचा आणि कोणत्या गोष्टींवर भर द्यावयाचा यांतच सर्व कौशल्य आहे. वर सांगितल्याप्रमाणेंच झालेल्या "अपव्ययाबद्दल" थोडीशी टीका करावयाची असेल तर तिला अभ्यासाची जोड देण्यासाठीं असें म्हणावें :—

> "××× संस्थानचें उत्पन्न सालीना १४ लक्ष रुपये असतां त्यांतील दोन अडीच लाख रुपये निव्वळ विलायतच्या सफरींत खर्च झाले. शिक्षणाप्रीत्यर्थ मात्र दरसाल ३० हजार रुपयांपेक्षां अधिक रक्कम मिळत नाहीं."

अशा आंकडयांच्या सहाय्यानें केलेली टीका साधार वाटते आणि लिहिणाराचा अभ्यास दर्शविते. म्हणून तिला अर्थातच महत्त्व येतें. अशा उपयुक्त माहितीचा संग्रह वाढवावा तसा वाढत जातो. उदाहरणादाखल दोन चारच बाबी घेऊं. शिक्षणावर × × हजार रुपये दरसाल खर्च होतात असें अंदाजी म्हणण्यापेक्षां गेल्या पांच वर्षांची सरासरी × × हजार आहे, असें लिहिल्यानें बातमीदार विशेष बारकाईनें अभ्यास करणारा आहे, हें लक्षांत येतें. मात्र अशा वेळीं, अचूक आंकडयांकडे अधिक लक्ष दिलें पाहिजे. नाहीं तर विनाकारण बातमीदाराचें व पत्रकाराचेंही हसें होऊन एखादे वेळ माफी मागण्याचा किंवा नुकसान भरपाईचा प्रसंग संपादकांवर यावयाचा. शिवाय पत्राचा बोज कमी होईल तो निराळाच.

ह्या इतक्या गोष्टी सांगणें आवश्यक होतें. त्या सांगण्यांत विषयांतर झालें खरें. पण तें अपरिहार्यच होतें. आतां बातमीच्या लेखनाची रचना कशी असावी हें पाहून पुढील प्रकरणाकडे वळूं.

बातमींतील महत्त्वाचा भाग वाचकांचे डोळयांत चटकन् भरला पाहिजे, ही मुख्य अट लक्षांत ठेऊन बातमी लिहावयाची असते, असें मागें सांगितलेंच. त्याच अटीचें सविस्तर स्वरूप आतां दुसऱ्या प्रकारानें पहावयाचें आहे. मुंबईस शिवरींत कापसाच्या वखारीस आग लागून दीड पावणे दोन लाखांचें नुकसान झालें असेल तर बातमींतील प्रमुख बाब ती राहील. किंवा नोकराच्या हलगर्जीपणानें विडीचें जळतें थोटुक कापडाच्या दुकानांत पडल्यानें ते पेटून ४।५ हजारांचें नुकसान झालें असलें तर, अशा क्षुल्लक आगीची बातमी वर्तमानपत्रांत येऊन, आग लागण्याच्या प्रकाराला महत्त्व मिळेल. अथवा असेंही होऊं शकेल कीं २०—२२ माणसें आगींत भाजलीं गेलीं असतील तेव्हां त्यांच्या निर्देशासच महत्त्व येईल. असेंही एखादे वेळीं घडलें असेल कीं, आग लागलेल्या घराच्या मालकाच्या कुत्र्यानें आग लागल्याची वर्दी, भुंकून दिली आणि एक तान्हें मूल होतें तें बाहेर काढीपर्यंत तो 'मोत्या' तेथून हलला नाहीं. ह्या क्षुल्लक वाटणाऱ्या बाबीसुद्धां बातमींत प्रामुख्यानें सांगण्याची पाळी येते. याचें कारण बातमींतील अत्यंत महत्त्वाच्या भागांत त्या येऊन बसतात. हें काम कसें करावयाचें त्या विषयींची थोडी चर्चा केली पाहिजे. वर्तमानपत्रांत द्याव-

याच्या बातम्या लिहून देण्याचें काम बातमीदार करतो, तेव्हां त्याला मथळे देण्याचेंही कार्य करावें लागतें. खरें पाहूं गेलें तर, लेखाला किंवा बातमीच्या ' तुकड्या ' ला शीर्षकें देण्याची एक कलाच आहे. आणि ती सर्वांसच साधते असें नाहीं. मोठमोठया वर्तमानपत्रांच्या कचेरींत हीं कामें खास तज्ञांकडेच दिलीं असतात. परन्तु सर्व साधारणरीत्या बातमीदारांसच तीं करावीं लागतात. तेव्हां मथळा देतांना तो, अर्थ – व औचित्यपूर्ण असाच देण्यानें बातमी वाचकांचे नजरेंत एकदम भरते आणि पत्र लोकप्रिय होतें. आगीचा प्रसंग घेतल्यास " मुंबईतील भयंकर आग " किंवा " × ××× चा अग्निप्रलय " या व्यतिरिक्त दुसरीं शीर्षकें कधींच आढळत नाहींत. पण त्याचे ऐवजी " दीड लाखाचा कापूस जळाला ! " " बावीस माणसें भाजलीं " " कुत्र्यानें मूल वांचविलें " असे अन्वर्थक मथळे देऊन मग आगीचें वर्णन दिल्यानें कसलीच हानि होत नाहीं. उलट मजकूर अधिक वाचनीय होतो. आणि तो तसा करण्यातच बातमीदाराचें कौशल्य कसास लागतें.

सारांश, ' मोटारीचा भयंकर अपघात ' टाळून त्या अपघातांतील बातमीसच प्रामुख्य देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. " मोटारींची टक्कर " असें न म्हणतां टकरींत जखमी झालेल्यांचा अथवा टक्कर होण्याच्या कारणाचा ( तें असामान्य असेल तर ) प्रथम उल्लेख करून ती बातमी सजवितां येते. " टांग्याचा अपघात " अशापैकीं ठराविक मथळा न देतां " श्री. जटार यांस दुखापत " या गोष्टीस प्राधान्य दिलें पाहिजे. ह्या व अशाच बारीकसारीक बाबींत नीट लक्ष घालून पांहिलें असतां वृत्तव्यवसायी इसमास किती सूक्ष्मतेनें अभ्यास करावा लागतो हें समजेल.

भाषांतर करतांना किंवा बातमीचा एखादा छेदक लिहितांना आणखी एक बाब लक्षांत ठेविली पाहिजे. पहिल्या एका वाक्यांत किंवा आवश्यक तर पहिल्या तीन वाक्यांत घडलेल्या सर्व प्रकारची माहिती आली पाहिजे. नंतर दुसरा छेदक करून त्यांत एकेक महत्त्वाच्या बाबींचा विस्तार करावा. असें करतांना देखील अनुक्रम साधण्यांत दक्षता बाळगावी लागते. प्रत्येक मुद्दा वेगवेगळ्या छेदकांत लिहिल्यानें दोन सोयी होतात. एक तर एकसूत्रता राहून सर्व लिखाण शिस्तबद्ध वाटतें आणि दुसरी सोय संपादकीय वर्गाची

आहे. जागेच्या मानानें आणि विषयास कमीअधिक महत्त्व द्यावयाच्या विचारानें, संपादकीय वर्गास नेहमीं हातीं ‘ कात्री ’ घेऊन बसावें लागतें. सर्वच बातमी किंवा वर्णन एकसारखें छेदक न पाडतां लिहिल्यानें कोठें कापावें याची संपादकांना पंचाईत पडते आणि मजकूर तर कमी केल्याविना गत्यंतर नसतें. अशा वेळीं महत्त्वाचा भाग गळूं नये, गळल्यास अर्थहानि किंवा लिखाणांत खड्डा वाचकांना भासूं नये म्हणून खबरदारी घ्यावी लागते. त्यासाठीं प्रत्येक बाबीचा वेगळा पॅरा करणें सोईचें असतें.

आगीची किंवा मोटारीच्या टकरीचीच गोष्ट पहाः—

दीड लाखाचें नुकसान

शिवडी बंदर येथें शुक्रवारीं रात्रीं दहा वाजण्याचे सुमारास कापसाच्या एका वखारीस आग लागून सुमारें दीड लाखाचें नुकसान झालें. वखार × × × × यांच्या मालकीची असून कापसाचा विमा उतरविला होता.

ह्या पहिल्या छेदकांत काय घडलें, कोठें घडलें व त्यांतील महत्त्वाची बातमी सांगितली आहे. वाचकानें ती वाचून पाहिली आणि त्याला गोडी वाटली अथवा महत्त्वाची भासली तर पुढें जावें. म्हणजे अधिक विस्तार त्यांत आढळेल अशा सोईनें मजकुराची रचना केली असली म्हणजे वाचकवर्ग वाढतो हें उघडच आहे. आणि वाचक वाढण्यापलीकडे आणखी दुसरें मुख्य ध्येय कोणतें असावयाचें ?

दुसऱ्या छेदकांत काय असूं शकेल ? आग कशी लागली, विझविण्याचे प्रयत्न कोणी व कसे केले, त्यांना यश किती आलें, वखार कोणाची, त्याच वखारीला मागें कधीं व कितीदां आगी लागल्या वगैरे किती तरी बाबींचा उल्लेख करतां येईल. त्यांतील महत्त्वाची कोणती ?

रात्रीं वखारीच्या आसपास धुराचे लोट दिसूं लागतांच राखणदार भय्यानें आगीची वर्दी दिली; व दोन बंब लगेच दाखल झाले. त्यांनीं प्रयत्नांची पराकाष्ठा करून एक बाजू विझवीत आणली इतक्यांत आणखी तीन बंब येऊन

> पोहोंचले. आग अधिक भडकूं शकली नाहीं याचें श्रेय पाचही बंबांनाच द्यावें लागेल. ××× ब्रिगेड अगदीं प्रथम हजर झाली आणि तीवरील आगवाल्यांनीं विशेष मेहनत केली. तरी पण सुमारें दीड लाख किंमतीचा कापूस जळाला किंवा खराब झाला असें म्हणतात.

अशा एका बाबीचा पूर्ण विचार केल्यानंतर दुसरी आगीची कारणमीमांसा घ्यावी. मग विम्याची वगैरे माहिती सांगून शेवटीं तेथें आजपर्यंत लागलेल्या आगी, त्यामुळें झालेलें नुकसान इत्यादि माहिती देतां येईल. वरचेवर आगी लागत असतील किंवा ह्या संबंधानें कांहीं विशिष्ट बाब सांगतां आली तर मात्र हा छेदक आधीं येईल.

> " गेल्या वर्षी देखील याच तारखेस ह्या वखारीस आग लागून नुकसान झालें होतें. पण वेळेवर बंब आले आणि गांसड्या कमी होत्या म्हणून गतवर्षी इतकें नुकसान होऊं शकलें नाहीं. "

तेव्हां कोणत्या कलमास महत्त्व असतें हें गणिती ठोकताळ्याप्रमाणें सांगतां येत नाहीं. सर्व परिस्थिति पाहूनच बातमीदारास नंतर तें ठरवावें लागतें.

इतका वेळ पहिल्या दिवशीं आगीची किंवा अपघाताची बातमी कशी द्यावी याची चर्चा झाली. दुसरे तिसरे दिवशींही त्याच अपघाताची थोडथोडी बातमी द्यावी लागते. आगीचें कारण किंवा एखादे वेळीं झालेलें एकंदर नुकसान यांचा अंदाज प्रथमच लागत नाहीं. तेव्हां त्यांचा निर्देश करतांना ' काल आग लागली होती ' असा संदिग्धपणें करून चालणार नाहीं.

> " शुक्रवारीं रात्रीं शिवडी बंदर येथें कापसाच्या वखारीस आग लागून दीड लाखाचें नुकसान झालें होतें, त्या आगीचें खरें कारण आज उघडकीस आलें...... "

अशा प्रकारानें प्रथमतः पहिल्या वाक्यांत मागील कथासंदर्भ थोडक्यांत पण पूर्णरीतीनें सांगणें आवश्यक असतें. आगीपेक्षां खून—चोरी, दरोडे, आत्महत्या इत्यादि अपघातांत ही ' चालू—कथा ' देण्याची संधि अधिक मिळते. प्रथम दिवशीं कोणीं आत्महत्या केली, कशी केली व उघडकीस

कशी आली एवढयाच बाबी कळतील. पण ती कां केली किंवा तो इसम कोण याची सविस्तर हकीकत तत्काळ कळतेच असें नाहीं. ती कळण्यासाठीं थांबावें लागतें. म्हणून दुसरे तिसरे दिवशीं सविस्तर तपशील कळल्याबरोबर तो लिहितांना आतांपर्यंत येऊन गेलेल्या बातमीचा गोषवारा एक दोन वाक्यांत दिला पाहिजे. हेतु हा कीं, बातमी वाचणारानें कोणत्याही दिवसापासून अंक घेण्यास सुरवात केली तरी त्याला ही बातमी अर्धवट कळली असें वाटूं नये. अनेक कारणें असतील कीं, ज्यामुळें वाचकाला मागील अंक मिळाला नसेल. पण तेवढयानें आजच्या अंकाच्या वाचनांत संकट उत्पन्न होऊं नये अशी व्यवस्था असणें वाचकांच्या सोईचें होतें. म्हणूनच एखाद्या विषयावर लेखमाला सुरू असते तेव्हां उच्च दर्जाचे लेखक व संपादक नवीन लेखांक सुरू करण्यापूर्वी मागील लेख केव्हां केव्हां आले व त्यांत कोणते मुद्दे विशद केले होते याचा थोडक्यांत निर्देश करतात.

बातमीदार किंवा वर्तमानपत्रें यांचा उपयोग समाजांतील घटकांच्या सोईसाठीं असल्यानें आपण जनतेची सेवा करणारे आहोंत ही भावना पत्र-पंडितांनीं सदैव लक्षांत बाळगली पाहिजे. लोकाना उपदेश करण्याचा प्रसंग वृत्तपट्टूंवर क्वचित् आला तरी आपण शहाणे म्हणून हा अधिकार आपणास मिळाला ही भावना कदापिही नसावी. 'लोक-सेवा' हेंच ध्येय नीट डोळ्यापुढें ठेवलें नाहीं, किंवा कसेंही लिहिलें तरी आपलें पत्र खपतेंच आहे अशी गैरसमजूत करून घेतली, म्हणजे मात्र पत्रपाटव संपुष्टांत आलें असें समजावें. आपणाजवळ असलेली बातमी लोकांपुढें कशी मांडावी हें जसजशी वृत्तपत्रांची सुधारणा होत जाईल तीवर अवलंबून राहील हें खरें. परंतु वाचकांची सोय जेणें करून अधिक होईल, अधिक वाचकांना जेणें करून हें वाचावेसें वाटेल किंवा अधिक काळपर्यंत तो वाचलेला मजकूर त्यांच्या लक्षांत जेणें करून राहील, अशी तरतूद करणें हें संपादकाचें, त्याच्या हस्तकांचें व बातमीदारांचेंहि काम असतें. आणि म्हणूनच मथळे, बातमीची देशवार किंवा विषयवार विभागणी इत्यादि प्रकारांचा अवलंब करतात.

## प्रकरण सातवें

# सभा-भाषणें-व्याख्यानें

अनपेक्षित घडामोडींची बातमी कशी मिळवावी हें पाहिल्यानंतर ती कशी लिहावी याबद्दल विवेचन झालें. आतां अपेक्षित प्रसंगाविषयींची बातमी कशी द्यावी ह्यासंबंधीं विचार करावयाचा आहे.

बहुतेक महत्त्वाच्या प्रसंगांचा कार्यक्रम अगाऊच समजत असतो. साहित्य संमेलन, म. गांधींचा दौरा, गव्हर्नरांचा कार्यक्रम वगैरे प्रसंग असे असतात कीं त्यांच्याविषयीं माहिती दोन दोन महिने आधीं लागते. त्यांतही नित्य व नैमित्तिक असे भाग पाडतां येतील. नित्य म्हणजे दरवर्षीं ठराविक वेळीं येणारे. उदाहरणार्थ, पुण्यतिथी, जयंति-दिन, बक्षिस-समारंभ, वार्षिक उत्सव वगैरे प्रति-वर्षीं येत राहणारच. मानपत्रअर्पण-विधि, कोनशिला किंवा उद्घाटन समारंभ हे नैमित्तिकांपैकीं होत. पण या दोन्हीं भागांचें साम्य असें कीं त्यांच्या कार्यक्रमाची सूचना अगाऊ मिळते. राजकीय चळवळीच्या सभा, लोकशिक्षणपर होणारीं व्याख्यानें किंवा या नाहीं त्या निमित्तानें होणारीं भाषणें यांची अगाऊ खबर खात्रीनें मिळते. आणि म्हणून अशा अपेक्षित प्रसंगांची बातमी देणें एका दृष्टीनें थोडें सोपें जातें.

अपघातांस बातमीचें महत्त्व ते अनपेक्षितरीत्या घडतात म्हणून असतें तर सभा-समारंभाना ते होणार होणार असें आधीं पुष्कळ गाजत असतें म्हणूनच बातमीचें महत्त्व प्राप्त होतें. अपेक्षित असो वा अनपेक्षित असो, बातमींत बसण्यासारखा मजकूर मिळविणें हें बातमीदाराचें आद्य कर्तव्य असल्यानें, त्याला सर्व प्रसंगांची नोंद ठेवावी लागते. ता. ... रोजीं अमुक ठिकाणीं अमुक कार्यासाठीं अमुक वाजतां सभा भरणार म्हणून प्रथम बातमी देऊन वाचकांची जिज्ञासा जागृत करावयाची आणि नंतर पूर्वी ठरल्याप्रमाणें सभा झाली, तींत अशीं अशीं भाषणें झालीं, म्हणून पुनः रिपोर्ट द्यावयाचा. कारण सभा होणार म्हटल्यावर तींत काय घडलें हें जाणण्याची उत्सुकता प्रत्येकाला लागून राहतेच.

आपणाला स्वतः हजर राहतां आलें नाहीं तरी वर्तमानपत्रांतील बातमी वाचून समाधान करून घेण्याची वृत्ति बहुतेकांची असते. तेव्हां गर्दीमुळें अथवा अन्य कारणानीं पुष्कळ लोकांना त्या प्रसंगास हजर राहतां आलें नाहीं म्हणून कांहीं बिघडत नाहीं. परंतु बातमीदार म्हणजे गैरहजर असणाऱ्या सर्वांचा ( व हजर असलेल्याचाही ) **डोळस** प्रतिनिधी असल्यानें त्याला हरप्रयत्नें करून अशा ठिकाणीं हजर राहिलेंच पाहिजे. आपले ठराविक संकेत पाळण्यांत बातमीदाराला अधिक दक्षता बाळगावी लागते ती यासाठींच. परंतु एकाच वेळीं अनेक ठिकाणचे समारंभ अथवा प्रसंग कसे साधावयाचे हा प्रश्न पडेल. तो यथावकाश सोडविण्यांत येईल.

समजा, श्री. सुभाष बोस विलायतेंतून परत स्वदेशीं आले तेव्हां मुंबईस त्याच दिवशीं संध्याकाळीं अझाद मैदानावर त्यांचें भाषण होणार असल्याची बातमी लागली. त्याना येण्यास ८–१० दिवस अवकाश आहे. तरी ती बातमी ताबडतोब देऊन टाकल्यावर, सभा घडून येईपर्यंत बातमीदारानें काय काय करावयास पाहिजे याची पाहणी करूं. म्हणजे अशा प्रसंगीं बातमीदाराचें काम काय असतें हें लक्षांत येईल. सुभाषबाबू मुंबईत येणार व आल्यावर राजकीय परिस्थिती संबंधीं व्याख्यान देणार एवढी बातमी दिल्यानें भागलें, असें वाटल्यास तें चूक होय. सुभाषबाबूंच्या सार्वजनिक कामगिरीचें थोडक्यांत निरीक्षण करण्याची हीच वेळ असल्यानें ती माहिती जमविली पाहिजे. वास्तविक प्रत्येक बातमीदाराजवळ व्यक्तींची अशी एक **खतावणी** असते – ( म्हणजे असावयास पाहिजे.) तींत ठळक ठळक व्यक्तींच्या चरित्रांतील मुख्य मुख्य प्रसंग तारीखवार टिपलेले असतात. सुभाष बोसचेंच नांव घेतलें तर त्यांच्या खात्यावर, केव्हां केव्हां कुठें कुठें अध्यक्ष झाले, भाषणांचा रोख, झालेल्या शिक्षा, खटल्यांच्या, अटकेच्या, सुटकेच्या तारखा, मेयर झाल्याची तारीख, मानपत्रें कुठें कुठें मिळालीं, इत्यादिकांचा निर्देश त्या खतावणींत हवा. त्यावरून पुष्कळ माहिती पाहिजे तेव्हां काढतां येते. तशीं साधनें जमविलीं नसतील तर अनेक पुस्तकें, मासिकें, त्रैमासिकें चाळून आवश्यक ती माहिती गोळा केला पाहिजे. तिच्या अनुरोधानें पत्रांत जागा असेल त्या मानानें १००, २००,४०० शब्द भरेल इतका मजकूर लिहावयाचा. मात्र त्यांत विलायतेंतील

कामगिरीस विशेष प्राधान्य द्यावयाचें असतें. कारण हा प्रसंग सर्व आयुः-क्रमाचें विहंगमावलोकन करण्याचा नसून तात्पुरत्या घडामोडीचें दिग्दर्शन — वाचकांची स्मृति ताजी करण्यासाठीं — करावयाचा असतो. " वाचकांच्या लक्षांत असेलच कीं " अशा आशयाची सुरुवात करून सुभाषचंद्रांना युरोप-खंडांत का जावें लागलें याचें कारण थोडक्यांत सांगून, तेथें राहून आजारी असतांना देखील त्यांचें सर्व लक्ष देशकार्याकडे कसें होतें, तें सागावें. आणि विशेषतः स्वतःच्या प्रकृतीस अपाय होत असतासुद्धां प्रे. पटेल यांची त्यांनीं अनन्यभावें शुश्रूषा केली तिचा उल्लेख अधिक विस्तारानें करणें रास्त. त्यांच्या राजकारणी मताचा कांटा कसा झुकला आहे हें दर्शविणारे एक दोन प्रसंगही निवेदन करणें इष्ट होईल.

एवढयानेंच झालें असें नाहीं. सुभाष बाबू उतरणार कुठें, मुक्काम किती, पुढें प्रयाण केव्हां व कोठें इत्यादि माहितीदेखील अवश्य हातीं पाहिजे. कारण सुभाष बाबूंसारखी व्यक्ति इतकी महत्त्वाची होऊन बसते कीं त्यांच्या प्रत्येक हालचालीकडे लक्ष देण्याची इच्छा नागरिकास होते. स्वदेशी–बाजारांत ते जाणार असतील, स्त्रीसंघामार्फत त्यांना चहापानाला निमंत्रण असेल, युवकांना खासगी रीतीनें कांहीं उपदेश ते करणार असतील — अशा किती तरी ठिकाणीं त्यांचा कार्यक्रम ठरला असेल, तर त्याचीही नोंद आपणांजवळ असावी व प्रसंगानुसार बातमी म्हणून तिचा उपयोग करावा. सुभाष बाबूंच्या प्रत्येक हालचालीस सार्वजनिक महत्त्व असल्यानें वर्तमानपत्रांत ते बातमीचें उगमस्थान होऊन बसतात. एका राजकीय पक्षाचे त्यांना मुख्य म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. त्यांचें जें मत तें सर्व बंगालचें असें मानतां येतें. म्हणून राजकारणांतील त्यांच्या पक्षाविषयीं, व बंगाली परिस्थितीसंबंधींचीं त्यांचीं मतें किंवा भाषणें विशेष अधिकृत मानलीं गेलीं तर आश्चर्य नव्हे. तेव्हां सुभाषबाबूंच्या ' पाळ-तीवर ' राहणें किती आवश्यक आहे हें कळलें ना ?

सुभाषबाबू उतरले वाळकेश्वरीं असें धरून चालूं XXX शेटनीं त्यांना मुद्दाम आपल्या बंगल्यांत ठेऊन घेतलें. त्यांच्या भेटीला कित्येक मंडळी आली, त्यांत प्रे. पटेल यांच्या आप्तेष्टांपैकीं बरेच जण असल्यास त्यावेळीं होणारें बोलणें बातमीच्या दृष्टीनें अत्यंत उपयुक्त ठरेल. आणि पटेलांच्या नातलगांत कोणी

वृद्ध स्त्री असेल तर ती मूक राहूनच सुभाषबाबूंविषयीं कृतज्ञता व्यक्त करील तो प्रसंग किंवा सुभाषबाबूंना मिठी मारून अश्रुसिंचन व्हावयास लागल्यानें तिला बोलवत नाहींसें झालें, तिनें नुसता सुभाषबाबूंच्या तोंडा-डोक्या-पाठीवरून हात फिरविला आणि आपला भाव मूक राहूनच व्यक्त केला...वगैरे प्रकार बातमीदारानें उत्तम वर्णन करण्याजोगा ठरतो. त्यांत केवळ भावनांचें दिग्दर्शन करावयाचें असतें. भावनाप्राधान्याबद्दल किंवा नश्वर देहाचा शोक करीत बसल्याबद्दल कुणालाच दोष द्यावयाचा नसतो हें नीट लक्षांत बाळगून झालेला प्रसंग यथातथ्य वर्णन करणें बातमीदाराचें कर्तव्य बनतें. हा प्रसंग यद्यपि सार्वजनिक नसला, अगदीं वैयक्तिक स्वरूपाचा असला, तरीही यच्चयावत् वाचकांस गहिंवरून सोडणारा असल्यानें तो बातमीच्या सदरांत येतो. असो.

त्याप्रमाणें, समजा, श्री. नरीमन किंवा कामगारांच्या तरुण पुढाऱ्यांपैकीं कोणी भेटावयास तेथें गेलें, त्यांचें बराच वेळ ' खलबत ' झालें, तर ती बाबही बातमीची होऊं शकेल. किंबहुना तेथें काय काय विषयावर बोलणें झालें असावें या संबंधींच्या तर्कटास त्या दिवशीं बरेंच महत्त्व येईल. ही व असलीच माहिती काढण्यासाठीं घरधन्याला भेटावें लागेल, सुभाषबाबूंचीही मुलाखत घेणें प्राप्त होईल. ह्या करितां बातमीदार सर्व प्रसंगासाठीं तयार असावा. कारण सुभाषबाबूंना, इतर रिकामटेकड्या लोकांप्रमाणें, गप्पा छाटण्यास फुरसत असणार कशी ? त्याचा एकेक क्षण मोलाचा. पुष्कळच पुढारी त्याच्याशीं विचारविनिमय करण्यास आलेले. तेव्हां सोईची वेळ पाहून, थोडक्यांत आपले प्रश्न त्यांना विचारून आपण मोकळे व्हावें, त्यांनाही जलदी मोकळे करावें हा मार्ग चांगला. आतां मुलाखत कशी घ्यावी वगैरे सूचना स्वतंत्र प्रकरणांत दिल्या असल्यानें येथें त्यांचा विचार नको.

सुभाषबाबूंना सभेच्या आधीं थोडेसें भेटून कांहीं विशेष असल्यास त्यांना विचारून ठेवावें. कारण जेव्हां जेव्हां विशेष मुद्द्यावर सार्वजनिक रीत्या पुढारी बोलतात, तेव्हां तेव्हां वर्तमानपत्राच्या ( व स्वतःच्याही ) सोईसाठीं बातमीदाराजवळ ' पत्रक ' देण्याचा किंवा स्वतः तोंडानें सांगण्याचा प्रघात ते पाळतात. सवड मिळाल्यास त्याची टाइप केलेली प्रत भाषणाच्या थोडा वेळ आधीं बातमीदाराच्या हातीं देतात. नाहीं तर भाषण संपतांच मला भेटा — किंवा

कुणातरी अधिकृत ' सेक्रेटरी ' ला भेटा — असें सुचवून ठेवतात. तो संकेत नीट पाळला पाहिजे. ' गडबड झाली, ' ' विसरलों, ' ' लक्षांतच आलें नाहीं, ' ' उशीर झाला ' इत्यादि सबबी इतर सर्व ठिकाणीं एक वेळ चालतील. पण बातमीदाराला......मु ळीं च ना हीं. असो. आतां सभेची वेळ झाली — चला तिकडे जाऊं.

सभेसाठीं गर्दी विलक्षण होती. पुष्कळ माणसें दीड दोन तास अगोदर येऊन बसलीं होतीं तसें तुम्हांला करण्याचें कारण नाहीं. साधारणपणें वक्ता बोलण्याचे आधीं किंवा सभा सुरू होण्यापूर्वी दहाएक मिनिटें गेला तरी भागतें. पण हें तुमच्या व्यवसायबुद्धीवरच अवलंबून राहील. प्रत्येक सभेच्या ठिकाणीं बातमीदारांसाठीं वेगळी जागा राखून ठेवतात. सभेच्या चालकांनाही बातमीदारांनीं तेथें यावें असें स्वार्थी दृष्टीनें वाटत असतें. आणि बातम्या देण्याचा तर बातमीदारांचा धंदाच असतो. तेव्हां दोघांच्या हितसंबंधासाठीं ही सोय बरी होते. नाहीं तर, कोठें तरी गर्दींत उभें रहावयाचें, उभ्या उभ्याच अर्धवट कानीं पडलेलीं वाक्यें लक्षांत ठेवावयाचीं व त्याचा कसाबसा रिपोर्ट करून द्यावयाचा — असा प्रसंग येतो, तो टाळावा. बातमीदारांची सोय वक्त्यांजवळ केलेली असते. खुर्ची टेबल त्यांना मिळतें. कारण श्रोत्यांपैकीं प्रत्येकजण स्वतः-पुरतेंच ऐकणार. फार तर तो आपल्या इष्टमित्रांस व शेजाऱ्यांस जें ऐकलें तें सांगेल. याच्यापलीकडे त्याची मजल जाणार नाहीं. शिवाय त्यानें अशी समग्र हकीकत सांगितलीच पाहिजे म्हणून त्याजवर सक्ति कोण करील ? पण बातमी-दाराचें तसें नाहीं. वर्तमानपत्राचे सर्व वाचक त्याच्याच कानांतून ऐकतात. संपादकाचें त्याहीपेक्षां महत्त्वाचें कार्य म्हणजे वक्त्याच्या भाषणाचें खंडन अथवा मंडन करण्यासाठींही त्यालासुद्धा बातमीदारावरच विसंबावें लागतें. म्हणून बातमीदारांना पुढचा मान मिळतो.

कांहीं ठिकाणीं अशी खास व्यवस्था नसली, तर चालक मंडळीस गाठून ती करून घेतां येते. बातमीदाराचें काम सार्वजनिक हिताचें असल्याची खात्री पटवून दिल्यानंतर कोणता चालक त्याला मागें ढकलून देईल ? किंवा आपल्या कामगिरीचा उल्लेख वर्तमानपत्रांत येऊं नये असें कुणाला वाटेल ? आणि एकदां बातमीदाराची ओळख सर्वांना पटली कीं पुढील वेळीं न सांगतां सर्व

कामें उरकतील. तुम्हांला आपण होऊन निमंत्रण येईल, पुढलें स्थान मिळेल, कितीही उशीरा गेलांत तरी जागा खास 'रिझर्व्हड्' राहील. मात्र हें सर्व न मागतां मिळावयास हवें. त्यासाठीं हट्ट धरून किंवा न दिल्याबद्दल खुनशीपणाची वृत्ती ठेवून मुळींच चालणार नाहीं. तुमच्या कर्तबगारीवर, सौजन्यावर व काम करण्याची हुषारी यांवर हें अवलंबून राहील. एकदा जागा मिळाली कीं तुम्हीं आपल्या दोन चार पेन्सिली (त्याचीं टोकें केलेलीं) फौंटनपेन व टिपणें घेण्याची वही इत्यादि शस्त्रें परजून तयार झाले पाहिजे. मुख्य वक्ते बोलण्यास उभे राहण्यापूर्वी कांहीं महत्त्वाच्या गोष्टींचा उल्लेख तुम्हीं करावयास पाहिजे; सभेस हजर मंडळी कोण कोण आहेत हें पाहिलेंच पाहिजे; तुम्हीं त्याचा उपयोग केला नाहीं तरी चालेल. जेव्हा सर्व वृत्तात सजविण्यांत आपण इतर बातमीदारांहून कचे आहोंत ही खात्रीच असते किंवा अन्य मार्गानें तरी वाचक-वर्ग खूष केला पाहिजे अशी जाणीव होते, तेव्हा मात्र "सभेस खालील मंडळी हजर होती" म्हणून सविस्तर यादी द्यावी. "आपलें नांव आलें" म्हणूनच हा रिपोर्ट व रिपोर्टरही चांगला असें समजणारे वाचक व तेवढयावरच संतुष्ट असणारे ग्राहक आपल्या मराठी समाजात कांहीं कमी नाहींत. ही रीत वृत्तव्यवसायाच्या दृष्टीनें गौणच ठरते. तरी पण इतर विचारासाठीं तिचा अवलंब काहीं काहीं शिष्ट वृत्तपत्रेंहि करतात. तसा तुम्ही पाहिजे तर करूं नका. पण कोण कोण मंडळी आली यासाठीं तरी सभेंवार दृष्टि फेकून प्रमुख मंडळींची नांवनिशी लिहून घ्यावी. जिल्हा–निहाय खपणाऱ्या पत्रांत मात्र नांवनिशी देणें फायदेशीर ठरतें. आपलें सर्वच जीवन व्यक्तिप्रधान असल्यानें, बातमींत कोण कोण प्रमुख आहेत हें जाणण्यासाठीं उत्सुकता सर्वांस असते. ह्याच वेळीं ज्यांना तुम्हीं ओळखत नसाल त्यांची चेहरेपट्टी नीट निरखून ठेवा. नेहमीं सार्वजनिक कार्यांत पुढें असणारीं माणसें तुमच्या परिचयाचीं असलीं पाहिजेत. ते कदाचित् तुम्हाला "× × × चे बातमीदार" म्हणून ओळखणार नाहींत. पण × हे × ते श्री. × × × × × × ... असें निश्चितीनें सागण्याइतकी तुमची तयारी पाहिजे.

या नंतर दुसरें काम म्हणजे हजर लोक किती आहेत याचा अंदाज करण्याचें. दर खेपेसच श्रोतृसमुदायाची शिरोगणति अचुक करून बातमींत लिहावी लागत नाहीं. परंतु बातमीदारास अवगत असावयास पाहिजे अशा अनेक

अटकळी असतात, त्यापैकींच ही एक आहे. श्रोतृसमुदायाची कल्पना आपणांस बरोबर असावी. या बाबतींत इतरांचे अंदाज बहुशः चुकलेले असतात. वर्तमानपत्रांत येणारे आंकडे कोणत्या तरी एका टोकाकडे नेहमीं झुकलेले ठेवण्याची पद्धति पडली आहे. किंबहुना परिस्थितीनेंच ती भाग पाडली आहे, असें म्हणतां येईल. परंतु वर्तमानपत्रांतून म्हणून संपादकांस जें कार्य साधावयाचें असतें, त्यासाठीं आणि वैयक्तिक शक्तींचा विकास म्हणूनही बातमीदारास हा अंदाज बरोबर करावयास शिकलें पाहिजे. अझाद मैदानाचीच गोष्ट घेतली तर तेथें जनसमूह अफाट राहूं शकतो. पण मुंबईस जास्तींत जास्त किती मंडळी जमतात याचा अंदाज नेहमीं लक्षांत हवा. कावसजी जहागिर हॉल, मारवाडी विद्यालय किंवा ब्लॅव्हॅट्स्की लॉज अशा ‘ बंद ’ ठिकाणीं सभा असते, तेव्हां जास्तींत जास्त किती श्रोते बसूं शकतात याचा आंकडा बातमीदारानें मनांत तयार केला पाहिजे. आणि मग आंत बसलेली मंडळी किती याचा अंदाज करावा. त्याची सोपी व ढोबळ रीत अशी. आपल्या जवळच्या श्रोत्यांची लांबच लांब पंगत समजून तींत किती जण बसले याचा आंकडा मोजावा. नंतर आडवे लोक बसले असतील त्यांची संख्या मोजावी. मात्र अशा वेळीं समुदाय फार मोठा असेल तर लहान लहान गट पाडतां येतात. मंडप असल्यास दोन खांबांमधल्या मंडळीचा एक गट करून त्यांतली मंडळी मोजावयाची आणि नंतर किती गट आहेत त्यांची गणना करावी. हा हिशेब अगदीं काटेकोर-पणानें न करतां होईल तितक्या उदारतेनें करावा. नेहमीं दशकांत हिशेबाचा आंकडा घ्यावा आणि श्रोत्यांची संख्या सांगतांना हजार व शतक यांचाच उपयोग करावा. अझाद मैदानावर मात्र हा अंदाज करणें कठिण जाईल. मंडळी वर्तुळाकार बसली असल्यास पहिल्या ओळींतील लोक मोजावे. त्यांच्या मागें किती ओळी आहेत तें पहावें. नंतर हिशेब करण्यास सोपें जाईल. समजा दहा माणसें अगदीं पहिल्या रांगेंतील एका भागांत असून एकंदर बारा रांगा आहेत. वर्तुळ वाढतें असल्यानें पुढल्या ओळींत फक्त १० च इसम असले तरी मागें जावें तसतशी त्यांची संख्या वाढते, हें लक्षांत घेऊन त्या तेवढयाच भागांत किती मंडळी आहेत हें मोजलें पाहिजे. ढोबळ मानानें १२×१० यांच्या गुणाकाराची दिढी केली कीं अंदाजें तितकी माणसें त्या भागांत बसलीं आहेत असें खुशाल धरून चालावें. आणि त्याच हिशेबानें पाहिलें तर पुढच्या

रांगेंत वर्तुळाकार मंडळी बसलीं असतील त्या मानानें व त्यांच्या रांगा असतील त्या हिशेबानें वाटेल त्या जमावाचा अंदाज बांधतां येतो. अस्तु.

इतकी तयारी होईपर्यंत अध्यक्षांची निवडणूक, वक्त्यांचा परिचय, प्रास्तविक भाषण वगैरे ठराविक प्रकार आटोपतातच. त्याना वर्तमानपत्रांत फारशी जागा नसते. त्या वेळचा मुख्य पुरुष म्हणजे सुभाष बोस असल्यानें इतरांचा व त्यांच्या बोलण्याचा निर्देश नुसता ओझरता करावा लागतो. नाहीं तर मुख्य वक्त्याच्या भाषणाला १० ओळींत बसविण्याची, व अध्यक्षांची निवडणूक आणि प्रास्ताविक भाषण यांचेसाठीं पाऊण कॉलम खर्ची घालण्याची पाळी यावयाची. अशा प्रकारचा हास्यास्पद प्रयत्न कोणीही करूं नये. मुख्य वक्ता त्या दिवशींचा नायक समजला असल्यानें त्याचेंच मुद्द्यापुरतें भाषण द्यावें. म्हणून सभेला प्रारंभ होण्यापूर्वीं आपणांस किती ‘ अवकाशांत ’ लेखन आटोपावयाचें आहे याचा अंदाज बांधावा आणि त्याच प्रमाणात सर्व बसविण्याची तयारी ठेवावी.

मुख्य वक्ते म्हणजे सुभाष बोस बोलण्यास उठले असें मानून आपण पुढें काय करावयाचें तें पाहूं. त्याचें भाषण शब्दशः टिपून घ्यावयाचें कीं काय ? किंवा छापतांना सुद्धां जितकें ऐकलें तेवढें सर्व लिहून काढून छापखान्यांत पाठवावयाचें ? हें तर अगदींच अशक्य. अशीं भाषणें साधारणपणें तास दीड-तास तर चालतातच. आणि त्यांचें स्वरूप आपल्या कानीं पडलें तसेंच वाचकांना वाचण्यास द्यावें अशी इच्छा असली तरी ती साधावयाची नाहीं. एक तर प्रथम इतकें भाषण लिहून घेतांना पंचाईत पडेल आणि दुसरें असें कीं वर्तमानपत्रातील इतर सर्व मजकूर, जाहिराती, तारा, वगैरे काढून टाकल्या तरच त्या भाषणाला जागा होईल. थोडक्यांत भाषण देण्याची पद्धत यामुळें पडली आहे. संध्याकाळीं किंवा रात्रीं ८-१० वाजेपर्यंत चाललेल्या सभेंतील भाषणें आपण लगेच सकाळीं वाचतों. याचें कारण तीं थोडक्यांत देण्याची कला फैलावली आहे हेंच होय. एका तासांत आपण किती बोलतों याची कल्पना बहुतेकांना नसावी. सर्व साधारणपणें वक्ता दर मिनिटास निदान शंभर शब्द यां वेगानें भाषण करीत असतो. ह्या हिशेबानें तासाला ६००० शब्द होतील. ते साग्र लिहून घेणारा लघुलेखक तयार आहे असें धरून चालल्यास वर्तमान-

पत्राला निदान ८–१० कॉलम खर्ची टाकावे लागतील. कारण मजकूर अगदीं खेंचून भरला तरी १००–११० पेक्षां एका वर्तमानपत्रीं कॉलममध्यें अधिक ओळी बसत नाहींत. आणि एका ओळींत सरासरीनें ६ शब्द असतात. तेव्हां ह्या सर्व भाषणाचा कंपोझिंग खर्च काय येईल ? बरें, इतर मजकूर म्हणजे तारा, बातमीपत्रें, वर्तमानसार, संपादकीय टिपणें, लेख वगैरे त्या दिवशीं अजिबाद द्यावयाचीं नाहींत कीं काय ? किंवा असेंही समजून चालू, कीं खास पुरवणी काढून तें सर्व भाषण जसेंच्या तसें छापलें, तर किती जण तें समग्र वाचतील ? वाचक म्हणून तुम्हीही वर्तमानपत्रें चाळतां, आणि कित्येक वेळीं अशी समग्र छापील भाषणें वर्तमानपत्रांत आढळतात. त्यातलीं तुम्ही किती वाचलीं आहेत हें अगदीं इमानानें स्वतःलाच सांगा. इतक्या विस्तारानें सांगितल्याशिवाय ही गोष्ट पटणारी नव्हे. प्रत्येकाला वाटत असतें कीं, मी चांगला तास दीडतास बोललों आणि ह्या बेट्या रिपोर्टरांनीं माझ्या व्याख्यानाची संभावना ८-१० ओळींतच केली आहे !

परंतु अशा ज्ञानलवदुर्विग्धांची समजूत प्रत्यक्ष चतुर्मुख ब्रह्मदेव आला तरी पडणार नाहीं. बातमीदारापुरतेंच आपण पहात असल्यानें इतकें लक्षांत घ्यावयाचें कीं कुठलेंही भाषण सहसा जसेंच्या तसें छापत नसून त्याचा सारांश, मुद्दा, मतितार्थ, थोडक्यांत सांगणें हेंच बातमीदाराचें काम असतें. शब्दशः भाषण टिपून घेणें ही एक असाध्य कला असेल कदाचित्. पण दीर्घ भाषणांचा सारांश वर्तमानपत्रांसाठीं ताबडतोब – भाषण चालतां चालतांच – लिहून देणें ही त्यापेक्षांही अधिक उच्च दर्जाची कला आहे. म्हणून बातमीदारास ह्या कलेकडे, ही कला संपादन करण्याकडे अधिक लक्ष दिलें पाहिजे. बातमीदाराच्या आंगचा महत्त्वाचा गुण तो हाच. तास दोन तास चाललेलें चऱ्हाट तो ऐकतो – अगदीं मन लावून ऐकतो; पण नेमकें ग्राह्य असेल तेवढेंच टिपून संपादकास नेऊन देतो. नीरक्षीरविवेक हा सध्यांच्या काळांत काल्पनिक हंसांना उरला नसून बातमीदारांच्या ‘ नशिबीं ’ आला आहे. भाराभर भाषणें ऐकिलीं, अनेक गोष्टी कानांवर पडल्या, पुष्कळसें निरीक्षण केलें, बरीच माहिती समजली, तरी त्यांतील फारच अल्प अंश उपयोगांत आणावा लागतो. आणि तोच तेवढा इतक्या मोठ्या राशींतून निवडून काढणें सोपें नव्हे. नवाशिक्या बातमीदाराचीं किती

तरी बातमीपत्रें कांहीं कांहीं वर्तमानपत्रांत आपणांस वाचावयास मिळतात. त्यांत मुख्य वक्त्याचें प्रतिपाद्य विषयावरील भाषण बाजूलाच राहिलेलें आढळतें. मात्र अध्यक्षांची निवडणूक, वक्तयांची ओळख, हे जे औपचारिक प्रकार असतात त्याचें किंवा वक्त्याच्या भाषणांतील इतर विनोदाचें पाल्हाळिक वर्णन असतें. हजर असलेल्या मंडळींची लांबलचक यादी, मधून मधून कंसांत ( टाळ्या ) ( हंशा ) अशा सूचनांचा वारंवार उल्लेख केलेला दिसतो.

वास्तविक पाहिलें तर वक्त्याच्या कोणत्या विधानामुळें हंशा पिकण्यासारखा आहे किंवा कोणत्या विधानाबद्दल टाळ्या मिळाल्या, हें रिपोर्ट यथातथ्य असेल तर, न सांगतांच समजलें पाहिजे. आणि तसें तें समजतें सुद्धां. परंतु मराठींतील रिपोर्ट पद्धति अगदीं बाल्यावस्थेंत आहे. बातमीदार कानावर पडत जातील त्यापैकीं मनांत घोळतील तेवढींच वाक्यें टिपून घेत राहतात. तीं सर्व एकत्र केलीं तर नीट संदर्भ लागत नाहीं. विषय प्रतिपाद्य काय होता आणि या वाक्यांचें प्रयोजन काय असाही कित्येक वेळां प्रश्न पडतो. परंतु हा दोष वक्त्यांचा व बातमीदारांचा असा दुहेरी आहे. त्याविषयीं चर्चा थोडक्यांत आटोपून सुभाषबाबूंच्या भाषणाकडे कान दिले पाहिजेत. पुष्कळ वेळां विनयाचें प्रदर्शन म्हणा किंवा श्रोत्याना आपल्या प्रकृतीची नाजुकता समजावी म्हणून असेल, वक्ते आत्मचरित्रपर उल्लेख भाषणारंभीं करतात. तो विषय १०–१५ मिनिटेंही कदाचित् चालेल. भाषण करण्यास आपण कसें उद्युक्त झालों, आपल्या स्नेही मंडळींनीं आग्रह करून कां ठेऊन घेतलें किंवा ओघाओघांत आमचा व त्यांचा स्नेह कसा, केव्हां, कुठें जडला इत्यादि पुराणहि व्याख्यानारंभीं घुसडलें जाण्याचा संभव असतो. अर्थातच या बाबींचा व्याख्यानाच्या विषयाशीं तादृश संबंध नसल्यानें त्या ऐकावयाच्या व तशाच कानामागें टाकावयाच्या. त्यांचा निर्देश करणें झाल्यास एकदोन वाक्यांतच करावा. असो.

सुभाषबाबूंचें भाषण सुरु झालें. ‘ राजकीय परिस्थिती ’ ह्या विषयावर ते बोलणार. मुंबईस अझाद मैदानावर जमलेल्या लोकसमूहापुढें होणारें भाषण. तेव्हां प्रथमतः औपचारिक म्हणून जरी त्यांनीं मुंबईच्या राजकीय कामगिरीचा निर्देश केला, मुंबईतील मोठमोठ्या दिवंगत व्यक्तींचें पुण्यस्मरण केलें,

किंवा स्वतःला मुंबईबद्दल काय वाटतें हें सांगितलें, तर तें विषयांतर खास नव्हे. परंतु त्या बरोबर इतकें लक्षांत घेतलें पाहिजे कीं शब्दशः तोच निर्देश आपल्या रिपोर्टांत येऊं शकत नाहीं. शक्य तितक्या थोडक्या जागेंत एतत्संबंधींचें वर्णन आटोपलें पाहिजे. वर्तमानपत्रांतील प्रत्येक ओळीला, प्रत्येक शब्दाला, जागेचें भाडें म्हणून द्यावें लागतें ही एक जाणीव असूं द्यावी. दुसरी गोष्ट हमेशा लक्षांत ठेवावयाची ती ही कीं, वाचकांची प्रवृत्ति '**थोडक्यांत**' सगळें समजावून घेण्याकडे सध्यां अधिकाधिक झुकत चालली आहे. जास्त वेळ खर्च करणें बहुतेकांना आवडत नाहीं — वर्तमानपत्रें वाचण्यांत तर मुळींच नाहीं. अशा परिस्थितींत ४–५ कॉलमी लेखांमुळें वाचक आकर्षले जाण्याऐवजीं बुजून मात्र जातात. म्हणून थोडक्यांत सार काढण्याची कला साध्य हवी.

भाषणारंभीं प्रास्ताविक विचार प्रकट केल्यानंतर कदाचित् सुभाषबाबू आपल्या गैरहजेरींत हिंदी राजकारणाचा गाडा कसकसा गेला याचा थोडक्यांत आढावा घेतील. त्यांत त्यांचें वैशिष्ट्य असेल तो त्या वैशिष्ट्यासह उतरून घ्यावा लागेल. आणि त्यांच्या निवेदनांत आणि बहुजन समाजाच्या विचार-सरणींत फरक असा नसेल तर, मग "त्यांनीं राजकीय प्रगतीचा आढावा घेतला" अशा वाक्यांतच तो समाविष्ट केला पाहिजे. बहुधा असल्या वक्त्यांचें वैशिष्ट्य मतभेदांत असतें. उदाहरण देऊनच बोलावयाचें तर गांधी–अर्विन करार बहुतेक जण हिंदुस्थानच्या इतिहासातील महत्त्वाचा प्रसंग मानतील व त्यायोगें कॉंग्रेसची प्रतिष्ठा वाढली असें म्हणतील. परंतु सुभाष बोस किंवा त्यांच्या विचारसरणीचे लोक "ही अत्यंत मोठी घोडचूक" म्हणूनच त्या कराराचा निर्देश करतील. ते काय बोलतील व काय नाहीं हें आधीं भविष्य वर्तविण्याचा माझा उद्देश नसून त्यांच्या भाषणांतील ग्राह्य भाग असा कोणता व तो कसा शोधून काढावा हें दाखविण्यासाठीं वरील उदाहरण घेतलें. अशाच प्रकारें इतर सर्व भाषण ऐकावें. महत्त्वाचे भाग वाटतील ते टिपून घेत रहावें. लोक टाळ्या देतील, 'हियर' 'हियर' म्हणून ओरडतील तो भाग अर्थातच महत्त्वाचा असणार. किंवा खुद्द वक्त्याच्या आवाजावरून, चर्येवरून, त्याच्या भाषणांतील सार कोणतें, हें तो बोलत असतां अनुमानतां येतें.

पण भाषणातील मुद्दे नुसते उतरून घेतल्यानें भागतें असें नाहीं. एका प्रश्नावरून दुसरीकडे ते कसे वळले हें सांगावें लागतें. किंवा त्यांनीं × × अशा × × अशा मुद्द्यांची सांगोपांग चर्चा केली असें म्हणावें लागते. एक एक मुद्दा श्रोत्यांच्या मनावर बिंबविण्यासाठीं सुभाषचंद्रानीं ५०–६० वाक्यें उच्चारलीं असतील आणि त्याचा परिणाम लोकांनीं टाळ्या देऊन व्यक्त केला असेल तर त्या मुद्द्याचा एका वाक्यात उल्लेख करतां येतो. आणि ' लोकांना तें पटलें असें दिसलें ' असें म्हणता येतें. कांहीं समर्पक व पटणारे असे दृष्टान्त सुभाष बोसनीं दिले; आयर्लंडच्या इतिहासांतील दाखले दाखविले असतील; त्या सगळ्यांचा थोडक्यांत निर्देश करावयाचा असतो. भाषणाचा सर्व भाग एकसूत्री वाटावा, त्यांत मध्येंच पायऱ्या सोडून उड्या मारल्या आहेत असें भासूं नये, म्हणून रिपोर्ट लिहिताना मुद्द्याचा अनुक्रम साधला पाहिजे. तसेंच ह्या प्रश्नावरून त्या प्रश्नावर उडी कशी गेली ही पचाईत वाचकांना सहसा पडूं नये अशा बेतानें भाषण लिहिलेलें असावें. वक्त्याच्या शब्दांत देतां आला नाहीं तरी हरकत नाहीं, पण सारांश विपर्यस्त नसावा. मराठी वाचकांना मात्र ' डायरेक्ट ' पद्धतीनें लिहिलेलें भाषण अधिक आवडतें म्हणून तसेंच लेखन ठेवावें. परंतु मधून मधून, ' आशय असा होता, ' ' युक्तिवादाचें सार असें होतें, ' ' × × चें म्हणणें चांगल्या प्रकारें खोडून काढलें ' ' × × × ना निरुत्तर करणारा जबाब दिला ' अशीं वाक्यें घालता येतात. ' डायरेक्ट ' व ' इन्डायरेक्ट ' अशा दोन्हीं प्रकारचीं मिळून भाषणें रिपोर्ट करणें केव्हांही श्रेयस्कर. असो.

आतां सुभाषबाबूंचें भाषण संपविण्यास हरकत नाहीं. भाषण संपतांना बातमीदारास काय करावयाचें असतें त्याची चर्चा केली पाहिजे. बहुतेक चांगले वक्ते आपल्या भाषणाचा सारांश तें संपविण्यापूर्वी सांगतात. त्याचा उपयोग श्रोत्याना होवो अथवा न होवो, त्याच्याशीं आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं. परंतु बातमीदाराला मात्र त्या सारांशाचा फार फायदा मिळतो. हा उपसंहार जसाच्या तसा वर्तमानपत्रांत देण्याचें कारण नसतें. फार काय, भाषण करतांना उपसंहाराची आवश्यकता भासते तशी वर्तमानपत्रांतील रिपोर्टाला मुळींच नसते. कारण उघड आहे. वक्त्याचे शब्द हवेंत एकसारखे उडून जात

असतात. त्यामुळें श्रोत्याची स्मरणशक्ति ताजी तवानी करण्यासाठीं वक्ता त्या विचारांचा सारांश सांगतो. तशी बाब वर्तमानपत्रांची नसते. त्यांत भाषणाचें सार सूत्ररूपानें सदैव डोळ्यांपुढें असतां त्याचा पुनः सारांश हवा कशाला ? ह्या उपसंहारानंतर आभार मालिका गुंफण्यास प्रारंभ होतो. तिकडे लक्ष देण्याचें कारण नाहीं. बातमीदाराच्या अत्यंत धांदलीची वेळ ती हीच. त्याची पेन्सिल किंवा ' मशी प्रसू ' जोरजोरानें धावत राहते.

अध्यक्षांचा समारोप हा थोडासा महत्त्वाचा भाग असतो. बहुधा हे अध्यक्ष खुर्ची विभूषित करण्यासाठींच असतात. आणि उत्कृष्ट वक्ते बोलून गेल्यानंतर, शहाणा अध्यक्ष असेल तर, अधिक न बोलतां थोडक्यांत औपचारिक समारोप करून आपला विरोध अथवा आपलें सहमत नमूद करून सभेचें काम आटोपील. परंतु आमच्याकडे मोठी उणीव आहे ती हीच ना ! त्यामुळें वक्त्याचें दीड दोन तास भाषण झालें तर अध्यक्षानें पाऊण तास तरी निदान श्रोत्यांपुढें पुराण वाचलें पाहिजे अशी बऱ्याच ठिकाणीं अध्यक्ष होणारांची ( चुकीची ) कल्पना असते. श्रोते कंटाळून गेले तरी अध्यक्ष " थोडक्यांत " आटोपत असतातच. हा प्रकार इष्ट कां अनिष्ट तें बातमीदारांस ठरवितां येत असलें, तरी त्याला वळण लावणें सर्वस्वी त्याच्या हातांत नसतें. पण अशावेळीं मुख्य वक्त्याचें भाषण संपलें कीं, उठून जाण्यास बातमीदारास मुभा असते. मात्र अध्यक्षांच्या बोलण्याकडे कान दिलेले असावेत. अध्यक्ष बातमीच्या दृष्टीनें महत्त्वाचे नसतील, त्यांचीं राजकीय मतें अन्य प्रसंगीं बाहेर पडलीं असतील किंवा त्यांचीं राजकीय मतें कोणीं मानीत नसेल, तर मग त्यांचा समारोप ऐकण्याचें कारणच नाहीं. " फार तर अध्यक्षांचा वक्त्यांशीं मतभेद झाला " किंवा " अध्यक्षांनीं वक्त्याच्या विचारसरणीस दुजोरा दिला " अशाच एक वाक्यी रिपोर्टानें त्यांची संभावना केली पाहिजे. नंतर अध्यक्षांचे आभार मानतात व हार तुरे, पानसुपारी हे उपचार होतात. त्यांकडे बातमीदाराचें लक्ष नसलें तरी चालतें.

पण भाषण संपेपर्यंत त्या भाषणाचा बहुतेक रिपोर्ट लिहून तयार राहिला पाहिजे. आणि भाषण संपतांच वक्त्याच्या पुढील हालचालीविषयीं खबर काढण्यासाठीं त्याच्याभोंवती घुटमळलें पाहिजे. किंवा व्याख्यान संपतांच त्यांनीं

बातमीदारांस बोलाविलें असल्यास त्यांना गाठणें आवश्यक होईल. पट्टीचे वक्ते आपल्या भाषणाचा विपर्यास होऊं नये म्हणून सारांश आधींच लिहून तयार ठेवतात व भाषणारंभीं किंवा भाषण संपतांच त्याच्या प्रती बातमीदारांस देतात. त्यानें काम पुष्कळसें वाचत असले तरी मूळ भाषण होईपर्यंत बातमीदारानें होतां होईल तो हजर राहणें इष्ट. असो.

आता सुभाषबाबूंना सोडून साधारण प्रतीचे वक्ते भाषणासाठीं येतात, त्यांच्या व्याख्यानाचा रिपोर्ट कसा घ्यावयाचा, काय दक्षता बाळगावयाची तें पाहिलें पाहिजे. कित्येक वक्त्यांच्या भाषेच्या चुका पुष्कळ होतात. कारण ज्या भाषेंत भाषण होतें ती त्यांची मातृभाषा नसते; किंवा असली तरी अन्य कारणांनीं, इंग्रजीचा उपसर्ग बाधतो म्हणून पाहिजे तर म्हणा, त्यांचे वाक्प्रचार चुकीचे होतात, रचना क्लिष्ट व दोषी होते; धेडगुजरी मिश्रण ही बरेच वेळां होतें. पण तेवढ्यानें तें तसेंच्या तसें रिपोर्टात उतरविणें मूर्खपणाचें होईल. तसेंच वक्त्यानें केलेल्या विनोदी कोट्या ह्या भाषणाच्या संपूर्ण रिपोर्टात खुलतील तशा साररूपानें येणाऱ्या भाषणांत मुळींच खुलणार नाहींत. उलट विषयांतर झालें असें वाटून वर्तमानपत्रातील रिपोर्ट अर्थोत्पादक होणार नाहीं. तेव्हां अशा बारीक सारीक बाबी कर्णपथावर पडल्या असल्या तरी त्याचा उपयोग भाषणाचें सार देतांना नेहमीं करतां येत नाही. तसेंच, होता होईल तों भाषण वक्त्याच्याच शब्दांत देणें सोईचें असलें तरी मधून मधून आपल्या शब्दात त्याचा ग्राह्यांश सांगणे आवश्यक होतें. अवतरणात काहीं वाक्यें, तर कित्येक, "वक्त्याच्या म्हणण्याचा मतितार्थ असा होता." "त्याना हें मत मुळींच पटले नाहीं" अशा रितीनें जागा कमी करणारीं असतील. त्यामुळें काहीं बिघडत नाहीं.

भाषण ऐकतांना बातमीदारास एक शिक्षण घ्यावयाचें असतें आणि तें म्हणजे एकाग्रतेचें. सभेमध्यें इतर बडबड नित्याप्रमाणें चालू असतां वृत्तपट्टू आपल्या पत्राचा रिपोर्ट तयार करीत असतात. जशी काहीं तेथें कोणी मंडळी जमलेलीच नाहींत अशी वृत्ति बनवावी लागते. मात्र मुख्य वक्ता बोलत असता व्यवधान अन्यत्र देऊन चालत नाहीं. प्रारंभीं अथवा अखेरीस, किंवा मामुली साच्याचीं भाषणें होत असतांना आपलें लेखन

कार्य चालू ठेवणें दोन दृष्टींनीं हितावह असतें. प्रथमतः लिखाणांत एक प्रकारचा ताजेपणा व जिवंतपणा राहतो आणि आजूबाजूच्या सर्व वातावरणाचा व परिस्थितीचा योग्य परिणाम लेखकाच्या मनावर झाल्याचें त्या रिपोर्टांत प्रतिबिंबित दिसतें. दुसरा फायदा हा कीं लेखकांस एकाग्र होतां येतें.

कांहीं महत्त्वाच्या भाषणाच्या अथवा सभेच्या कामाच्या बातम्या तारेनें पाठवावयाच्या असतात तेव्हां तर विशेषच दक्षता बाळगावी लागते. सर्वसाधारणपणें सभेचें काम कोणत्या ठराविक कार्यक्रमाप्रमाणें चालणार हें सुरवातीपूर्वीच कळण्यासारखें असतें. तें नीट लक्षांत ठेवून व शक्य तर कार्यक्रमाची एक प्रत मिळवून आपल्या मनांतच त्यांतील महत्त्वाचा भाग धुंडून काढावा. सभेंत ठराव मांडले जाणार असतील तर त्यांतील मुख्यच टिपून घ्यावे. इतर 'अधिकारदाना ' चे ठराव तर नेहमींचेच असतात. जरूर पडल्यास त्यांचें भाषांतर करून ठेवावें. त्यावर बोलणारे पुष्कळ असले तर सर्वांचीं भाषणें लिहून घेण्याचें कारण नाहीं. बातमीच्या महत्त्वाचें " व्यक्तिमाहात्म्याचें " माप उपयोगांत आणून प्रत्येक वक्त्याची किंमत ठरवावी. आणि मगच त्या मानानें त्याला जागा किती द्यावी लागेल हें कळेल. जागेचें मान समजल्यानंतर भाषणांतील केवढा भाग घ्यावयाचा हे आपोआपच ठरतें. कांहीं कांहीं वेळा असें होतें कीं ठरावच महत्त्वाचा असतो आणि वक्ते अगदीं सामान्य असतात. त्यावेळीं " × × × ही ही मंडळी ह्या ठरावावर बोलली " अशा कंठाळी स्वरूपातच त्यांचा निर्देश करणें योग्य होईल. तेव्हा ठराव, व्यक्ति व त्यांचें भाषण ह्या निरनिराळ्या घटकांवर भाषणाचा विस्तार अवलंबून राहील, हें लक्षांत घेऊन त्यांची आपल्या दृष्टीनें किती किंमत इष्ट आहे हें मनाशींच ठरवावें. प्रो. धों. के. कर्वे यांनीं स्त्रीशिक्षणावर प्रकट केलेले विचार, व्यक्ति आणि विषय या दोन्ही मुळेंही बातमीच्या सदरांत बसूं शकतील. पण एकादा विद्यार्थी सार्वजनिक सभेंत ' कामश्चाटकामधील राज्यपद्धति ' या विषयावर बोलला तर त्याला किंमत मुळींच देतां येणार नाहीं. त्याच्या वक्तृत्वाबद्दल त्याला तेथें बक्षीस मिळालें असलें किंवा लोकांना सुद्धां कामश्चाटकाविषयीं पुष्कळ नवी माहिती कळली, तरी व्यक्ति आणि विषय यांच्याकडे पाहतां बातमीच्या ताजव्यांत ह्या प्रसंगास फारच कमी किंमत येईल. किंवा असेंही

होऊं शकतें कीं व्यक्ति नामांकित व विषयही प्रस्तुत वादाचा असून सुद्धां त्या त्या दोघाच्या साहचर्यामुळेंच एखादे वेळीं आपणांस बातमी देता येत नाही. समजा, बालगंधर्वानें जाहीर भाषणांत स्पष्टपणें सांगितलें कीं सरकारनें रुपयाचा दर सोळा पेन्सांवरून अठरांवर नेला ही हिंदी राष्ट्रहिताला अत्यंत विघातक बाब आहे. तर अशा बातमीला वर्तमानपत्रांत स्थान मिळणार नाहीं. याचीं कारणें स्पष्टच आहेत. ह्या गोष्टींचा पूर्ण विचार केल्यास कोणास किती महत्त्व का द्यावे हें कळून येईल.

परंतु दुसऱ्याही एका दृष्टीनें व्यक्तीचें माप मोजावयाचें असतें. बातमीदाराचें मुख्य कौशल्य हें वजन ठरविण्यांत असतें. कारण कांटा, वजनें व ताजवे ह्या सर्वच वस्तु त्याला काल्पनिक घ्याव्या लागतात. व्यक्तींच्या नुसत्या स्थानिक महत्त्वाकडे न पाहतां आपल्या पत्राच्या धोरणानेंहि तिकडे पहावें लागतें. म्हणजे श्री. केळकरांच्या भाषणाला ' केसरी 'त पुष्कळ जागा देतील; तितकी ' ज्ञान-प्रकाश' खास देणार नाहीं. किंवा रा. सा. जटार यानी आभार मानतांना केलेल्या भाषणाचा विस्तृत साराश ज्ञानप्रकाशांत दिला तरी केसरी त्याचा उल्लेख ओझरताच करील. शिवाय केसरी व बॅ. जयकर यांचा संबध लक्षात घेतां केसरींत जयकराच्या भाषणाला जितकी जागा मिळेल तितकी 'नवाकाळ' मध्यें मिळणार नाहीं. ह्या ठिकाणीं अर्धसाप्ताहिक केसरीची दैनिक ज्ञानप्रकाश किंवा नवाकाळ यांच्याशीं तुलना केली आहे हेंही तुलनात्मक विचारासाठीं ध्यानांत घ्यावयास पाहिजे. वास्तविक हा प्रचाराचा भाग वेगळ्या प्रकरणांतच यावयाचा परंतु ह्या ठिकाणीं ओघाओघानेंच सर्व आलें म्हणून सांगितलें असो.

सभेचें काम संपलें. वक्ते व अध्यक्ष घरोघर निघूनही गेले. तेव्हां आता सावकाशपणें आपल्या इतर कार्यांचा विचार करण्यास हरकत नाहीं. भाषणाचा वर जो प्रकार सांगितला तो काल्पनिक आहे यांत शंका नाहीं. तो केवळ नमुन्यादाखल घेतला. सर्वच सभा व त्यातील वक्ते इतके व्यवस्थित असत नाहींत. म्हणून इतर कोणते प्रकार त्यांत होऊं शकतात व त्याची खबर कशी घ्यावयाची हे पाहिलें म्हणजे आपलें काम होईल.

भाषण चालू असलें म्हणजे कित्येक उपवक्ते कांहीं तरी प्रश्न विचारतात. कोणी अज्ञात श्रोता बसल्या बसल्याच वाग्बाण सोडतो. त्या सर्वांकडे चिकित्सक अशा श्रवणेंद्रियानें लक्ष द्यावें लागतें. म्हणजे तें ऐकून त्याची किंमत ठरवून

योग्य ठिकाणीं त्याचा संग्रह केला पाहिजे. कित्येक कुत्सित बुद्धीनें विचारलेल्या प्रश्नांना कानांमागें टाकावें. कांहींचे चौकस बुद्धीचे प्रश्न असतात त्यांत व्यवहारज्ञानाचा अभाव म्हणून सोडावे लागतात. आणि कांहीं थोडे मुद्देसूद असून शहाणपणाचे असतात. त्यांचा प्रसंगानुसार उपयोग करावा. कांहीं कांही वेळेस लोकाना शिक्षण देण्याचा प्रसंग बातमीदारांना येतो. पुण्याचें उदाहरण घेऊन असें सांगतां येईल कीं पुण्यास कित्येक धंदेवाईक "उधळे" श्रोते आहेत. मात्र ते पैसे उधळत नसून सभा किंवा वक्ते उधळून लावतात. कांहीं तरी तिरस्कार व नापसंतीदर्शक उद्गार काढून इतर श्रोत्यांस तें भाषण ऐकूं न जाईल असें करणें यांतच त्यांच्या सगळया पराक्रमाची इतिश्री असते. कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी हें कृत्य समर्थनीय ठरणार नाहीं. कारण त्याला सुलतानी अरेरावीचा उग्र वास येतो. परंतु अशाच वेळीं बातमीदाराचें काम महत्त्वाचें ठरण्याचा संभव. 'उधळया' लोकांचा संभावितपणे शालजोडींतून समाचार घेणें समाजाच्या व लोकशिक्षणाच्या दृष्टीनें आवश्यक ठरतें. त्यांस आळा घातला नाहीं किंवा कित्येक अदूरदृष्टीचे बातमीदार करतात त्याप्रमाणें त्यांना न निंदता थोडी स्तुती केली, तर ते शेफारून जाऊन, त्यांच्या कृत्यांस जोर चढतो. किंवा असेंही करतां येतें कीं, ज्या वक्त्याचें भाषण श्रोत्यांस ऐकूं जाऊं नये म्हणून कांहीं विघ्नसंतोषी जनांनी कामगिरी बजावली होती तो विफल करण्यासाठींच — तो वक्ता व त्याचा विषय महत्त्वाचा असेल तर — तें सर्व सारांशरूपानें दिलें पाहिजे. आणि ह्या व अशाच प्रसंगीं बातमीदाराची सारासार विचारशक्ति कसोटीस लागते.

ही एक बाब झाली. दुसरी उपवक्त्याची. एखाद्या विवेचनपर विषयावर व्याख्यानें होतात, तेव्हां श्रोत्यापैकीं कोणास शंका कुशंका विचारावयाच्या असल्यास त्यांना परवानगी देतात. "वक्त्यांनीं भाषण संपविल्यानंतर कांहीं जणांनीं शंका विचारल्या; त्यांचें निरसन देखील व्याख्यात्यांनीं समर्पक रीत्या केलें" असा थोडक्यांत निर्देश केला म्हणजे भागतें. शंकी ( म्हणजे शंका विचारणारा ) ज्या योग्यतेचा असेल — आणि वृत्तव्यवसायांतील मोजमापें अगदीं वेगळीं अशीं आपण ठरविलींच आहेत — त्यामानानें त्याच्या शंकेला अवसर मिळावयाचा. तेव्हां सुद्धां मूळ मुद्दयाच्याच गोष्टी शिवाय इतर एक

शब्द लिहावयाचा नाहीं हें बातमीदारानें लक्षांत ठेवलें पाहिजे. नाहीं तर वक्त्याची स्तुति, आपणांस शंका सुचण्याचें कारण, आपला थोडासा ' दीर्घ पूर्वेतिहास ' व त्याच्याच जोडीला विनय इत्यादिकांचें हरिदासी कथन करण्याचा बहुतेक उपवक्त्यांचा शिरस्ता असतो. [ बातमीदारास नंतर आढळून येईल कीं हे उपवक्ते ठिकठिकाणीं ठराविक वर्गांतलेच असतात. ] त्याला आळा घालणें इष्ट आहे. आणि अशा प्रकारें वक्त्यांना अप्रत्यक्ष रीत्या शिक्षण देण्याचें काम बातमीदारांकडे असतें; व तें तो ज्या मानानें नीट बजावील त्या मानानें त्याची कार्यक्षमता वाढेल. मात्र " आपण जनतेचे सेवक आहोंत – व सेवा बजावीतच रहावयाचें आहे " ही भावना बातमीदारानें मनांतून कधींही घालवूं नये.

वक्त्यांच्या विषयांतराचा ओझरता उल्लेख मागें एकदां आलाच आहे. परंतु आतां विस्तृतपणें त्याचा विचार केला पाहिजे. आपल्याकडे वक्तृत्व अद्याप बाल्यावस्थेंत आहे, तशीच साक्षरता देखील पूर्ण वाढली आहे असें नव्हे. दोन्हीही समवयस्कच आहेत. तेव्हां श्रोत्यांच्या मनावर एकादा नवीन विषय बिंबवावयाचा म्हणजे वक्त्याला इतर अवांतर गोष्टी सांगूनच त्यांची समजूत पाडावी लागते. सुशिक्षित समाजांत १०–१५ मिनिटें मुद्देसूद बोलून जें काम साध्य होतें तेंच अडाणी जनतेंत करण्यासाठीं तासा दीड तासाचीं दोन किंवा चार तरी व्याख्यानें झोडावीं लागतात. विषय तोच असतां अडाणी गांव-कऱ्यांत तो प्रतिपादन करण्याकरितां बऱ्याच गोष्टींचा समावेश त्या व्याख्यानांत करावा लागतो. पण वर्तमानपत्रांत त्या सर्वांचा उल्लेख एक तर कंटाळवाणा होईल आणि दुसरें तें शक्य नसतें. वाचक हे केव्हांही अडाणी श्रोत्यांपेक्षां वरच्या दर्जाचे साधारणतः असतात आणि म्हणून वर्तमानपत्रांत साररूपानें पुनरुक्ति टाळून भाषणाचा रिपोर्ट देतात. त्यासाठीं कित्येक वेळां आवश्यक वाटणाऱ्या गोष्टी वक्ता बोलतो, त्यांचा निर्देश बातमीदारानें करावयाचा नसतो. अशा प्रकारें अनेक वेळां सूक्ष्म विचारांती काय घ्यावयाचें व काय नाहीं हें ठरविण्याचें काम बातमीदारास करावें लागतें.

भाषणाचे आणखीही एक दोन प्रकार संभवतात. शास्त्रीय विषयांवर भाषणें होतात, तेव्हां बातमीदाराची हुषारी पारखून निघते. नेहमींचे ' राजकीय ' अथवा सामाजिक विषय सोडले तर भाषाशास्त्र, व्युत्पत्तिशास्त्र किंवा ध्वनि-

शास्त्र, परलोकविद्या इत्यादि निवडक तज्ञांसच आकलन करतां येणाऱ्या कांहीं व्याख्यानांचा निर्देश, शहरच्या घडामोडीचें वर्णन करतांना बातमीदारास करावा लागतो. आधीं हा विषय मोठा किचकट. त्यांत कधीं ऐकावयास न मिळाल्यानें किंवा सामान्य वाचकांस त्यांत गोडी नसल्यानें त्याचा सर्वांना समजेल असा साराश देणें बातमीदारास कठिण जातें. पण म्हणून अडून राह-ण्याचें कारण नाहीं. बातमीदाराम सांगितलेलें काम येन केन प्रकारेण पार पाडलेलें असलें म्हणजे त्या बातमीदाराची किंमत संपादकीय दरबारीं चढत जाते. " होत नाहीं " " कठीण आहे " " अशक्य दिसतें " अशा सबबी घेऊन रिक्तहस्तानें संपादकाकडे परत जाणारा बातमीदार केव्हांही उच्चासनाप्रत पोहोंचूं शकत नाहीं. असें समजूं कीं प्रो. हार्विन्झ या बहुभाषी अमेरिकन विद्वानाचें 'भांडारकर प्राच्य विद्यासंशोधन मंदिरा'त 'भाषाशास्त्रातील साम्यस्थलें' या विषयावर व्याख्यान आहे. तर त्याचा रिपोर्ट कसा द्यावयाचा हें कोडें बातमीदारास पडणार. तेथें फार तर ३०-४० मंडळी हजर असणार. पण ती सगळी शेलकी विद्वान् अशी. बातमीदारास प्रवेशाची अडचण कशी ती नसतेच. पण भाषण ऐकून स्वतःलाच कांहीं कळलें नाहीं तर वाचकाना तत्संबंधीं काय सांगावयाचें ! ही अडचण टाळण्यास सोपा उपाय असतो. श्रोत्यापैकीं कोणा विद्वानाला गाठावयाचें. आपली अडचण स्पष्टपणें सागाव-याची. आपलें अज्ञान मुकाट्यानें कबूल करावयाचें आणि 'ह्या विषयाची थोडक्यांत पण सर्व साधारण जनांना कळेल अशा शब्दांत माहिती द्या' अशी विनंति करावयाची. अशा प्रसंगीं आपलें अज्ञान झांकण्याचा वृथा प्रयत्न करूं नये. सर्वच माणसें प्रत्येक शाखेंतील तज्ञ असतात असें नव्हे. त्यामुळें अज्ञान कबूल करणें हाच मुळीं शहाणपणा ठरतो. आणि तज्ञांकडून सोप्या भाषेंत तो विषय समजला कीं आपणांला त्याबद्दल थोडें लिहितां येईल.

आणखीही एका रितीनें ही अडचण टाळतां येते. वक्त्याकडून भाषणासाठीं टाचणें किंवा टिपणें मिळवून काम सारतां येतें. पण त्यासाठीं बातमीदाराला त्याविषयाची थोडी तरी माहिती हवी. पत्रपटूंचें हें एक वैशिष्ट्यच समजतां येईल कीं, त्यांना प्रत्येक शाखेंतलें थोडें तरी ज्ञान असावेंच लागतें. नाहीं तर टिपणें किंवा टाचणें शास्त्रीय विषयांवर असलीं तर त्यांचा अर्थ कसा कळेल !

वृत्तपत्रांत येत नाहीं अशी कोणतीच बाब नसल्यानें, सर्व विषयांची थोडी थोडी माहिती, त्यांतील विवक्षित शब्दप्रयोग, याचें तुटपुंजें कां होईना पण ज्ञान बातमीदारास हवें. राजकारणाविषयींची व्याख्यानें नेहमींचींच असलीं तरी इतर विषयावरील भाषणें कांहीं कमी नसतात.

सार्वजनिक संस्थांचे साल दरसालचे आढावे व कार्यवृत्तांत वाचून मंजूर करण्यासाठीं सभा भरत असतात. त्यांचा रिपोर्ट घेणें ही अगदीं सोपी बाब आहे आणि खरें सांगावयाचें तर बातमीदार तेथें प्रत्यक्ष हजर न राहतांच ही माहिती मिळवूं शकतो. कारण ह्या व अशा प्रसंगीं भाषण असें कोणाचेंच नसतें. छापील अहवालच ते वेळीं वाचण्यात येतो. आणि संस्था सार्वजनिक असल्यानें किंवा खासगी असली तरी बहुजन समाजाचे हितसंबंध त्यांत गोवले असल्यानें त्यांचेविषयीं बातमी देणें हें बातमीदाराचें कर्तव्य होऊन बसतें. बातमीदारास अशाच सभेच्या वेळीं दुसऱ्या एका महत्त्वाच्या भाषणास जावयाचें असल्यास तो "ठराविक" सभेचा वृत्तात खिशांत घालून ठेवतो आणि तेथें न जाताच त्या छापील अहवालावरून तत्संबंधीं बातमी लिहितो. पण नंतर सवडीनुसार त्या ठिकाणीं जाऊन तो वृत्तांत वाचला गेला, कीं नाहीं याची शहानिशा करून मगच ती बातमी संपादकाकडे देतो. नाहीं तर कांहीं कारणानें (गणसंख्या न भरल्यामुळें असेल) त्या सभेचें काम पुढें ढकललें जावें आणि बातमीदारानें त्याचा रिपोर्ट लिहून तो छापण्यासही द्यावा, अशी विसंगति होऊं नये. प्रत्येक बाबींत प्रत्यक्ष माहिती बातमीदारानें मिळविली पाहिजे. त्याचेकडून मिळविली, त्यानें सांगितली किंवा लोक असें बोलत अशा सागोपागीं पुराव्यावर अवलंबून राहून चालत नाहीं. पुरावा कसलाही असो बातमीदारानें स्वतः त्यासंबंधीं आपली खात्री पटवून घेतलेली असली म्हणजे झालें.

याच सदरांत लिमिटेड कंपन्यांच्या वार्षिक सभा पडतात. खरें पाहिलें तर त्या खासगी होत. परंतु त्यांच्या भागीदारांची संख्या ज्या मानानें जास्त त्या मानानें त्यांना सार्वजनिक मालकीचें स्वरूप येतें. किंवा त्याच्या कार्यक्षेत्रामुळें अथवा प्रत्यक्ष कार्यामुळेंही ती बाब सार्वजनिक हिताहिताची होऊं शकते आणि म्हणून बातमीच्या क्षेत्रांत येते. स्वदेशी को-ऑपरेटिव्ह स्टीम नॅव्हिगेशन कंपनीच्या भागीदारांच्या सभांत काय होतें इकडे लोक किती उत्सुकतेनें

पहातात किंवा 'टाटा कंपनी' च्या वार्षिक सभेंत काय होतें, हें जाणण्याची त्यांची इच्छा उत्कट असते याचें कारण उघड आहे. परदेशांतील कंपनीनें हिंदुस्थानांत येऊन मोटारीचा कारखाना काढण्याचा अगर रेल्वेचा फाटा वाढविण्याचें ठरविलें तर त्यानें सर्व परिस्थितींत एकदम बदल होतो आणि अशा दूर दृष्टीच्या अनेक कारणास्तव वस्तुतः खासगी स्वरूपाच्या घडामोडींत सार्वजनिक हितासाठीं बातमीदारास लक्ष घालावें लागतें.

कंपनीच्या सभांत विशेष वादग्रस्त प्रश्न विचारांत निघावयाचा नसेल तर त्यांच्या सभेस हजर न राहतांच सर्व रिपोर्ट मिळूं शकतो. पण व्यवस्थापकांची खांदेपालट व्हावयाची असेल अथवा भागीदाराचे व्यवस्थापक मंडळीविरुद्ध कांहीं आक्षेप असतील, तर मात्र सभेस 'रंग' चढण्याचा संभव असतो. आणि तेथें हजर असणें आवश्यक होऊन बसतें. अशा वेळीं विशेष काळजीनें, दक्षतेनें आणि दूरवर विचार करून बातम्या द्यावयाच्या असतात. कित्येक वेळां कळलेले वृत्तांत किंवा खात्रीलायक पुराव्यावरून सिद्ध झालेल्या हकीकतीचा निर्देशही करावयाचा नसतो. या संबंधीं नेहमीं आपल्यापेक्षां अनुभवी पत्रपटूंचा सल्ला घेणें श्रेयस्कर होतें.

सभांमध्ये बातमीदाराचें काम कोणत्या प्रकारानें व्हावें या संबंधीं आतांपर्यंत केलेल्या चर्चेवरून बरीच कल्पना आली असेल. नित्योपयोगी अशा कांहीं सूचना दिल्यानंतर एकदोन वादग्रस्त प्रश्नाचें विवेचन करणें प्राप्त आहे. कारण सभा चालू असतां, सर्वच भाग लघुलिपींत टिपून घेत रहावें का नुसतें ऐकत राहून मगच ऐकलेलें भाषण लिहून काढावें, असा महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. महत्त्वाचा म्हटलें तें अशासाठीं कीं अद्याप त्याबद्दल निश्चित निर्णय इंग्रजी किंवा अमेरिकन वृत्तपट्टूंनीं देखील दिला नाहीं. उलट ज्याला त्याला वाटेल तशा रितीनें हें काम करावें असेंच पुष्कळांचें मत आहे. म्हणजे प्रत्येकानें आपल्याला सोईची वाटेल ती रीत पत्करावी; मात्र भाषणाचा विपर्यास होता कामा नये. लघुलिपी अवगत असावी हें केव्हांही श्रेयस्कर. तिचा वारंवार उपयोग पाहिजे तर करूं नये. पण लघुलिपीवाचून अडतेंच असें मात्र नाहीं. भाषणांचा रिपोर्ट लिहिणें ही एक कला समजून आपल्या बुद्धीची शक्ति वाढवावयाची असल्यास लघुलिपींत भाषण टिपून घेऊं नये. कारण ती सर्व मेहनत यंत्राप्रमाणें होते;

आणि समजा, कांहीं कारणानें लघुलिपींत लिहिलेला कागद गहाळ झाला तर, भाषण ध्यानांत मुळींच नसतें. भाषण ऐकतांना सर्व लक्ष तें अचुक लिहून घेण्यांतच असतें आणि म्हणून डोक्याला कसलीही शिकवण मिळत नाहीं. परंतु जरूर तेवढें वाक्यच मधून मधून लिहून घ्यावयाचें असें ठरविलें आणि बाकीचें सर्व नीट लक्षपूर्वक ऐकून डोक्यांतच सांठवून ठेवावयाचें अशी संवय केली, तर नवीन प्रकारचें काम मेंदूकडून करून घेत असल्यानें स्मरणशक्ति वाढते. आणि टिपणाचा कागद जवळ नसला तरीही भाषणाचा अविपर्यस्त सारांश लिहितां येतो. कांहीं कांहीं वृत्तव्यवसायी स्वतःचीच नवीन लघु-लेखन-पद्धति काढतात. आणि हा मार्ग पुष्कळ वेळां सोईचा वाटतो. कारण आपणांस नेहमींच मराठी भाषणें ऐकण्याचा प्रसंग येईल असें नाहीं. इंग्रजी, हिंदी या दोन प्रमुख भाषांमध्यें स्वतः बातमीदार प्रवीण पाहिजेच. सभा होणार त्यावेळीं वक्त्याची मातृभाषा अथवा इंग्रजी अशातूनच त्यांचें भाषण होईल. आणि हिंदुस्थानांत अनेक भाषांचा प्रसार असल्यानें बातमीदारास जितक्या अधिक भाषा येतील तितक्या चांगल्या.

ह्या अनेक भाषांमुळें एक तोटा होत असला तरी मराठी बोलणारांना व विशेषतः मोडी लिहितां वाचतां येणारांना एक मोठा फायदा होतो. आणि तो म्हणजे मोडीचा लघुलिपीसारखा उपयोग हा होय. मोडी किती जलद लिहितां येतें आणि मोठमोठे वाटणारे इंग्रजी शब्द किती थोडक्यांत मोडींत ( मराठी बालबोधींत देखील ) लिहितां येतात याची कल्पना फारच थोडक्यांना आहे. मोडींतून भाषण सविस्तर लिहून घेतां येणें अशक्य नाहीं. हिचा अवलंब करून पुष्कळ कार्य सुकर होतें. बरेच वृत्तपट्टू भाषण ऐकतांना कांहींच टिपून घेत नाहींत. त्यांचें सर्व टिपण डोक्यांत होतें आणि भाषण संपल्यानंतर ( गुरें रवंथ करतात त्याप्रमाणें ) डोक्यांतलि सर्व माग आठवून भाषणाचा साराश लिहून काढतात. इंग्रजी भाषणाचा मराठी पत्रसाठीं रिपोर्ट द्यावयाचा असेल किंवा गुजराथी अथवा हिंदी वक्त्याचें भाषण मराठी वाचकांस उपलब्ध करून देण्याचें काम जेव्हां पडतें, तेव्हां त्या त्या भाषा अवगत असल्या तर काम सोपें जातें. मराठी भाषणाचा मराठींतच रिपोर्ट देणें विशेष कठिण असलें तरी सरावानें सर्वच प्रकार सारखे वाटतील.

कांहीं प्रसंगीं बातमीदारास किती दक्ष रहावें लागतें याविषयींची कल्पना येण्यासाठीं एक महत्त्वाची गोष्ट स्वानुभवाची सांगतों. पुण्यांतील मुस्लीम विद्यार्थी संघाच्या वतीनें एका प्रमुख मुसलमान पुढाऱ्याचें व्याख्यान झालें. अर्थात तें मुसलमान भाईसाठींच असलें, तरी शेतकी कॉलेजांत झालें असल्यानें तेथील प्रिन्सिपॉल व इतर सन्मान्य पाहुणेही उपस्थित होते. बातमीदारांनीं जाती-गोतीच्या किंवा धर्माच्या निर्बंधाकडे पहावयाचें नसतें. त्यांना सर्वत्रच प्रवेश असतो. म्हणून मला कांहींच अडचण आली नाहीं. मुख्य वक्त्यांनीं – आणि ते मुंबई सरकारच्या मुख्य दिवाणापैकीं एक होते – सुमारें दीड पावणेदोन तास भाषण केलें. मुसलमानांच्या हिंदुस्थानातील कामगिरीचें वर्णन त्यांनीं ऐतिहासिक दाखले देऊन केलें. ताबूतांचा इतिहास सांगितला. पेशवाईच्या वेळेसही मुसलमान कसे प्रबळ होते हें देखील त्यांनीं सोदाहरण दर्शविलें... आणखीही पुष्कळ प्रकारें विवेचन केलें. त्यांचा सर्व हेतु उघड होता. आणि त्यात पर्यायानें त्यांना सुचवावयाचें होतें; तेंही तें सुचवीत पेशवाईची आठवण देऊन ते म्हणत कीं ' पेशव्यांमुळें आपला कित्येक ठिकाणीं उत्कर्ष नीट झाला नाहीं. ' सर्व भाषणाचा रोख असा कीं, ' सध्यांसुद्धां आपल्या मार्गांत विघ्नें आहेत तीं काढून टाका.' विघ्नें कोणतीं आणि मार्ग कोणता हें स्पष्टपणें ते बोलत नसत. मात्र कोणाही सूज्ञास तें न सांगतांच कळण्यासारखें होतें. भाषण संपवितांना मात्र हत्तीचे खावयाचे दात बाहेर आले. शेतकी कॉलेजच्या प्रिन्सिपॉलकडे – आणि ते ब्राह्मणेतर होते – पाहून वक्ते म्हणाले, "आपण एक होऊं आणि आपणा दोघांचेही समान शत्रू ब्राह्मण, त्यांना विरोध करूं." (Let us unite to fight the common enemy the Brahmins). ह्या भाषणाचा मुंबई ' टाइम्स ' साठीं मला रिपोर्ट द्यावयाचा होता. भाषण कुणाचें, कधीं, कोठें व कशासाठीं झालें हें पहिल्या वाक्यांत सांगून दीड तासांतील भाषणाचा मुख्य भाग म्हणून मी वर निर्दिष्टलेलें वाक्य दिलें. आणि आपल्या विधानास पुष्टिदायक अशीं पुष्कळच विधानें वक्त्यानें इतिहासांतून काढलीं असेंही म्हटलें होतें. पण पुनः एकदां त्या महाशयांची गांठ अशाच एका कॉलेजमधील समारंभाचे वेळीं पडली. ते मजकडे रागावून पाहूं लागले आणि नंतर त्यांनीं चिडून मला निरोप पाठविला. " मी दीड तास बोललों त्याचा

रपाट तुम्हीं दोन चार वाक्यांतच दिला, शिवाय त्याला मथळा नीट दिला नाहीं" वगैरे तक्रारी त्यांनीं मजपुढें मांडल्या. मी त्या सद्गृहस्थांना म्हटलें, "तुमच्या तोंडचें म्हणून जें वाक्य आहे तें तुम्हीं बोलला होता ना? मजकूर कोणता व किती घ्यावा ह्याची सक्ती मजवर किंवा संपादकांवर कोणींच करूं शकणार नाहीं." त्यांना चूप बसावें लागलें हें सांगणें नकोच. अस्तु. न बोललेलीं वाक्यें वक्त्याच्या नांवावर दडपलेलीं नाहींत, किंवा भाषणाचा विपर्यास नाहीं, मग कितीही बडा हुद्देदार असला तरी त्याला डरण्याचें कारण नसतें. आणि आपलें काम अगदीं बिनचूकपणें केलें म्हणजे मग कसली भीति? यावरून बातमीदारानें दक्षता किती बाळगावी लागते हें समजून येईल.

प्रकरण आठवें

# समारंभ – उत्सव

नेहमींच्या सरावाचीं आणि वारंवार करावीं लागणारीं अशीं बातमीदाराचीं जीं थोडीं कामें असतात त्यांतील महत्त्वाच्या बाबीचा विस्तारानें मागलि प्रकरणांत ऊहापोह केला. प्रस्तुत ठिकाणीं इतर समारंभांचा किंवा प्रसंगांचा विचार करावयाचा आहे. हे सर्व प्रकार अपेक्षित बातम्यापैकींच असल्यानें त्यांची वर्दी आपणांस अगोदर लागते. त्यांचा निश्चित कार्यक्रम अगाऊ मिळतो आणि प्रत्यक्ष समारंभाचे वेळीं उपस्थित न होतां देखील अशा घडामोडींची बातमी देतां येते. पण ही नित्यांतली रीत नव्हे. अशा प्रसंगीं हजर रहावें लागतें. आणि राहून काय करावें याची माहिती करून घेणें केव्हांही श्रेयस्करच.

अनावरण – उद्घाटन – कोनशिला – बक्षिस – वार्षिक – इत्यादि अनेक समारंभ ठराविक कार्यक्रमांत असतात. त्यांतच जयंति, पुण्यतिथी, स्मृतिदिन, वगैरेंची भर पडते. परंतु ह्या सर्वांना एका सूत्रांत गोवितां येतें. एक तर त्यांचा कार्यक्रम ठरलेला असतो आणि दुसरें कारण असें कीं त्यावेळच्या विविध कार्यक्रमापैकीं मुख्य भाषणालाच अधिक महत्त्व असतें, म्हणून इतर बाबींचा ओझरता उल्लेख केला तरी चालतो. शिवाय बहुतेक वेळा मुख्य वक्त्यांचीं भाषणें आगाऊ मिळूं शकतात. परंतु अशा समारंभाचें निमित्त पुढें करून पुष्कळच महत्त्वाचें लिखाण व उपयुक्त माहिती वाचकांस सादर करतां येतें आणि त्या दृष्टीनें ह्या समारंभाकडे पाहिलें पाहिजे. समजा कीं प्रो. कर्वे यांच्या कन्याशाळेचें वार्षिक संमेलन १६ एप्रिल रोजीं व्हावयाचें आहे. पुष्कळशीं निमंत्रित मंडळी तेथें जमली असून कार्यक्रमास सुरवातही झाली. बातमीदारास खास जागा ठेविली असून त्यांना छापील कार्यक्रमाची प्रत, मुख्य वक्ते ना. बा. सी. कामत यांच्या भाषणाची नक्कल, इत्यादि साहित्य मिळालें. मुलांचे संवाद, गाणीं, गोफ, नाच इत्यादि मनोरंजक प्रकार चालू असतां बातमीदार लेखनांत गुंतलेलाच असतो. कन्याशाळेच्या सुपरिंटेंडंट श्री. सीताबाई

अण्णेगिरी यांनीं वाचावयाचा वार्षिक अहवाल त्यानें अगोदर मिळविला व त्यांतील मुख्य महत्त्वाचा भाग तो टिपून घेऊं लागला. कन्याशाळा स्थापन झाली कधीं व कां ? तिची वाढ कसकशी होत गेली, मुलींची संख्या एक-सारखी वाढली ती कशी ? रिपोर्टाचे सालीं ५०–७५ मुलींना प्रवेश मिळूं शकला नाहीं. इतकी गर्दी कन्याशाळेंतच कां झाली ? परीक्षांच्या निकालांवरून अभ्यासाचा दर्जा किती उच्च ठरतो, वगैरे अनेक बाबींचा त्या रिपोर्टांत उल्लेख आहे. उपयुक्त आंकडे लिहून घेऊन कन्याशाळेची वाढ कसकशी झाली याचें वर्णन, थोडक्यांत इतिहास देऊन एक दोन छेदकांत करतां येतें. ही माहिती दिल्यानें त्या संस्थेचाही फायदा होतो आणि वाचकांना आनंद होऊन मनास समाधान वाटतें.

यानंतर मनोरंजक संवादांचा निर्देश करावा लागेल. त्यांतील बहुतेकांचा कंठाळी उल्लेख करून एकादाच संवाद अभिनव, प्राप्त परिस्थितीस लागू पड-णारा असा असून, तो खरोखरच चांगला वठला तर त्याचें वर्णन करण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. परंतु संस्कृत शाकुंतलांतील अनुसूया प्रियंवदेचा संवाद, उत्तर-राम चरित्रांतील आत्रेयी वासंतीचें संभाषण, मर्चंट ऑफ व्हेनिस मधील पोर्शियाचा भाग किंवा मराठी नाटकांतील एक दोन प्रवेश हे व असले प्रकार, करणाराना नेहमींच नवे असले तरी वर्तमानपत्रांच्या वाचकांना त्यांत विशेष गोडी कशी वाटणार ? शिवाय हे दृश्य व श्राव्य प्रसंग, लहान मुलींनीं – शाळेंत शिकणाऱ्या विद्यार्थिनींनीं – केलें यांतच सर्व कौतुक असतें. आणि ती कौतुकाची व आपलेपणाची भावना हजर असलेल्या मातापितरांना किंवा पालकाना असली, तरी सर्वच वाचकाना तशीच असेल असें नाहीं. आणि हे असले प्रसंग वर्णन करून प्रचलित वर्तमानपत्रांचें उद्दिष्ट कार्य साधतें असेंही नव्हे. म्हणून करमणुकीच्या, कौतुकाच्या किंवा वैयक्तिक शालेय कर्तबगारीच्या बाबींकडे बातमीदारानें नुसतें लक्ष द्यावयाचें असतें. त्यांचा निर्देश सहसा बातमींत करावयाचा नसतो. कारण शाळेंतील प्रत्येक वर्गांत दरसाल कोणीना कोणी तरी पहिला येणारच आणि ठराविक बक्षिस मिळविणारच. तेव्हां त्यांचा उल्लेख करून काय साधावयाचें याचा विचार केला पाहिजे असो.

या मध्यंतरीच्या करमणुकीची बोळवण थोडक्यांत केल्यानंतर रिपोर्ट वाचन

व मुख्य वक्त्यांचें भाषण हें ऐकून त्यांच्यावरच लिहितांना विशेष भर द्यावयास हवा. आभार प्रदर्शन, शुभेच्छा चिंतन, परस्पर प्रशंसा इत्यादिकांना वर्तमानपत्रांत फारसा थारा नसतो हें लक्षांत ठेऊनच त्यांचेकडे पहावें. बहुशः अशा बाबी औपचारिक असतात. समारंभ म्हटला कीं, त्या व्हाव्या लागतात आणि म्हणूनच त्या घडून येतात. तीच बाब अत्तर – गुलाब व पानसुपारी यांची. ‘ खसचें अत्तर लावून व गुलाबपाणी शिंपडल्यावर लोक आपापल्या घरीं गेले ’ असा सविस्तर वृत्तांत कोणत्याही वर्तमानपत्रांत नसतो. फार काय, कोणतें अत्तर लावलें किंवा ‘ गोटे ’ कोणत्या फुलांचे आहेत इकडे प्रत्यक्ष हजर असणाराचेंही लक्ष असत नाहीं. मग बातमीदारानें अशा अनवश्यक ठिकाणीं सूक्ष्म निरीक्षण करून काय फायदा ? अस्तु.

कोनशिला बसविण्याचा समारंभ, चित्राचें अथवा पुतळ्याचें अनावरण, पुण्यतिथी अथवा जयंती, इत्यादि समारंभांचे वेळीं देखील साधारणपणें असाच कार्यक्रम – मध्यंतरींचा संवादरूपी करमणुकीचा भाग वगळून – असतो. आणि त्याविषयीं माहितीही वर सांगितल्या प्रकारेंच द्यावयाची. ज्या संस्थेसाठीं इमारत बांधली जात असेल तिचा थोडक्यांत इतिहास, आश्रयदात्यांचा आभारपूर्वक उल्लेख आणि इमारतीची आवश्यकता ह्या गोष्टींचा प्रामुख्यानें निर्देश करून इमारत झाल्यानें काय काय साध्य होईल याचें थोडक्यांत मनोराज्य द्यावें. लहान मोठा, विद्वान अडाणी, कसलाही मनुष्य असला तरी त्याला मनोराज्यांत थोडा काळ तरी पोहण्याची हौस फार असते. त्यासाठीं इमारत पुरी झाली असें समजून काय वाटेल किंवा तिचा उपयोग काय होईल, हें सांगून तिची उपयुक्तता पटवून द्यावी लागते. ह्याच प्रसंगानें ती संस्था चालविण्यास कोणी कोणी किती किती परिश्रम घेतले हें सांगतांना त्यांच्या कर्तबगारीचा उल्लेख करतां येतो. परतु खासगी चरित्राच्या गोष्टी अशा वेळीं सांगावयाच्या नसून फक्त संस्थेशीं संबद्ध तेवढयाच बाबी त्या वेळीं नमूद करावयाच्या असतात. त्याच वेळीं समारंभासाठीं आलेल्या मुख्य पाहुण्यांचाही निर्देश करावा लागतो. वाचन मंदिराची कोनशिला बसविण्यासाठीं कुठले तरी सरदार आले असतां ‘ ते मोठे शिकारी आहेत, त्यांनीं आठ वर्षांपूर्वी वाघाची शिकार केली होती ’ किंवा ‘ सरदारांचें घराणें फार प्राचीन आहे ’

असल्या अप्रस्तुत अहेराचे नादीं लागूं नये. वाचनालयासाठीं अथवा ग्रंथनिर्मितीसाठीं किंवा अशाच विद्याप्रसारार्थ त्यांनीं कांहीं केलें असेल, तर त्याचाच तेवढा उल्लेख करावा. नाहीं पेक्षां, इतर पराक्रमाविषयीं मौनव्रत स्वीकारावें. बहुधा असें असतें कीं मुख्य पाहुणे नियोजिले जातात ते त्यांच्या 'अर्थोष्मणा' मुळें. आणि आपला हा सन्मान झाला, त्याचा अल्पसा मोबदला म्हणून हे श्रीमान् लोक कांहीं तरी उदार देणगी त्याच वेळीं देतात; किंवा दिली असते म्हणूनच त्यांना हा सन्मान मिळतो. तेव्हां त्यांच्या दातृत्वाची तारीफ करण्यापलीकडे अवांतर प्रसंगाचें चरित्र गुंफण्याच्या भानगडींत बातमीदारानें अशा प्रसंगीं पडूं नये हें बरें.

तसबिरीच्या किंवा पुतळ्याच्या अनावरण प्रसंगीं कारागिराचा गौरव करण्याची संधि असते. स्तुति ही देवाला सुद्धां प्रिय असून तो देखील तिला भाळतो. मग माणसांची काय कथा ? म्हणून बातमीदारानें स्तुतिपाठक बनावयाचें नसतें हें नीट लक्षांत ठेवावें. कारण स्तुतिवर्षावानें कारागीर अकारण फुगून जावयाचा आणि पुढें त्याचे हातून कौशल्याचीं कामें व्हावयाचीं थांबतील. व्यवहार-नीतीचें एक तत्त्व असें आहे कीं, " मित्राची स्तुति त्याच्या पश्चात् करावी आणि दोष-दिग्दर्शन त्याचे तोंडावर करावें. " याचा हेतु उघड आहे. वर्तमान-पत्रांत एखाद्याची स्तुति थोडीशी जरी आली तरी त्यामुळें नवशिक्या ( निवेद-काला ) रिपोर्टरला त्याचे दूरवरचे परिणाम कळत नाहींत. ज्याची स्तुति – प्रशंसा – असेल तो मात्र हुरळून जातो. तेव्हां हें दान हात आंखडूनच करावें. एक वेळ निर्देश केला नाहीं तरी चालेल. परंतु अवास्तव प्रशंसा होऊं नये. आणि जेव्हां प्रशंसालील कर्तबगारी असेल तेव्हां मात्र उल्लेख अवश्य करावा. ह्या प्रसंगामुळें बातमीदारास दुसरा एक महत्त्वाचा धडा मिळतो. तो मोहाचा प्रतिकार करण्याचा. वर्तमानपत्रांतील प्रसिद्धीची हांव ज्याला त्याला नसली तरी बऱ्याच जणांना असते. आणि ती मिळविण्यासाठीं ते उपलब्ध साधनांचा उपयोग करतात. बातमीदाराला हाताशीं धरलें कीं काम भागतें असे ते ओळखून असतात. नवशिका बातमीदार अशा जाळ्यांत सांपडतो. थोरपणासाठीं आणि आपलें नांव छापून येण्यासाठीं हपापलेले हे गृहस्थ बातमीदारास ' मुख-भिडेन ' वश करण्याचा प्रयत्न करतात. ह्या वशीकरण विद्येतील पहिला वळसा म्हणजे ' थोर ' गृहस्थांबरोबर बातमीदारास हिंडावयास मिळतें. कोठें दूर

जावयाचें असलें किंवा वाटेंत ' बातमीदार ' चालत जातांना दिसला कीं, असले इपापलेले थोर गृहस्थ त्याला आपल्याबरोबर मोटारींत घेतात. आणि अगदीं साधा बातमीदार ह्या गळाला अडकतो. त्या गृहस्थांची ओतप्रोत स्तुति केलेली आढळते. कारण मिंधेपणाचा परिणाम लगेच दृश्य होतो. अशा प्रसंगीं निस्पृह पणाचा उपदेश केल्याविना रहावत नाहीं. ह्यापेक्षांही अधिक जबरदस्त मोहाचे प्रतिकार करण्याचे प्रसंग म्हणजे म्युनिसिपल अथवा कौंसिलच्या निवडणुकी. निवडणुकीचा हंगाम सुरू झाल्यावर धूर्त उमेदवार कोणा तरी बातमीदारास बगलेंत मारण्याचा प्रयत्न करतात. वारंवार बातमीपत्र जाईल त्यांत येनकेन-प्रकारेण त्या उमेदवाराचें नांव यावें अशी त्यांची धडपड असते. आणि अनेक प्रकारें ' भेटी ' ' नजराणे, ' वगैरे देऊन बातमीदारास विकत घेण्याचा आपल्या-परीनें ते कसून प्रयत्न करतात. बातमीदारीचा धंदा हा अशा प्रकारें अनेक मोहांनीं व्याप्त असतो. आणि ह्या मोहाचा प्रतिकार करून बातमीदार पुढें गेला तर त्याचें वजन बसत जातें. त्या मोहाला एकदां बातमीदार बळी पडला तर मात्र त्याची प्रगति होण्याची आशाच नको. वृत्तपटूंना सर्वांत अधिक धोका म्हणजे हाच ! लेखणी ही नेहमीं स्वतंत्र ठेविली पाहिजे. तिला केव्हांही द्रव्यानें तोलूं नये हें लक्षांत ठेवलें तरच बातमीदाराचें वजन व आब कायम राहील. नाहीं पेक्षां, इतर धंदेवाइकांप्रमाणेंच वृत्तव्यवसायी गणला जाईल. पत्रकर्त्यांचा मान, पत्रकाराची कीर्ति, पत्रपटूंचें वर्चस्व व त्यांचा दबदबा हीं सर्व त्याच्या निस्पृहते-वर आणि सचोटीवर अवलंबून असल्यानें त्यांना सावधगिरीनें जपावें लागतें. असो.

ही जशी एक मोहाची बाब तशी दुसरीही एक व्यसनाची आहे. तें म्हणजे टीका करण्याचें. आपणांस कोणीं त्रास दिला किंवा अपेक्षित बहुमान दिला नाहीं, म्हणून " कोणाची तरी खोडकी मोडूं या " अशी भावना बातमीदारानें कदापि बाळगूं नये. आपल्या हातीं सत्ता आहे तिचा दुरुपयोग करण्याकडे प्रवृत्ति होते. ती होऊं न देण्याविषयीं खबरदारी घ्यावी. जी काय खोडकी मोडावयाची असेल ती आपणांपैकीं कोणाची नव्हे हें लक्षांत घ्यावें.

कोनशिला, उद्घाटन, वगैरे समारंभाचे वेळीं कल्पक किंवा चित्रकार अशा कारागिरांचा निर्देश कसा व किती जागेत करावा याचा विचार करीत असतां हें विषयान्तर झालें. पण केव्हां ना केव्हां तरी ह्या गोष्टींचा उल्लेख करावयास

पाहिजेच होता. कारागिराचें गुणवर्णन नीट धोरणानें केल्यानंतर प्रत्यक्ष समारंभाचें वर्णन म्हणजे मुख्य वक्त्याचें भाषण. तें सुद्धां विषयाला धरून असेल तेवढेंच घ्यावयाचें. बाकीचें कानामागें टाकावयाचें. प्रसंगानुसार संस्थेची, तिजशीं संलग्न असलेल्या कार्यकर्त्यांची थोडक्यांत माहिती देणें इत्यादि भाग मागें सांगितलाच. त्यासाठीं सर्व आंकडे, इतिहास, वगैरे नेहमीं तयार असणें सोईचें असतें. आयत्या वेळीं धांवपळ करून पाहिजे तेवढीच माहिती हातीं लागेल असें नव्हे. किंवा नेमक्या ठिकाणींच सर्व खुलासा कळेल असेंही शक्य नसतें. म्हणून समारंभाची सूचना मिळते तेव्हांपासूनच सर्व माहिती जमविलेली असावी.

पुण्यतिथी, जयंती वगैरेचे वेळीं आजपर्यंतच्या दिवसांची माहिती थोडक्यांत देणें उपयुक्त होईल. रानड्यांची पुण्यतिथी पाळतात तेव्हां ही कितवी पुण्यतिथी असा प्रश्न उद्भवतो. त्यांच्या मृत्यूपासून वर्षें मोजून त्यावरून आंकडा ठरविणें सोपें असलें तरी दरवर्षी ती साजरी होतेच अशांतला प्रकार नेहमीं नसतो. कदाचित "दिन" साजरा करण्याची पद्धत अगदीं अलीकडे निघाली असल्यानें त्या दिनाचा क्रमांक व मृत होऊन झालेलीं वर्षें याचा ताळमेळ कांहीं नसतो. मल्हारराव–बाजीराव स्मृति–दिनांची चळवळ ही तर गेल्या १०–१५ वर्षांतली. तेव्हां 'दहावा' वर्षदिन साजरा करतात याचा अर्थ दिन साजरा करण्याची पद्धत पडून १० वर्षें झालीं हाच होय; बाजीराव दिवंगत होऊन दहा वर्षें झालीं असा नव्हे. पण हें सर्व त्रयस्थाच्याही लक्षांत यावें, त्यानें अशा बुचकळ्यांत पडूं नये, म्हणून ह्या उपक्रमाचा थोडक्यांत इतिहास सांगून आतापर्यंत मुख्याध्यक्षांची याद जोडावी. म्हणजे जेणेंकरून आपण लिहिलेल्या मजकुरानें वाचकांना वाचनीय लिखाण वाचलें असें समाधान वाटेल, अशा प्रकारचा रिपोर्ट लिहिण्याकडे बातमीदारानें प्रवृत्ति ठेवावी.

आपणांस माहिती किती आहे आणि ती योग्य वेळीं वाचकांपुढें आपण कशी मांडतों याचें न सांगतां प्रदर्शन करण्यास बातमीदारास पुष्कळ अवसर असतो. 'आळंदी' ची पुष्कळ माहिती बातमीदाराच्या दप्तरीं पडून आहे. पण ती जवळ आहे म्हणूनच द्यावयाची असें कधींही करूं नये. मात्र मुंबईचे गव्हर्नर आळंदीस गेले अथवा शिंदे सरकार दर्शनासाठीं सपरिवार दोन दिवस तळ

देऊन तेथें राहिले, त्या तर निमित्तानें आळंदीचें माहात्म्य वाचकांना सांगण्यास हरकत नाहीं. असले प्रसंग केव्हां येतात हें अगोदर ठरत असलें, तरी निश्चितपणें दोन चार वर्षांत आपणांस ह्या माहितीचा उपयोग करतां येईलच असें बातमीदारानें मानण्याचें कारण नाहीं. बातमी फारच काळ पडून राहूं लागली असें वाटलें, तर मग कांहीं ना कांहीं तरी कारण उकरून ती वाचकांपुढें मांडावी. एतत्संबंधीं विचार पुढें करूं. परंतु विविध प्रकारची माहिती संग्रहीं कां ठेवावी लागते व तिचा उपयोगही कसा करण्याचा प्रसंग येतो एवढेंच येथें सुचवून ठेवलें.

बक्षिस समारंभाचे वेळीं मुख्य वक्त्याचें भाषण आणि ज्या शाळेंतील विद्यार्थ्यांस बक्षिसें वाटलीं जात असतील तिचा इतिहास याविना अन्य मजकुरास त्यांत फारसा वाव मिळणार नाहीं. धर्मार्थ नाट्यप्रयोग किंवा तसलेच करमणुकीचे कार्यक्रम होतात तेव्हांही अगदीं थोडक्यांत, ज्या संस्थेसाठीं मदत मिळते तिचा उल्लेख करून, आभार प्रदर्शक भाषणें होतील त्यांत मुद्द्याची बाब असली तरच द्यावी. " संस्थेतर्फे.........यांनीं............ मंडळीचे आभार मानून ......... × × × यांस ...... अर्पण केलें आणि .........यांनीं मंडळीतर्फे त्याचा स्वीकार करून संस्थेस सहाय्य करणें आपलें कर्तव्य असल्याचें सांगितलें; आणि म्हणून आभार मानण्याची गरज नाहीं असें ते म्हणाले " अशा प्रकारच्या वाक्यांत त्यासंबंधीं बातमी देतां येईल. पण आपणांस नाटक कंपनीनें फुकट पास दिला अथवा नाटक चालू असता चहाचा पेला पाठविला म्हणून कंपनीची अवास्तव स्तुति अथवा एखाद्या पात्राचें वर्णन करण्याची आवश्यकता नसते. नाट्यप्रयोग नवा असला किंवा त्यांत कांहीं तरी विशेष दिसून आला तर मात्र नाट्यपरीक्षणाचें निमित्त मिळतें. परंतु पत्राचें धोरण असेल त्या मानानेंच ह्या गोष्टी व्हावयास पाहिजे असतात. नाट्य व संगीत इत्यादिकांसंबधानें इतर सुधारलेल्या राष्ट्रांत उच्च दर्जाची टीका भारदस्त पत्रांतून अधिकारी लेखक करतात तशी आपणांकडे कां असूं नये हा प्रश्न उपस्थित करण्याचें हें स्थळ नव्हे. इतकेंच येथें पहावयाचें कीं, नाट्यप्रयोगाविषयीं नियमितपणें लिहिणारीं फार थोडीं नियतकालिकें आपणांकडे असून उच्च म्हणून समजलीं जाणारीं वृत्तपत्रें अथवा

मासिकें केवळ नाट्याच्या वाङ्मयीन भागाकडेच पाहतात. 'नाट्य' हा अद्यापि सार्वत्रिक चर्चेचा व विद्वानांच्या मोकळ्या विचारांचा विषय झाला नाहीं. म्हणून बातमीदारास आपल्या पत्राचें धोरण व निर्बंध नीट ठाऊक असले पाहिजेत.

प्रदर्शनें, शिशु–आरोग्य–सप्ताह इत्यादिकांचाही उल्लेख येथेंच केला पाहिजे. विशेषतः प्रदर्शनाचे वेळीं दुकानदाराची किंवा त्यांत ठेवलेल्या वस्तूंची यादी देतांना मुक्त कंठानें विनाकारण स्तुति न करण्याकडे प्रवृत्ति ठेवावी असा सल्ला वारंवार द्यावासा वाटतो. प्रदर्शन अथवा कसला तरी सप्ताह उघडतांना भाषणें होतील व तीं योग्य प्रकारें रिपोर्ट होतीलही. परंतु मागाहून प्रदर्शन चालू असतां त्याचें वर्णन कसें द्यावें, आठ पंधरा दिवस काय लिहावें, हा प्रश्न पडेल. कोणी प्रेक्षक–विशेष आले असल्यास त्यांच्या मागोमाग जाऊन कोणतीं कोणतीं दुकानें त्यांनीं पाहिलीं, माल कोणता खरेदी केला, उद्गार कसले काढले, अशा प्रकारें बातमी सजवितां येते. मात्र त्या व्यक्तीचें ( म्हणजे तिच्या महत्त्वाचें ) मोजमाप बातमीच्या दृष्टीनें नीट झालेलें असावें. कोणी शिष्ट मंडळी आलीच नाहींत तर, साधारणपणें कोणते जिन्नस त्या ठिकाणीं मिळतात ग्राहकांची सोय कशी झाली, नवीन वस्तूबद्दल प्रेक्षक काय म्हणत होते, वगैरे अनेक तऱ्हा करतां येतात. नुसती मारवाडी यादी देण्याचा प्रकार होतां होईल तो टाळावा. एक तर संपादकाला त्यावरून बातमीदारानें विशेष मेहनत घेतली नाहीं हें स्पष्ट समजतें. आणि दुसरें असें कीं, वाचकांनाही त्यांत वाचण्यासारखें कांहीं नाहीं असें वाटावयास लागतें. जो तो फक्त आपलें किंवा आपल्या ओळखीचेंच नांव आहे कीं नाहीं तेवढें पाहतो. मात्र दक्षता एका बाबीची हमेश बाळगली पाहिजे. एकाद्या दुकानदाराची किंवा त्याच्या मालाची अवास्तव स्तुति केली असल्यास, सूज्ञ वाचकांचा ग्रह एकदम भलताच होतो. दुकानदारानें बातमीदारास कांहीं तरी 'चारलें' असल्याची शंका तात्काळच येते. आणि हें बातमीदाराच्या व दुकानदाराच्याही पतीला वाईट. तेव्हां विशेष खबरदारी राखावी.

आरोग्य सप्ताहांत ठेवलेल्या उपकरणांच्या, चित्रपटांचा किंवा नकाशांचा उपयोग करून वेगवेगळे लेख लिहितां येतील. पण बातमीदाराला त्यावरून बातमीपत्रेंही चांगलीं उपयुक्त करणें अशक्य नाहीं. परंतु अशा बाबींकडे

आमचे संपादक (व म्हणून बातमीदारसुद्धां) द्यावें तितकें लक्ष देत नाहींत. असो.

हिंदी समाजांत एक वैशिष्ट्य आहे. तें इतर कोणत्याही देशांत असणार नाहीं. आणि तें म्हणजे नेहमींच्या आचारांत धार्मिक नांवाखालीं मोडणाऱ्या सार्वजनिक कार्यक्रमाचें होय. इंग्रजी वृत्तपत्रांत "घोडदौडी" व सट्टयाची बातमी याना महत्त्व तेंच किंबहुना त्याहून थोडें अधिक, गीतावाचस्पति भिडे शास्त्री यांचें प्रवचन किंवा डॉ. पटवर्धनांचें कीर्तन यास हिंदी सार्वजनिक दृष्टीनें मिळतें. आतांपर्यंत आपल्याकडील बहुतेक वृत्तपत्रांनीं ह्या गोष्टींकडे दुर्लक्ष केलें असलें तरी प्रसंगोपात्त त्यांनीं पुष्कळच जागा व्यापलेली आढळते. 'इंदूरचा याग' 'केडगांवचे सत्यनारायण' इत्यादि धार्मिक समारंभांस वर्तमानपत्रांत स्थान मधून मधून मिळतें याचें कारण असें आहे कीं, ती बातमी वगळून चालत नाहीं. बातमीदाराचें मुख्य काम हेंच कीं कळविण्यासारख्या जेवढ्या म्हणून बाबी असतील तेवढ्यांचा उपयोग करावयाचा आणि साधारण मनुष्याला नवीन वाटेल अशी माहिती, बातमी, हकीकत द्यावयाची. प्रवचनें किंवा कीर्तनें करून त्यांत नवे विचार, नवी पद्धति किंवा नवमत प्रचार पुढें मांडण्याचा प्रवचन – कीर्तन – कारांचा उद्देश असतो. धार्मिक प्रवचनांचा अशा प्रकारें उपयोग करून घेणें हेंच खरें कौशल्य असल्यानें विचारवंत संपादक अशा वृत्तान्तास अवसर देतात. कित्येक आपलें विशिष्ट धोरण म्हणूनच त्याची बातमी किंचित् कुचेष्टेच्या सुरानें लिहितात. तें कसेंही असलें तरी बातमीदारास ह्या गोष्टींचा समावेश आपल्या रिपोर्टांत करावा लागतो हें खरें.

धार्मिक घडामोडींची बातमी कशी द्यावयास पाहिजे हें थोडक्यांत सांगणें अप्रस्तुत होणार नाहीं. नवमताचा जेवढा भाग असेल तेवढाच आपणांस उपयुक्त असल्यानें आरंभींचें 'सरस्वतिवंदन' किंवा 'स्तवन' असल्या गोष्टींचा समाचार थोडक्यांत घ्यावा लागतो. फक्त वाचकांना नवें वाटेल तेवढेंच नेमकें सांगावयाचें असतें. तीच गोष्ट कीर्तनांची. पूर्वपक्ष, उत्तरपक्ष किंवा शेवटचें 'हेंचि दान दे गा देवा' ह्यांचा, त्यांच्या त्यांच्या महत्त्वानुसार उल्लेख करावयास हवा. पूर्वपक्षांत कोणत्या श्लोकाचे आधारें नवीन मत कीर्तनकारांनीं पुढें मांडलें हें क्रमाक्रमानें मध्यंतरींच्या गोष्टी टाकून थोडक्यांत सांगावें. अशाच प्रसंगांमुळें बातमीदाराच्या विद्वत्तेस वाव मिळण्याचा संभव

असतो. कारण यज्ञांचा इतिहास, प्रवचनांत वादग्रस्त मुद्दे निघाले त्यांची चर्चा किंवा हिंसेविषयीं साधक–बाधक मुद्दे, हे नुसती बातमी देतां देतांच मांडून पुष्कळ माहिती वाचकांपुढें ठेवतां येते. आणि त्यायोगें विचारास चालना मिळत असल्यानें विचारवंतास अशा लिखाणाचें महत्त्व पटतें. पण अशा वेळीं दुसरीही एक सूचना लक्षांत ठेवली पाहिजे आणि ती स्वतःच्या ज्ञानाविषयीं. बातमी-दारानें नेहमीं आपली परिमिति कोणती हें ओळखून त्याच्यापुढें एक पाऊल घालूं नये. कारण त्यानें विनाकारण हंसें होतें. आणि अज्ञानाचें प्रदर्शन केल्यानें होणारी बातमीदाराची व खुद्द वर्तमानपत्राचीही अपकीर्ति ही या धंद्यांत अत्यंत गैर बाब समजतात. राजद्रोहाबद्दल किंवा अब्रू नुकसानीचा खटला झाल्यानें अथवा बातमी देण्यास चुकल्यानें येणाऱ्या प्रवादास, संपादक किंमत देत नाहींत हें खरें. परंतु शहाणपणाचा नसता आव आणण्यासाठीं केलेल्या धडपडीमुळेंच खरें सोंग उघडकीस येतें तेव्हां मात्र संपादकाची, त्याच्या पत्राची व स्वतः बातमीदाराचीही त्यांत नाचक्की होते. उघडपणें अज्ञान कबूल करण्यांत कसलीही मानहानि नाहीं, हें पटल्यानंतर नसता मोठेपणा मिरवावा असें कोणासच वाटणार नाहीं. पण ही समजूतच पटणें कठिण आहे.

बातमी तर द्यावयाची आणि ती देतांना अधिकाधिक माहिती वाचकांस देत रहावयाचें याच दोन बाबींवर पत्रपाटवाचा भर आहे. तिसरीही एक बाब आहे. आणि ती विशिष्ट मत प्रचाराची. परंतु तूर्त त्या विभागांत शिरावयाचें नाहीं. बातमी देण्याचे प्रसंग पाहून आपलें ज्ञान व विद्वत्ता प्रकट करण्यास अवसर कसा असतो हेंच या प्रकरणांत पहावयाचें असल्यानें अशा विशेष समारंभांचें महत्त्वही नीटपणें पटवून देणें आवश्यक होतें. याच प्रसंगासारख्या आणखीही कित्येक प्रसंगांचा येथें निर्देश करावयास पाहिजे खरा. परंतु तें काम बातमीदारांच्या 'खास' वर्गातील 'खाशा' स्वारींना देतात. नवशिक्यास अशा वेळीं सहसा पाठवीत नाहींत. राष्ट्रीय सभा, प्रांतिक परिषदा, साहित्य-संमेलनें, गव्हर्नरांचीं भाषणें किंवा दरबार, कौंसिलें वगैरे प्रसंगांचा समावेश खास बातमीदाराच्या कार्यक्षेत्रांत होत असल्यानें येथें त्यांसंबंधीं कांहीं लिहीत नाहीं.

परंतु लग्न समारंभासारखी नित्यांतली बाब असूनही तिचें बातमींत रूपांतर होऊं शकतें. वास्तविक राजेरजवाड्यांच्या विवाह समारंभाची हकीकत पुष्कळ विस्तारानें

'एक वैभवसंपन्न समारंभ' म्हणून द्यावयास हरकत नाहीं. लग्नाची वरात पाहण्यासाठीं हातातलें सर्व काम टाकून धांवत जाण्याची आबालवृद्ध स्त्रीपुरुषांची धडपड पाहिली म्हणजे असें कळून येईल कीं, विवाहादि समारंभांस वर्तमानपत्रांत स्थान मिळावयास हरकत नसावी. आणि इंग्रजी पत्रांतून तें तसें मिळतेंही. इतकेंच काय, पण × × × चें × × × शीं लग्न होणार असल्याच्या जाहिरातीसुद्धां वाचनीय मजकुरांत 'बातमी' म्हणून महिना महिना अगोदर फडकत असतात. आमच्याकडील देशी पत्रें अशांना विशेष महत्त्व देत नाहींत. फक्त 'अभिनंदनीय पुनर्विवाह' किंवा 'अनुकरणीय पोटविवाह' अशा ठराविक सांच्याच्या मथळ्याखालीं एखाद दुसरी बातमी — विवाह होऊन गेल्यानंतर महिनाभरानेंही — मधून मधून एकाद्याच पत्रांत चमकते. पण ती बातमी म्हणून नव्हे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. एक तर अशा सामाजिक समारंभास महत्त्व नसतें असें बहुतेकांना वाटतें. आणि दुसरें आपल्या वृत्तपत्रांस राजकारणाशिवाय दुसऱ्या कशांतच राम वाटत नाहीं. राजकारणाचा इतका निदिध्यास खरोखर लागता तर अशा सामाजिक घडामोडींकडे एक-वेळ दुर्लक्ष केलेलें क्षम्य ठरलें असतें. परंतु 'राजकारण राजकारण' म्हणून आमचीं परतंत्र वर्तमानपत्रें, कांहीं थोडके अपवाद सोडून, काय 'दळण दळतात' हें पाहिल्यानंतर विवाहमौंजिबंधनादि समारंभांना बातमीच्या रकान्यांत स्थान कां मिळूं नये याचें आश्चर्य वाटतें. असो. आहे ही परिस्थिती अशी असली तरी तिच्यांत बदल करण्यासाठीं प्रयत्न करतां येतील. आणि बातमीदाराचे अंगीं खरोखरच कौशल्य असेल तर अनेक सामाजिक प्रश्नांचा विचार करण्यास वाचकांना भाग पाडणें त्याचे हातीं आहे. उदाहरणार्थ, श्रद्धानंद अनाथ महिलाश्रमांत आलेल्या एका तरुण विधवेचा विवाह झाला ही बातमी देऊन तदनुषंगानें समाजांतील अनिष्ट चाली, विधवांचे हाल, श्रद्धानंद-अनाथ महिलाश्रमाची उपयुक्तता इत्यादि अनेक बाबींचा ओघाओघानें उल्लेख करतां येईल. पोट जातींतील विवाहाचें निमित्त उकरून पोट जातींचा इतिहास, त्यांचेपासून होणारे दुष्परिणाम आणि ते टाळण्यासाठीं उपाययोजना ह्या व अशा अनेक सुधारणा सुचवितां येणें अशक्य नाहीं.

तसेंच, विवाह समारंभांत विनाकारण होणारा मनस्वी खर्च, रुसवे फुगवेपणाचें सोंग, अनियमितपणाचें यथार्थ स्वरूप, ह्यांचा नुसता जातां जातां उल्लेख करून

समाजाला वळण लावण्याचे प्रसंग बातमीदारांवर अनेकदां येतात. कित्येक वेळां नुसत्या सविस्तर वर्णनानेंच लोकांना त्यांतील दोष दिसतात; टीकेची आवश्यकता नसतेच. कधीं कधीं सूचक प्रश्न किंवा असंदिग्ध वाक्यें लिहून हे उपदेशामृताचे वळसे देतां येतात. एखादे वेळीं अगदीं उघड उघड टीकाही करावी लागेल. पण हें सर्व काळवेळ, स्थळ, व्यक्ति इत्यादिकांविषयीं दूरवर विचार करूनच साध्य होतें. पूर्वी आगरकरांनीं प्रथमतः केसरींत आणि नंतर सुधारकांत ' निबंध ' लिहून काम केलें तें आज ह्या अशा नवीन प्रकारानें केलें पाहिजे. त्याची आतां मुळींच आवश्यकता नाहीं असें नव्हे. आज तसे निबंध कोणी लिहिले – फार काय, आगरकरांचेच निबंध वर्तमानपत्रांत पुनर्मुद्रित केले—तर ते कोणी वाचणार नाहींत; पण पत्रकर्त्यांवर नालायखीचा शिक्का बसेल. त्याना कोणी मानणार नाहीं. म्हणून बदललेल्या परिस्थितींत बदललेल्या शस्त्रास्त्रांनिशीं नव्या रीतीनेंच लढलें पाहिजे. नुसतें जुनें म्हणून अभिमान बाळगून चालणार नाहीं.

लग्न समारंभाची बातमी चटकदार कशी देतां येते याचें एक जुनें उदाहरण पहा :—

मुंबई ता. २७ आगष्ट १८८७

गेल्या गुरुवारीं म्हणजे ता. २५ रोजीं सायंकाळीं येथें एक ब्राह्म विवाह झाला. वधूवरें भिन्न वर्णांचीं आहेत. वधू दक्षणी कऱ्हाड्या ब्राह्मणाच्या ज्ञातीची व वर कपोळ वाणी ज्ञातीचे आहेत. त्यांचीं वयें अनुक्रमें सतरा व चोवीस वर्षांचीं आहेत. वधूचा हा द्वितीय संबंध व वराचा हा प्रथम संबंध असें ऐकतों. हा पहाण्यास युरोपिअन, पार्शी, हिंदु वगैरे स्त्रीपुरुषांची अगदीं रेलचेल होऊन गेली होती. सहा वाजतां विवाह विधीस प्रारंभ झाला. विवाहांतील उपाध्यायाचें काम रा. बळवंतराव भाऊ नगरकर यांनीं चालविलें. " उपाध्याय " म्हटल्याबरोबर एखादा उघडा-बोडका, पन्नाशीच्या घरांत आलेला, डोक्यास टक्कल पडून मिशांच्या अंबाड्या वळलेला, पंधरा दिवस हजामत न केल्यामुळें बोट दीडबोट दाढी वाढलेला, × × × स पंचा

गुंडाळून हातांत पळी पंचपात्र, व पंचाग, हीं तीन आयुधें घेऊन, भाजक्या फुटाण्याप्रमाणें लग्नमंडपांत इकडून तिकडे टणाटण उड्या मारणारा, असा मंगलमूर्ति पुरुष तुमच्या वाचकांच्या मनांत उभा राहील! परंतु ह्या ठिकाणीं तुमच्या वाचकाची कल्पना बिलकूल उपयोगी पडणार नाहीं. वरील मंगलकार्यांतील " उपाध्याय " अगदीं निराळ्या प्रकारचे होते. त्यांचें वय ऐन पंचविशीचें, चेहरा बराच गौरवर्ण, तुरळक मिशा आलेल्या, हनुवटीवर केंसांचा मागमूसही नाहीं, मस्तकावर साहेबी तऱ्हेचा केशपाश, तो अमळ एका कानाकडे झुकता असा मध्यें भांग पाडून, दोन्ही बाजूस चापून चोपून बसविलेला, अंगांत इंग्रेजी तऱ्हेचें परीटघडीचें इस्त्री केलेलें कडकडीत शर्ट, त्याच्या एका बाजूच्या कप्यांत लहानसें घड्याळ, अंगावर परीटघडी पांढरें शुभ्र उपरणें व नेसावयास सहा बोटें रुंद रेशीम-कांठी नवें कोरें नागपुरी धोतर पायघोळ सोडिलेलें! अशा प्रकारच्या उपाध्यायाची कल्पना त्यास प्रत्यक्ष पाहिल्या-वाचून कोणाच्याही मनांत यावयाची नाहीं, असें मला प्रथमदर्शनीं वाटल्यावरून त्याचें हें अल्प वर्णन केलें आहे. यांत माझा कुत्सित हेतु मुळींच नाहीं. विधीस आरंभ होतांक्षणींच माझ्या मनांत जो एक विचारतरंग आला तो वर सादर केला आहे.

अशा प्रकारचें लग्न म्हणजे कांहीं तरी एक " फार्स " अशीच माझी आजपर्यंत समजूत होती. परंतु ती हा ब्राह्म विवाह पाहिल्यानें दूर झाली. सर्व समारंभभर सर्व मंडळी चित्त देऊन ऐकत होती. कारण आपल्यासमोर काय चाललें आहे हें त्यांस समजत होतें. आतां पुढें कोणता ब्राह्म विधि होणार हें मंडळीस अगोदर सांगितल्या कारणानें व एकंदर सर्व प्रकार प्राकृतांतच चालत असल्या कारणानें सर्वांची चांगली समजूत पडत असे. कन्यादानाच्या प्रसंगीं मुलीच्या

बापानें मुलास उद्देशून जीं वचनें म्हटलीं ती किती महत्त्वाचीं होतीं ? मूळ संस्कृतात तीं तशींच असतील. परंतु त्यांचा काय उपयोग ? चौघडा व ताशा यांच्या नादांत " स्पेशल ट्रेन " च्या त्वरेनें विवाह विधि उरकून दक्षणा उपटणाऱ्या भटांच्या तोंडून तीं आम्हांला कशीं समजणार ? असो. हा विवाह जसा मराठींत झाला त्याचप्रमाणें सर्व विवाह होतील तर त्यापासून फार हित होईल असें मला वाटतें. या विवाहांत रा. नगरकरांनीं जो एक " प्रेमबंधन " संस्कार केला तो फारच चित्तवेधक होता. हा संस्कार करितांना त्यांनीं वराचा उजवा हात वधूच्या उजव्या हातांत देऊन त्या दोन हाताभोंवतीं फुलांची माळ बांधली आणि वधूवरांस सांगितलें कीं ही सुमनमाला तुमच्या प्रेमबंधनाचें दर्शक होय, व तिजवरील ही ग्रंथि प्रेमग्रंथि होय. वधूवरांचें प्रेम त्यांच्या मनांत ठसवून देण्याचा हा फार उत्तम मार्ग आहे, यांत संशय नाहीं. तसेंच शेवटीं उपाध्यायांनीं वधूवरांस जो उपदेश केला तोही फार सुरस होता. अशा प्रकारचे विवाह गंभीर करून लोकांच्या मनावर ते ठसविणें हें काम कठीण आहे. अस्तु.

—" केसरी " ( ३०–८–१८८७. )

अशा प्रकारें विवाह समारंभाची बातमी देऊन नवमत प्रचार करतां येतो; न कळतच लोकांचें मत बदलतां येतें. शिवाय त्यात नाविन्य वाटतें. चटकदारपणामुळें लोकांना वाचावयास ती बातमी आवडते. आणि बातमीदाराच्या कार्यक्षेत्रांत आणखी एका सामाजिक समारंभाची भर पडल्यासारखें होतें. समारंभांत कांहीं नाविन्य असेल, व्यक्तींना विशेष माहात्म्य असेल किंवा तिसरेंच कांहीं कारण असेल म्हणून ही घडामोड बातमी ' बनते. ' लग्न समारंभ तर असाच प्रसंग आहे कीं, त्यांत अनेकाना भाग घेण्यास उत्साह वाटतो व म्हणूनच बातमीदारानें त्याचा फायदा घेऊन काहीं तरी नवीन वाचनीय व मनोरंजक विषय आपल्या वाचकांपुढें ( संपादकीय संमति घेऊन ) ठेवण्यास मुळींच हरकत नाहीं.

प्रकरण नववें

# कोर्टांतील खटले

बातमीदाराच्या अनेक कार्यांपैकीं आतां एका विशिष्ट मर्यादित कामगिरीची चर्चा करावयाची आहे. हें काम अपेक्षितही असतें आणि अनपेक्षितांपैकींही तें होऊं शकतें. त्याची माहिती मिळविणें म्हटलें तर सोपें आहे, नाहीं तर अवघडही आहे. अगदीं हटकून बातमी मिळण्याचीं कांहीं थोडी बहुत ठिकाणें बातमीदाराच्या रोजच्या पायपिटींत येतात, त्यांपैकींच कोर्ट कचेऱ्या होत. आणि कोर्टांत चालणाऱ्या खटल्यासंबंधींच आतां लिहावयाचें आहे.

बातमीस महत्त्व कां येतें त्याचीं कारणें आरंभीं सांगितलीं आहेत तीं कायमचींच समजावीं. कोठलीही बातमी असो, तिला ती कसोटी लावून पहावी म्हणजे कळेल, कीं बातमी ठरविण्याचें मोजमाप नेहमीं उपयोगी पडतें. कोर्टांतल्या खटल्यांना तें लागू आहेच. म्हणून दिवाणीपेक्षा फौजदारी खटल्यांचीच बातमी अधिक मिळते. कारण दिवाणी दावे हे नेहमींच्याच स्वरूपाचे. त्यांत सर्वच गोष्टी मामुली असतात. मात्र कांहीं विचित्र अथवा असामान्य गोष्टींचा त्यांत उल्लेख असतो अथवा एकाद्या बड्या प्रस्थाचा त्यांत संबंध येतो, तेव्हां दिवाणी खटलेही बातमीच्या प्रकारांतले होतात. खून, चोरी, मारामारी, दरोडे असल्या बाबी साहजिकपणेंच कुतूहलोत्पादक असल्यानें आणि विशेषतः मानवी विकारांना त्यांत चालना मिळते म्हणून त्यांच्या विषयींचा मजकूर बातमीच्या सदरांत जातो.

आपणांस बातमीदाराचें काम करावयाचें त्या ठिकाणच्या सर्व कोर्टांची माहिती करून घेणें हें बातमीदाराचें पहिलें काम आहे. तसेंच तेथील कारकुनांची शक्य तर ओळख असणें अनेक दृष्टींनीं सोईस्कर असतें. निदान गोड बोलून प्रथम परिचितांशीं सुद्धां आपुलकीच्या नात्यानें वागतां येणें ही एक कलाच असून ती साध्य असेल तर मात्र पुष्कळ काम होईल. हें अशासाठीं कीं कोर्टांत अनेक वेळां बातमीदारास जावें लागतें आणि तेव्हांच नेमका एखादा खटला चालू असेल असें नाहीं. खटला अमूकच वेळीं सुनावणीस निघेल अशी

खात्री वकिलांना सुद्धां देतां येत नाहीं. आणि मार्गप्रतीक्षा करीत प्रत्येक कोर्टांत एक एक बातमीदार ठेवावयाचा म्हटलें तर संपादकाला मुंबईतील कोर्टांत हेलपाटे घालण्यासाठीं निवेदकांचा एक तांडाच पोसावा लागेल! परंतु तसें न करतां एक दोन बातमीदारांवरच काम भागवितात, तेव्हां त्यांची कार्य करण्याची पद्धति पाहिली पाहिजे.

कोर्टांत प्रथम खटला दाखल होतो तेव्हां त्याची माहिती पोलिसांकडे अथवा फिर्याद दाखल करणारांकडे मिळते. शिवाय दोन्ही पक्षांचे वकील असतातच. त्यांना तर खटल्याची एकूण एक माहिती असते. त्यांचेकडून बातमीदारास पाहिजे तेवढी हकीकत मिळते. पण ह्यांत सुलभ कार्य व्हावें म्हणून वकिलांशीं मिठें भाषण केलें पाहिजे, त्यांच्याशीं परिचय करून घेतला पाहिजे, वगैरे गोष्टींकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं.

खटला सुनावणीस निघतो तेव्हां बातमीदारास तो ऐकण्यास मज्जाव सहसा नसतो. कारण न्यायालय ही एक सार्वजनिक जागा असून तेथें जाण्याचा हक्क सर्व नागरिकांना आहे. परंतु तेथें बसून विडी ओढणें, गप्पा मारणें अथवा कुजबुजणें अशांपैकीं प्रकार कोणीही करूं लागल्यास त्यांना अर्धचंद्र देऊन बाहेर घालविण्याचा हक्क मात्र न्यायाधिकाऱ्यांस असतो. तेव्हां अगदीं शांतपणें कोर्टाच्या कार्यांत कसल्याही प्रकारचें विघ्न अथवा अडथळा उत्पन्न न करतां तेथें बसून राहतां येणें ही कोर्टांत जाणाऱ्या बातमीदाराची पहिली तयारी असली पाहिजे.

कोर्टांत खटला चालू असतां त्यांतील मजकूर टिपून घेण्यास किंवा भानगडीची माहिती होण्यास अवसर पुष्कळच असतो कारण साक्षीदारास अथवा आरोपीस विचारलेले प्रश्न (इंग्रजी येत नसल्यास) दोन वेळ तरी उच्चारले जातातच. दुभाष्यानें त्याचें भाषांतर करून विचारावयाचे आणि ते कारकुनानें टिपून घ्यावयाचे असा तेथील शिरस्ता असतो. शिवाय जबानी अथवा साक्षीनंतर काय काय घडलें हें कोर्टाच्या कारकुनानें टिपलें असतें तें वाचून दाखवितात. तेव्हां काय घडलें हें समजण्यास फारशी अडचण नसते. वकिलांचीं भाषणें 'एका दमांत' होत असलीं तरी खुद्द वकिलांकडून त्यांतील महत्त्वाचे मुद्दे मिळूं शकतात. इतकेंच नव्हे तर वकील स्वतः आपलें भाषण लिहूनसुद्धां देतात. निकालाची तर प्रतच मिळूं शकते. तेव्हां कोर्टांतील

बातम्या काढण्यास फार अडचण नाहीं असें वाटण्याचा संभव आहे. परंतु त्यांतील कांहीं महत्त्वाच्या सूचना सावधानपणें पाळाव्या लागतात

पहिली गोष्ट वकिलीमधील पारिभाषिक शब्दांचा अर्थ समजून घेणें. मुकद्दमा, हुकुमनामा, डिक्री, वादी, प्रतिवादी, तपासणी, फेरतपासणी, 'कोर्ट', कुळ, अशील, दिवाणी, दरखास्त, कैफियत, जबाब, जबानी, खटला 'वर्ग' करणें, जातमुचलका, पंचनामा, वगैरे वगैरे शब्दांचा खरा अर्थ, त्यांचा उपयोग करण्याची रीत इत्यादि नीटपणें माहीत नसेल, तर अज्ञान उघडें होऊन हंसें व्हावयाचें. शिवाय ही परिभाषाच मुळीं कळली नाहीं तर खटला तरी कसा कळणार? त्याबरोबरच 'कोडां'चें तुटपुंजें तात्पुरतें ज्ञानही अवश्य हवें. 'पीनल कोड' 'क्रिमिनल कोड' व त्यांतील वरचेवर येणारीं कलमें हीं-देखील ठाऊक पाहिजेत. कोर्टाच्या अवारांतील चपराशी व अर्ज लिहिणारे कारकून सुद्धां 'कलमी' भाषा बोलूं लागतात तेव्हां नवशिक्याची तर तिरपीट उडते. साध्या रीतीनें चोरीचा आरोप ठेवला असें न म्हणतां '३७९ खालीं चार्ज ठेवला' असें तो म्हणेल. 'घरफोडीचा खटला' हें म्हणण्याऐवजीं '४४६ खालीं केस' असें तेथील लोक बोलूं लागतील. त्यांना विशेष त्रास न देतां, ते काय म्हणतात हें समजावून घेऊन पुनः तसलीच कोर्टातील भाषा न उपयोजितां सर्व साधारण वाचकांस कळेल अशा भाषेतच लिहिणें ह्यांत बातमीदाराची परीक्षा होते. नेहमीं कोर्टातील व्यवहार इंग्रजी भाषेंत होत असल्यानें इंग्रजी व मराठी दोन्ही भाषांतील 'परिभाषाज्ञान' पाहिजे. आणखीही अपभ्रष्ट भाषा अवगत असणें इष्ट आहे. 'आडली' म्हटल्यानें तुम्हा कोणाला कशाचाच बोध होणार नाहीं. पण कोर्टातील झाडूवाल्यापासून ते थेट वरिष्ठ अधिकारी 'आडली' म्हणूनच हांक मारतील. 'ऑर्डर्ली'चें तें अपभ्रष्ट स्वरूप आहे. 'परमेश्वरी'चीही तीच अवस्था. सर्व अडाण्यांनाही भाषा कळते ती सुशिक्षितांना कळत नाहीं हें पाहून अज्ञ जनांना अत्यंत विस्मय वाटतो. प्रॉमिसरी नोट म्हणण्याऐवजीं 'परमेश्वरी' म्हणतात. अशी किती तरी उदाहरणें आढळतील. पण त्या सर्वांचें नीट मनन करणें आवश्यक आहे. ही तयारी पाहूनच कोणी बिचकण्याचें कारण नाहीं.

खटला फारच महत्त्वाचा असेल तेव्हां तो चालू व्हावा म्हणून वाट पहात बसणें इष्ट होईल. पण तसें नसेल तेव्हां मात्र कांहीं ठराविक वकील, कोर्ट-

कारकून, पोलिस इन्स्पेक्टर इत्यादिकांस विचारून ‘ आज कांहीं नवल विशेष आहे का ’ याची चौकशी सकाळीं नित्य फेरीस निघण्याचे वेळीं करावी. तिची पूर्ति सायंकाळीं अथवा रात्रीं पुनः त्या त्या किंवा त्याच योग्यतेच्या इतर व्यक्तींना भेटून ‘ आज कांहीं झालें काय ? ’ ह्या प्रश्नानें होते. कारण अकस्मात् एखादा खटला मध्येंच येतो किंवा साध्या खटल्यांतील साक्षीमुळें त्याला एकदम बातमीच्या दृष्टीनें महत्त्व येतें. शिवाय दुपारीं कोर्टाच्या आसपास कोठें असल्यास आंत जाऊन एक चक्कर मारून यावें, आणि कारकुनास विचारावें. गोड बोलण्याची कला अवगत असेल तर कोठेंही मज्जाव होणार नाहीं. पण ‘ इडेल हप्पीं ’ तच बोलत राहणाराचे हातून कांहींच काम व्हावयाचें नाहीं. कारण वकील काय, शिरस्तेदार काय किंवा इतर कोणीही इसम असो, वर्तमानपत्राच्या बातमीदारांस घडलेल्या गोष्टींची माहिती देण्यास मुळींच बांधलेला नसतो. कोर्टाचे कागदपत्र तर कोणासच दाखवावयाचे नसतात. पण कोर्टांतील कारकुनानें ऐकलेली गोष्ट सांगण्यास कोणाचीच हरकत नसते. हें काम आपल्यासाठीं ती मंडळी करतात, त्यांचेवर कसलाही हक्क नसतो, हें ध्यानांत घेऊनच वागलें पाहिजे. मात्र असें करण्यांत वकिलांचा थोडासा फायदा होतो असें म्हणतां येतें. कारण कोणताही खटला म्हटला कीं त्यास दोन पक्ष हे असावयाचेच. आणि खटल्याच्या बातमींत ते दोन पक्ष कोणते व त्यांचे वकील कोण कोण हें सांगितल्याविना बातमी पुरी होऊं शकत नाहीं. अशाप्रकारे आपलें नांव वर्तमानपत्रांत झळकतें एवढ्याच मोहानें बळी पडणारे कांहीं वकील बातमीदारासाठीं बरेंच काम करण्यास तयार असतात. बाकीचे कित्येक तर मनाचेच दिलदार असल्यानें बातमीदाराचें कार्य व त्या कार्याचें महत्त्व यांची जाणीव त्यांस पुरेपूर असते. आणि म्हणून त्याचें कार्य सुकर व्हावें, बातमींत कोठलाही उणेपणा राहूं नये या उच्च हेतूस्तवच बातमीदारास सहाय्य करण्यास ते तयार असतात. त्यांचा फायदा घेत राहणें हेंच बातमीदाराच्या सदाचरणाचे व मोजक्या पण मिठ्ठास भाषणाचें बक्षिस !

प्रत्यक्ष खटला सुरू झाला म्हणजे तो ऐकून त्यांतील बातमी लिहून घेणें हें सोपें काम आहे. पण ती छापण्यासाठीं लिहितांना मात्र पुष्कळ काळजी घ्यावी लागतें. कारण एकाच ‘ तारखेंत ’ खटला निकालांत निघेल असें नाहीं. तो जितके दिवस चालेल तितके वेळां त्याच्या मागील तारखांत काय काय झालें

हें थोडक्यांत सांगावें लागतें. नाहीं तर एकदम 'मामलेदारावरील खटला पुढें चालू झाला' अशी प्रस्तावना केल्यानें खटला कोणावर, कशासाठीं, कधीं, कोणापुढें इत्यादि अनेक प्रश्न वाचकांना सुचतील. कोर्टातील मंडळी मात्र त्यांत कसलेही दोष काढणार नाहींत. कारण सर्वच प्रकार त्यांचेपुढें असतो. आपण ऐकलें तेवढे वर्तमानपत्रांत आलें याबद्दलच त्यांना आनंद होत असल्यानें त्यांतील दोष दाखविण्याकडे त्यांची सहसा प्रवृत्ति नसते. परंतु एकाद्या तिऱ्हाइताला तो रिपोर्ट वाचून काय कळलें असें विचारल्यानंतर समाधानकारक उत्तर आलें तरच तो रिपोर्ट नीट लिहिला असें समजावें.

> × × × चे मामलेदार श्री. × × याचेवर लाच घेतल्याच्या आरोपावरून अहमदनगरचे डि. मॅ. पुढें खटला ... रोजीं भरला होता. फिर्यादीतर्फें आतांपर्यंत × × × असे तीन साक्षीदार देण्यात आले होते. त्यांच्या साक्षींत लाच केव्हां दिली, ती कोणीं काय हेतूनें दिली याचा खुलासा झाला. आणखीही एक दोन साक्षीदार फिर्यादी तर्फेचे यावयाचे होते. त्यांच्या साक्षीचें काम आज सुरू झालें.

अशी प्रस्तावना करून मग त्या दिवशींचा साक्षीदार कोण, त्यानें काय सांगितलें, वकिलांच्या कोणत्या प्रश्नाला उत्तर देतांना तो घुटमळला वगैरे वगैरे बातमी देऊन दोन्ही पक्षाचे वकील कोण कोण तें सांगावें. "मामलेदाराचा खटला पुढें चालू झाला" असें म्हणण्यापेक्षां वर सांगितल्याप्रमाणें तीन चार वाक्यांत सर्व माहिती देतां येते. तेवढयानें वाचकांची किती तरी सोय होते आणि व्यवस्थित लिखाण लिहिण्याची सवय लागते.

याच वेळीं एक महत्त्वाची बाब लक्षांत बाळगावयाची असते आणि ती म्हणजे खटल्यांतील बातमीसंबंधीं कसलीही टीका न लिहिण्याची. वरचीच बातमी घेतली तर त्या तीन साक्षीदारांनीं जी साक्ष दिली ती विश्वसनीय कां अविश्वसनीय, संबद्ध कां असंबद्ध, खरी खोटी याविषयीं एक अक्षरही वर्तमानपत्रांत येतां उपयोगी नाहीं. खटला न्यायाधीन (*sub judice*) असतां अशी टीका करणें म्हणजे वृत्तपत्रकारानें संपादकीय खुर्चीच्या जोडीस, न्यायासनही हिरावून

घेतल्यासारखें होतें आणि म्हणून न्यायदेवता क्रुद्ध होऊन पत्रकर्त्यावर न्यायाच्या पवित्र कार्यांत ढवळाढवळ केल्याबद्दल खटला होतो. तेव्हां घडलेली गोष्ट जशीच्या तशीच रिपोर्ट करणें या पलीकडे अशा वेळीं कांहींच टीकात्मक लिहावयाचें नसतें. संपादकीय मजकूर अग्रलेखांत अगर स्फुट सूचनांतच येतो असें नाहीं. साधी बातमी देण्यांतही संपादकीय मल्लीनाथीस अवसर असतो. मात्र तो हक्क इतर ठिकाणीं वापरण्यास मुभा असली तरी न्यायाधीन खटल्याचे बाबतींत त्या हक्काचा मुळींच उपयोग करावयाचा नाहीं हें पक्कें लक्षांत ठेवावें. साक्षीदारावर, वकीलांच्या भाषणावर किंवा खुद्द न्यायाधीशाच्या वृत्तीवर टीका करावी असा अनावर मोह एखादे वेळीं होतो. नाहीं असें नाहीं. पण तो टाळला पाहिजे. ' टाइम्स ' सारख्या मोठमोठया पत्रांनाही या मोहास बळी पडल्यानें न्यायालयापुढें नाक घासावें लागलें आहे.

रिपोर्ट करण्यांतही जर एखादी चूक घडली तर तिचा घोर परिणाम होण्याचा संभव असतो. साक्षीदारानें साक्षींत गोम्याचें नांव घेऊन त्यानें × × × × × असें काम केलें म्हणून सांगितलें असतां बातमीदारानें सोम्याचें नांव ऐकलें असेल किंवा त्याची समजूतच सोम्यासंबंधीं झाली असावी; आणि त्या आधारावर त्यानें आपली बातमी लिहून दिल्यानंतर सोम्यानें ' बेअब्रूची ' फिर्याद केली, तर त्याचा दोष सर्वस्वी बातमीदाराचाच होय. असे घोर परिणाम अगदींच क्षुल्लक कारणावरून घडून येतात म्हणून अचुकपणाकडे किती लक्ष द्यावें लागतें हें समजून घ्यावें.

कित्येक वेळीं असें होतें कीं एखादा खटला ऐकण्यासाठीं कोर्टाच्या आवारांत फारच गर्दी जमते आणि म्हणून थोडया विवक्षित मंडळींस आंत खटला चालू असतो तेथें प्रवेश मिळतो. वेळेवर हजर असल्यास बातमीदारास मज्जाव होण्याचें कारण नाहीं. पण गर्दी फार होती म्हणून मला आंत जातांच आलें नाहीं ही सबब इतरांना शोभली तरी बातमीदाराला ती कमीपणा आणणारी ठरते. गर्दी जास्त याचा अर्थ असा कीं तत्संबंधीं बातमी ऐकण्यासाठीं जनतेंत उत्सुकता विशेष आहे. आणि जनता उत्सुक असतांना तिचें समाधान वृत्त-पत्रांशिवाय कोण करणार ? सर्वांना कोर्टांत जावयास अवसर सांपडला असें मानलें तरी खटल्याचें काम फारच थोडक्यांस ऐकावयास मिळतें. बहुतेकांना

धक्काबुक्की खाऊनच तेथें थाबावें लागून दिसेल तेवढया भागावर आपली तहान भागवावी लागते. ‘ आरोपीची टोपी मला दिसत होती, वकिलांची पाठ माझ्याकडे होती ’ असल्या अल्पसंतुष्टी वृत्तीचे ते असतात. तेव्हां वृत्तपत्रां- तून सर्व बातमी नीट सविस्तर कळणार या खात्रीने कोर्टांतील वातावरणात हिंडण्यासाठीं फक्त ते येतात. यावरून बातमीदारावर किती लोक अवलंबून असतात हें कळतें. ही झाली स्थानिक लोकाची बाब. यातच परगावचे उत्सुक वाचक मिळवावे म्हणजे एका बातमीदाराच्या विशिष्ट कार्याकडे किती लोकांचे डोळे असतात, हें नीट ध्यानात घेतलें तर अचुकतेनें नियोजित कार्य ठराविक वेळीं पार का पाडलें पाहिजे हें समजेल.

न्यायाधीश – आपण न्यायदेवता असें म्हणूं – ज्याला राजद्रोही ठरविणार तो पुरुष ‘ लोकमान्य ’ म्हणून जनता डोक्यावर घेऊन नाचण्यास तयार असते. असा परस्परविरोध असल्यानें राजद्रोहासारखे खटले विशेष कौशल्यानें ऐकावे लागतात आणि त्याहून अधिक कौशल्यानें ते लिहावयाचे असतात. लाहोर- कटासारखे ‘ क्रांतिकारकां ’ चे खटले रिपोर्ट करणें हें तर अगदींच वेगळ्या कौशल्यानें पण अत्यंत सावधगिरीनें करावयाचें काम असल्यानें बहुतेक सार्थी वर्तमानपत्रें तिकडे दुर्लक्ष करतात. कारण त्याच्याजवळ तें कौशल्य नसावें अथवा तितकी सावधगिरीही त्यांना साधत नसावी. पण वाचकवर्गाचें लक्ष वेधणारा व त्यांच्यात खळबळ उडविणारा असा महत्त्वाचा मजकूर त्या पत्रांत येत नसल्यानें होणाऱ्या परिणामाकडे चालकाचें लक्ष नाहीं असेंच म्हणावें लागतें. पण असे क्रांतिकारकांचे खटले ऐकावयास जाताना बातमीदारास खबरदारी व दक्षता बाळगावी लागते. लाहोरच्या खटल्याचें काम ज्यांना करावें लागलें त्या बातमीदारांचा किती वेळ झाडा घेतला किंवा त्यांचेवर किती सक्तपणें नजर ठेवण्यांत आली हें ठाऊक असणारांस अशा वेळीं सावधानता आवश्यक कां आहे तें कळेल. परंतु अशा अडचणी किंवा त्रास- दायक भानगडी असतात म्हणून बातमीदारानें वैतागण्याचें मुळींच कारण नाहीं. अडचणी जितक्या जास्त, जितके व्यत्यय अधिक, तितका वाढता उत्साह आणि तितकीच चढती कार्यक्षमता आपल्या आगीं असली पाहिजे असा आत्मविश्वास ‘ जातीच्या ’ बातमीदारास येतो. आपलें उद्दिष्ट कार्य सोडून मात्र दुसऱ्या

कसल्याही लोकहितपर कामांत पडावयाचें नाहीं, ही सूचना पुनः येथें द्यावीशी वाटते. सहजासहजीं करतां येणारें साधें काम करण्यास ही बंदी आड येईल असें मानूं नये. फक्त विशेष महत्त्वाच्या, दूरवर पोहोंचणाऱ्या दृष्टीस दिसणाऱ्या कार्यांसच हा निर्बंध लागू आहे.

कोर्टांतील खबरबात कळवितांना सारासार विचार कितपत बाळगावा ह्याबद्दल पाश्चिमात्य वृत्तव्यवसायी लोकांतही अद्याप एक मत नाहीं. मतभेदाचा प्रश्न फक्त घटस्फोटाचे किंवा पतीपत्नीच्या भाडणाचे अथवा तसल्या प्रकारचे खटले कोर्टांत उपस्थित होतात तेव्हाच उद्भवतो. आपणांकडे घटस्फोटाचे खटले अद्यापि विशेष येत नसले तरी नवरा बायकोचीं भांडणें किंवा 'पोटगीसाठीं' दावे बरेच येतात. परंतु वाचकाचें निव्वळ मनरंजन हाच हेतु वृत्तपत्रकाराचा नसल्यानें मनरंजनाबरोबर लोकशिक्षण साधण्यास जेवढा मजकूर उपयुक्त आहे, तेवढाच घ्यावयाचा असतो. शुद्ध व्यापारी दृष्टीनें 'विकतें तेंच लिहावयाचें' हा बाणा ठेवल्यास वृत्तपत्रसंस्थेची ती खरोखरच विडंबना म्हणावी लागेल. एखादे वेळीं असेंही होतें कीं अत्यंत हिडिस प्रकारची बातमी कोठल्या तरी खटल्यात बाहेर येण्याचा संभव असतो. तेव्हा देखील न्यायाधीशास विनति करून तेवढा भाग गुप्त रीतीनें पडद्याआड ( *in camera* ) सुनावला जावा अशी व्यवस्था करतात. हेतु इतकाच कीं, काहीं गोष्टी बाहेर पडण्यासारख्या नसतात त्या लोकाना जाहीर रीत्या कळूं नयेत. बातमीदारानेंही सारासार विचार या वेळींच वापरावयाचा असतो. त्याला स्वतःला थोडी चौकशी केल्यास पडद्याआड चौकशींत काय बाहेर आलें हें कळल्याशिवाय रहाणार नाहीं. परंतु कळलें तरी त्याची वाच्यता जाहीर रीतीनें तर राहोच पण खासगी रीतीनें सुद्धा कोठें करावयाची नसते हें बातमीदाराचें ब्रीद असावयास पाहिजे. नाजूक खटल्याचे बाबतींत सदभिरुचीस धक्का लागूं नये म्हणून बातमीदार आपल्या तोंडाला व लेखणीला कुलुप घालून घेतो; तर कित्येक वेळीं सरकारचें गुपित बाहेर फुटूं नये म्हणूनही त्याजवर आळीमिळीचा प्रसंग येतो. सरकारी कारभारांतील काहीं गोष्टी अशा असतात कीं आधीं त्या आपणांस कळल्या असें दर्शविणें हाच मुळीं गुन्हा ठरतो. आणि त्यामुळें वर्तमानपत्रकार गोत्यांत येऊं शकतो. ब्रिटिश हिंदुस्थानांतच हा प्रसंग वृत्तपटूंवर येतो असें नव्हे तर

अमेरिका, इंग्लंडसारख्या स्वातंत्र्यप्रिय देशांतही अशा प्रकारं गौप्य-गोपनाचा प्रतिबंध करणारा कायदा सक्त रीतीनें अमलात आणतात. राज्ययंत्र सुरळीत चालण्यास अशी कांहीं व्यवस्था लागतेच. त्यानें मुद्रणस्वातंत्र्यावर घाला येत नसला तरी पत्रपंडिताच्या बातमी काढण्याच्या कौशल्याला किंचित् अडथळा येतो खरा. पण तेवढ्याने बातमीदारानें प्रयत्न करूं नये असें नाहीं. प्रयत्न करावा, बातमी फोडावी, फक्त ती जाहीर करूं नये किंवा करावयाची झाल्यास अत्यंत कौशल्यपूर्वक करून कायद्याच्या कचाट्यींत सापडूं नये.

कसल्याही खटल्याची बातमी देताना प्रामुख्यानें ध्यानांत ठेवावयाची गोष्ट म्हणजे आरोप न्यायकोर्टांत शाबीत झाल्याखेरीज गुन्हेगार आरोपीस ‘ चोर ’ ‘दरोडेखोर’ ‘ खुनी ’ अशीं विशेषणें निश्चयात्मक देतां येत नाहींत. इंग्रजी भाषेंत अशा विशेषणाना प्रत्येक वेळीं *alleged* हा शब्द पूरणार्थ योजतात. म्हणजे खुनाचा आरोप असलेला, घर फोडल्याचा आरोप असलेला, चोरी केल्याचा आरोप आलेला इत्यादि. परंतु मराठींत लिहिताना किंवा बोलतांना इतकें काटेकोर दृष्टीनें कोणी बोलत नाहींत आणि म्हणून लेखनही वस्तुस्थितीचें यथार्थ वर्णन करण्यास अयोग्य असेंच होतें. घरफोडीचा आरोप असणारा, खुनाचा वहीम असणारा किंवा चोर म्हणून पकडलेला असे सर्वच अनुक्रमें, घरफोड्या, खुनी व चोर म्हणून निर्देशिले जातात. वास्तविक पाहता न्यायासनानें निश्चयात्मक निर्णय दिल्याविना अशी शब्दयोजना करणें हें त्या व्यक्तीच्या बाबतींत अन्याय करण्यासारखें तर खरेंच; परंतु एका दृष्टीनें तें कृत्य गैरकायदाही ठरतें. कारण कोर्टानें तो इसम गुन्हेगार आहे कीं नाहीं हें ठरवावयाचें. तत्पूर्वी तो गुन्हेगार होईल कसा ? आणि त्याला गुन्हेगार म्हणूनच जर संबोधावयाचें, तर न्यायाधीशापुढें चौकशी चालते ती कशासाठीं ? असा सर्व बाजूंनीं विचार करून खटल्याची हकीकत लिहिताना वाचकाच्या मनावर कसल्याही प्रकारचा ग्रह लादला जाणार नाहीं याबद्दल खबरदारी घ्यावी लागते. नाहीं तर खटला चालू असता तत्संबंधीं टीकात्मक लिखाण लिहून न्यायदानाच्या पवित्र कार्यांत ‘ अव्यापारेषु व्यापार ’ केल्याबद्दल कोर्ट खटला भरतें ! खटल्याची बातमी देत असतांना तींत कसल्याही प्रकारची रतिमात्र टीका नसावी, म्हणून खबरदारी घ्यावयास पाहिजे, ती अशासाठीं.

खटल्याचा निकाल झाल्यानंतर टीका करण्याचा अधिकार गाजविण्यास मोकळीक मिळत असली तरी तो जपूनच वापरला पाहिजे. न्यायदान पद्धतीवर टीका करण्याचे प्रसंग येतात ते काळागोरा यांच्यामधील खटला निकालांत निघतो किंवा राजद्रोहाच्या अथवा असल्याच राजकीय गुन्ह्याबद्दल खटल्याचा निकाल होतो तेव्हां. बातमीदारानें होता होईल तो अशा निर्णयावर टीका करण्याचें काम संपादकावर सोंपवावें. टीका तर केलीच पाहिजे. पण तिचे परिणाम सर्वस्वी संपादकांसच भोगावे लागत असल्यानें बातमीदारानें तें काम करूं नये. फार तर संपादकाकडे आपलें वेगळें लिखाण मंजुरीसाठीं पाठवून द्यावें. न्यायपद्धतीवर टीका केल्याचा आरोप सिद्ध झाला – कोर्टाची बेअदबी झाली असें एकदां न्यायाधीशांस वाटलें – कीं मग त्यांच्या मनाला येईल ती शिक्षा आणि त्या शिक्षेविरुद्ध अपील नाहीं इतके अधिकार न्यायाधीशांस असल्यानें, त्या बाबतींत ताठरपणा दाखविण्यापेक्षां निसटून जाण्यांतच अधिक हित आहे. हें कौशल्य किंवा पत्रपटूंचा हा योग अभ्यासानेंच प्राप्त होणारा असल्यानें तत्संबंधीं अधिक विवेचन येथें नको.

कोर्टातल्या बातमींत इतका विविधता असल्यानें तिकडच्या बातम्या देणारा एक खास वर्गच निर्माण होऊं शकतो. किंवा असेही होतें कीं एकाकडेच सर्व पत्रें हें काम सोंपवितात आणि त्याच्या रिपोर्टावरून ज्या पत्राला आवश्यक व महत्त्वाचा वाटेल तो भाग प्रामुख्यानें छापला जातो. प्रथमतः नवीन खटला कधीं येता हें ठाऊक नसलें, तरी एकदा दाखल झालेल्या खटल्याच्या पुनः पुनः तारखा पडत जातात. त्या आपल्या संकेत बुकांत टिपत गेल्यास बातमीदारांस कोर्टांत केव्हां जावें लागेल हें साधारणपणें सागतां येतें. कोर्टांतील बातम्या दुसऱ्याही एका दृष्टीनें किफायतशीर असतात. जागा भरून कशी काढावी ही पंचाईत संपादकांस असते तेव्हां कोर्टांतील खटल्याचा कात्री न लावतां स्वैरविलास करतां येतो. एक खुनाचा खटला म्हटला तर तो सेशन कमिट होईपर्यंत, सेशन कोर्टांतून निकाल लागेपर्यंत आणि निर्णयानंतर हायकोर्टांत अपील निकालात निघेपर्यंत तीच तीच गोष्ट थोडक्यांत सांगावी लागते. आणि मग कोर्टांत त्या खटल्याची कशी प्रगति झाली हें सांगून जागा भरतां येते. बातमीदारास दर कॉलमी वेतन मिळतें तेव्हां ह्या मारुतीच्या शेपटाकडे त्याचें विशेष लक्ष असतें हें सांगावयास नकोच.

प्रकरण दहावें

# लोकल बोर्ड – म्युनिसिपल सभा

सभा–भाषणाचा एक प्रकार आपल्या चर्चेंत आला नाहीं खरें पाहिलें तर त्याला इतका वेळ मुद्दामच दूर ठेवला. म्युनिसिपल किंवा लोकल बोर्डाच्या सभा ठिकठिकाणीं होतात आणि त्यांत तत्रस्थांचे हितसंबंध गोवले असल्यानें मोठया उत्सुकतेनें वाचक त्यांची बातमी वाचतात. विशेषतः स्थानिक पत्रांत त्यांचा विस्तारानें रिपोर्ट द्यावा लागतो. म्युनिसिपालिटीच्या कामांत नागरिकाचें इतकें लक्ष कां असतें किंवा रिपोर्ट इतका सविस्तर तरी कां लागतो, याची कारण मीमांसा करण्याचें कारण दिसत नाहीं. पण हा भाग वेगळा कां घेतला तें मात्र सांगितलें पाहिजे. आतां पर्यंतचे जे प्रकार सांगितले, त्यांत नवशिक्याला फार त्रास न पडतांसुद्धा काम करण्यास वाव असतो. नवशिका बातमीदार तेथें गेला हें लक्षांत ठेऊनच संपादक त्या लिखाणावर संस्कार करतो व तसें करण्यास त्या प्रकारच्या बातमींत सवड पुष्कळ सापडते. तशी गोष्ट या म्युनिसिपल किंवा लोकल बोर्डाच्या सभांची नाहीं. इतर कामांत थोडें रुळल्याखेरीज, स्थानिक राजकारणाची व भानगडींची थोडीबहुत माहिती असल्याविना, या सभांतून चाललेल्या वादाविवादाचें खरें स्वरूप नीट कळणार नाहीं. शिवाय ‘ सभासद ’ कोण कोण, त्यांची निदान तोंड ओळख, आपसांतले धागेदोरे, इत्यादि बऱ्याच गोष्टी आधीं ठाऊक नसल्या तर बातमीदाराला स्वतःलाच लक्षांत येईल कीं आपणात कांहीं तरी व्यंग राहिलें खरें. कारण त्याशिवाय सर्व वादविवाद कळेल कसा ! म्हणून या कामगिरीवर जावयाचें म्हणजे पत्रपांडित्यांतील अगदीं खालच्या पायरीवर असून चालत नाहीं. असो.

अशा सभांची सूचना पुष्कळ दिवस अगाऊ मिळते. त्यांची बातमीही देता येते. सभेपुढें येणाऱ्या विषयाची यादी देऊन त्यांत महत्त्वाचा कोणता, त्यामुळें खळबळ माजणार असल्यास ती कां, जिव्हाळ्याची बाब कोणची वगैरे विषयीं टीकात्मक लेख लिहून ही बातमी देण्याची रीत आहे. पण मुख्य काम सभा असते त्या दिवशींचेंच म्हटलें पाहिजे. “ अजेंडा ” ( सभेपुढील विचारार्थ

असलेल्या बाबींची यादी ) च्या छापील प्रती आधींच वर्तमानपत्रांना मिळतात. त्या जवळ घेऊन सभेला गेलें पाहिजे. या ठिकाणीं एवढें सुचवावेसें वाटतें कीं, अशा सभांची नोटिस सभासदांना देतात तशीच बातमीदारालाही मिळण्याची व्यवस्था करतां येते. बातमीदार स्वतः त्या म्युनिसिपालिटीचा किंवा स्थानिक संस्थेचा सभासद नसतांही सभासदाचे हक्क – नोटीस व अजेंडा मिळविण्या पुरते – मिळवूं शकतो. हें कसें साधतां येतें हें सांगण्याची जरूरी नाहीं. असो. अजेंडा नेहमीं जवळ ठेवून कोणत्या चर्चेवर ‘ रणें ’ माजतील, शाब्दिक ‘ मारामारी ’ केव्हा होणार आहे, सभेला रंग केव्हां चढेल इत्यादि गोष्टी आधींच साधारणपणें ताडतां येतात. किंवा सभासदांशीं सभेच्या आधीं थोडा वेळ चर्चा केली असली तरीही हें कळून येतें. बातमीदारानें बातमी काढण्यासाठीं अशा संस्थाच्या मेंबराना ( मेंब्राना नव्हे ) भेटण्याचा परिपाठ पाडावा. त्यांच्याशीं बोलून, थोडेसे प्रश्न विचारून, पुष्कळ माहिती मिळते. तेही तुमच्याशीं नीट बोलतील, तुम्हाला खूष करण्याचा प्रयत्न करतील, हें सर्व चालेल. परंतु आपण विशेष ‘ वटवट ’ न करता किंवा इतर ठिकाणीं ऐकलेलें त्यांच्यापुढें जाऊन भडाभड न ‘ ओकता, ’ जीभ सारखी आवरूनच त्याना बोलावयास लाविलें पाहिजे. म्हणजे बोलण्याच्या ओघात किती तरी गोष्टी माणूस बोलून जातो, त्या, कोंबडी दाणा पटकन् टिपून घेते त्याप्रमाणें, आपल्या डोक्यांत आपण ठेविल्या पाहिजेत. सभेच्या आधीं एवढ्या गोष्टी समजल्यानंतर वादग्रस्त मुद्द्यावर दोन पक्ष कोणते पडणार तें पहावें. त्याच्या मुख्य सभासदास सभेच्या आधींच भेटावें, त्याची काय अपेक्षा आहे, त्यांची बाजू समर्थनीय कशी, दुसऱ्याची लंगडी का, हें त्यांच्या तोंडूनच वदवून घ्यावें. म्हणजे सभेच्या वेळचीं भाषणें नीट समजतील व रिपोर्ट पाठविण्यास सोईचे होईल. या ठिकाणीं दुसरीही एक सूचना दिली पाहिजे. ती ही कीं प्रत्येक जण आपल्याच पक्षाला समर्थनीय मानतो व दुसरा ( प्रतिपक्ष ) हा सदैव ‘ लंगडा ’ अशीच त्याची समजूत असल्यानें हे वाद रंगतात. तेव्हां दोन्ही पक्षाची आपणास ओळख असली, तरी एकाचीहि तरफदारी आपण करावयाची नाहीं अशा वृत्तीनें फक्त दोघांच्याही म्हणण्यांतलें तथ्य आपण हुडकीत असतों हें लक्षात ठेवून वागावें लागतें.

सभेच्या वेळीं केव्हां, कोण उठून बोलतो, त्याचें म्हणणें काय, अध्यक्षांनीं मध्येंच काय उद्गार काढले, कुठल्या तरी सभासदानें बसूनच कांहीं तरी शेरा ठोकून दिला, त्यामुळें उडलेला हशा, वगैरे बारीक सारीक बाबींकडे लक्ष देणें फार आवश्यक आहे. टिपून घेण्याच्या कागदावर सभा, हजर सभासद, वेळ, तारीख, ठिकाण हें तर प्रथम असतेंच. चर्चेस सुरवात झाल्यानंतर बोलणारांची नांवें लिहून घ्यावीं. अजेंडावरील कोणत्या कलमाचा विचार चालला आहे तोही आंकडा लिहावा. कांहींच वाद न होतां निकालात निघालेलीं कलमें ' टिक् ' करीत जावीं. म्हणजे आपल्या जवळची अजेंडाची प्रत महत्त्वाची होऊन बसते. दर वेळीं नवी प्रत मिळणें शक्य आहे असें धरून चाललों तरी तें इष्ट नव्हे. बातमीदारास अनुभवानें पुढें समजेल कीं कित्येक सभासद सभेची माहिती बातमीदारांपासूनच मिळविण्याचा प्रयत्न करतील. सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं वास्तविक सभासदांनीं दाखवावयास पाहिजे इतकी आस्था तुम्हीं – बातमीदारांनीं – सभासद नसताही बाळगली पाहिजे. निकालांत निघालेल्या प्रश्नांचा कंठाळी उपयोग करावा लागतो. वादविवाद माजला व तो निवळ वैयक्तिक स्वरूपाचा असेल तर त्याचें अक्षरन् अक्षर ठाऊक असल्याविना सविस्तर लिहूं नये. अशा वेळच्या व्यक्तिगत टीका सभासदांच्याही केव्हां केव्हां आंगलट येतात. म्हणजे माफी मागण्याची किंवा शब्द परत घेण्याची पाळी त्याजवर येते. मग त्यात बातमीदार – म्हणजे त्याचें वर्तमानपत्र – विनाकारण गोवलें गेलें तर नवल नाहीं. विशेषतः कोणावरील वैयक्तिक टीका, कायद्याच्या कचाटींत येण्याचा संभव असतो तेव्हां, जशीच्या तशी देण्याचा प्रयत्न करूं नये, ' इन् डायरेक्ट ' पद्धतीनें म्हणजे आपल्याच शब्दांत तिचा सारांश लिहावा. अशानें दोन कार्यें साधतात. भांडाभांडीचे ' अन्पार्लमेंटरी ' असे जे कांहीं प्रकार घडतात, त्यांची विशेष टिमकी वाजत नाहीं व आपणांवरील कायद्याच्या कचाटयात सांपडण्याची जबाबदारी कमी होते. पण म्युनिसिपल सभांत होणारा हाच काहीं मुख्य वाद नव्हे. तरीही टाळण्याचे म्हणून जे विषय आहेत त्यांतला हा मुख्य असल्यानें त्याला प्राधान्य दिलें. अस्तु.

सभेंत घडलें त्याची बातमी बातमीदार स्वतः हजर राहून मिळवतो. परंतु

कित्येक म्युनिसिपल किंवा लोकल बोर्डाच्या भानगडी पुष्कळ असल्यानें सभेबाहेर घडलेल्या प्रसंगांमुळें कांहीं वादविवाद सभेंत होतात. केव्हां नुसती जोराची चकमक उडते. ह्यांचें अंतस्थ सूत्र उमगण्यासाठीं म्युनिसिपालिटीचा अथवा लोकल बोर्डाचा कारकून ओळखीचा असावा. त्याच्याशीं गप्पागोष्टी (थोडक्यांत) करण्याची पद्धत पाडली कीं आपोआप त्याजकडून 'पडद्याआड' घडलेल्या गोष्टींची माहिती मिळत जाईल. तो आपण होऊन ती तुम्हाला सांगेल. विवाद्य विषयासंबंधींचें 'फाइल' सुद्धां एकवेळ तुम्हांस, यद्यपि तें सर्व 'गुप्त' असलें तरी चाळावयास मिळेल. [ अर्थात् आपण तें पाहिलें असें खरें तुम्ही कुठेंही बोलूं नये. ]

इतका वेळ माहिती कशी मिळवावी ह्या विषयीं सांगितलें. आतां बातमीपत्रांत कोणकोणते विषय कसकसे लिहावे तें सांगतों. स्थानिक बातमीपत्रांत विस्तार पुष्कळ असावा हें योग्यच. पण बातमीदारानें सर्व रिपोर्ट लिहिल्यावर सर्वांत शेवटीं त्या दिवशींच्या कामाचें 'विहंगमावलोकन' (पण घारी सारख्या सूक्ष्म नजरेनें) करावें व तें सविस्तर रिपोर्टाच्या आधीं द्यावें. किंवा सविस्तर सारांश मागाहून सवड असेल तसा छापावयाचा असल्यास तें अवलोकन प्रथम गेलेंच पाहिजे. सभेंत काय काम व्हावयाचें होतें, तें झालें कीं नाहीं, कोणत्या प्रश्नांवर रणें माजलीं, वगैरे हकीकत थोडक्यांत पाहिल्यानें दिली म्हणजे मग पुढला विस्तृत रिपोर्ट वाचकांना वाचण्यास अधिक उत्सुकता वाटते.

कुठल्याही प्रश्नाची चर्चा चालू असल्याचें लिहिलें तर त्याचा निकाल कसा लागला हेंही लिहावें लागेल. विषय पुढे ढकलला, का निकालांत निघाला का बरीच बाचाबाची होऊन मतें घेण्यापर्यंत पाळी आली काय, पुढें किती मतांनीं तो मंजूर अथवा नामंजूर झाला तें सर्व सांगावें लागतें. लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे ही कीं, वादविवाद बराच माजतो किंवा मतें घेण्यापर्यंत पाळी येते तेव्हां तो ठराव महत्त्वाचा असें साधारणें समजावें. पण सगळेच महत्त्वाचे प्रश्न बातमींत बसूं शकत नाहींत. नुसतें, "ह्या ठरावावर बरीच चर्चा झाली" असें म्हणावें व पुढें कारण द्यावें. चर्चा देण्यासारखी असेल तर तिचा निष्कर्ष म्हणून सांगावा. प्रत्यक्ष संवाद अशा वेळीं कंटाळवाणे वाटतात.

तेव्हां, ‘ ठराव मांडणारांचें मत... ...असें होतें ’ तर ‘ विरोधकांपैकीं मुख्य श्री. × × × यांचें म्हणणें अगदींच निराळें दिसलें.... ...ह्या रोखानें त्यांची बाजू रंगत असे ’ अशा थोडक्यांत बातम्या देण्याची जरूरी असते. अर्धा तास कोणत्या रोखानें विरोधक ( किंवा कुणीही ) बोलत होता हें दोन तीन वाक्यांत सांगतां आलें तर उत्तमच.

मागील सभेंत शिल्लक राहिलेला प्रश्न ‘ पुढें चालू ’ म्हणून विचारार्थ येतो त्यावेळीं मागल्या चर्चेचा सारांश, तो पुढें कां ढकलला याचीं कारणें, त्यांत गुंतलेले हितसंबंध वगैरेविषयीं थोडक्यात माहिती दिली पाहिजे. “ मागील वेळीं तहकूब राहिलेल्या प्रश्नांवर नंतर चर्चा सुरू झाली ” असा निर्देश करून भागणार नाहीं.

अशा सभांत आणखी एक वादग्रस्त प्रश्न मधून मधून चर्चेस येतो, त्याचें महत्त्व विशेष असतें. सरकारशीं त्याचा हक्कासाठीं किंवा तत्त्वासाठीं झगडा लागला कीं चर्चा फारच जोराची होते आणि खरें म्हटलें तर आपल्या स्थानिक संस्थांच्या सभासदांची लोकशाही वृत्ती कसाला लागते. एखाद्या पुढाऱ्याला मानपत्र द्यावयाचें, पुतळा उभा करावयाचा किंवा असेंच साधें काम असतें पण त्याला सरकार ( कलेक्टर किंवा तशाच अधिकाऱ्यांमार्फत ) विरोध करतें. त्या प्रसंगाचीं भाषणें सविस्तर दिल्यास सरकारच्या पंखाखालीं जाणारे कोण व स्वतंत्र बुद्धीनें आपलें काम चालू ठेवणारे कोण हें आपसूकच पारखलें जाईल. मतें घेतलीं असलीं तर ठरावाविरुद्ध व ठरावास अनुकूल अशा दोन्ही बाजूंच्या सभासदाची यादी द्यावी लागते. ही आपणांस प्रत्यक्ष हजर राहून तयार करतां येते. परंतु चूक होऊं नये म्हणून दप्तरीं दाखल झालेली यादी पहावी व आपलें निरीक्षण कोठें चुकलें तें दुरुस्त करावें. अशा वेळीं नांवांत चूक झाल्यानें फार विचित्र प्रसंग उद्भवतील. तेव्हां यासंबंधीं काळजी बाळगणें आवश्यक आहे.

लोकल बोर्डाच्या सभांसही अशाच प्रकारचे सर्व साधारण ठोकताळे लावतां येतील. फक्त दोन्ही ठिकाणीं विशेष खबरदारी बाळगावयाची असते ती कांहीं अंतस्थ अव्यवस्थेवर कडाक्याची टीका होते तेव्हां. म्युनिसिपालिटींत काय किंवा लोकल बोर्डात काय, असे प्रकार नेहमीं व सर्वत्र आढळतात.

विरोधी पक्ष असल्या अव्यवस्थेचें अतिशयोक्तिपूर्ण चित्र रंगवतो तर समर्थन करणारा पक्ष त्या प्रकारावर येन केन प्रकारानें पाघरुण घालण्याचा प्रयत्न करतो. बातमीदारानें आपल्या पत्राचें धोरण असेल त्याप्रमाणे पाहिजे तो पक्ष घ्यावा व त्याचेंच तेवढें म्हणणें मांडावें असें सांगण्याची आवश्यकताच नाहीं. परंतु अशा बाबतींत नेहमीं लक्षात ठेवण्याचें धोरण हें कीं, होता होईल तो, कडक टीका विनाकारण करूं नये. लोकल बोर्ड व म्युनिसिपालट्या ह्यांच्या·सारख्या संस्थात माणसें अद्याप रुळून निघालीं नाहींत. त्याच्यावर तुटून पडल्यास आपणात विनाकारण फुटी वाढतात आणि त्रयस्थाना आमचेकडे पाहून दंतावळी विचकण्यास अवसर मिळतो. याचा अर्थ अव्यवस्था माजवणाराचे समर्थन करण्याचा मुळींच नाहीं. त्याची खरोखर कानउघडणी व्हावयास हवी. परंतु दोघाचें भांडण रंगवून तिसरा गंमतच पहात बसणार असेल, तर त्या तिसऱ्याच्या युक्तीला बळी पडा कशाला, हा विचार केला पाहिजे. शिवाय आपलेच दांत व आपलेच ओठ. तेव्हा शिक्षा कशी व कोण करणार ही पंचाईत असतेच. साध्या व्यवहारात सुद्धा केंव्हा काय करावें याची निश्चिती कांहींच नसते. मग नुकत्याच सुरू झालेल्या ह्या वर्तमानपत्री जगांतली गोष्ट कशाला विचारावी ? असो.

वास्तविक अशा सभांकडे आपल्या पक्षाभिनिवेशाचा चष्मा चढवूनच बातमीदारानीं पहावें अशी संपादकीय वर्गाची अपेक्षा असते. म्हणजे हा मजकूर वेगळ्याच प्रकरणांत यावयास पाहिजे होता. विशिष्ट मत-प्रसार करण्यासंबंधींच्या सूचनांचा व विवेचनांचा एक वेगळाच भाग असला तरी येथें ह्या सभां-पुरता त्या प्रश्नाचा विचार केल्यानें बिघडलें असें नाहीं. स्थानिक स्वराज्य-संस्थांचा साधा कारभार सुद्धां हिंदी जनतेला सभाळता येत नाहीं, तेव्हां सर्व हिंदुस्थानची राज्यव्यवस्था ते कशी संभाळणार ? अशा कोटिक्रमानें कांहीं इंग्रजी वर्तमानपत्रें नेहमीं टीका लढवीत असतात. लोकल बोर्डात किंवा म्युनिसि-पालिटीच्या व्यवहारांत कोठें थोडीशी चूक अथवा दोष दिसावयाचा अवकाश कीं लगेच डांगोरा पिटून काटयाचा नायटा करून, ठराविक तुणतुणें वाजवावयाचें आणि हिंदी जनता स्वराज्याला मुळींच पात्र नाहीं हें ठराविक अनुमान काढावयाचें, हा त्यांचा शिरस्ताच पडून गेला आहे. अशांच्या ओंजळीनें

पाणी पिऊं नये, निदान अशांच्या युक्तिवादाला उत्तर दिलें पाहिजे, ही वृत्ति बातमीदारानें बाळगली तरच निभाव लागेल. हें संपादकीय काम म्हणून तिकडे कानाडोळा करतां यावयाचा नाहीं. कारण इंग्रजी वृत्तपत्रे बातमीदारां-कडूनच असलीं कुशल कामें करवून घेतात. आपणही त्याच मार्गाचा अवलंब केला पाहिजे.

सर्व साधारण कोणत्या दृष्टीनें आपण इकडे पहावें हें सागण्यासाठीं इतकें लिहिलें. बातमीदाराला स्वतंत्रपणें लिहिण्यास वाव असेल तव्हा त्यानें ही दृष्टी ठेवावी. नाहीं पेक्षां विशिष्ट पक्षाचा चष्मा घालून पाहिलें पाहिजे अशी संपा-कीय सूचना येते तेव्हा इलाजच नसतो. असो.

म्युनिसिपालिटी किंवा लोकल बोर्ड यासंबंधीचे हें प्रकरण निवडणुकीविषयीं थोडें तरी लिहिल्याविना पुरें होणार नाहीं. खरें पाहिलें तर अशा निवडणुकीच्या वेळीं फार सावधगिरी ठेऊन राहणें आवश्यक आहे. पत्रपांडित्याच्या पवित्र कार्यांत मोह पाडून त्याला विटाळणारे प्रसंग ते असलेच. तत्संबंधींची संपाद-कीय जबाबदारी किती असते व ती कशी पार पाडावी हें अर्थातच येथें सांगावयाचें नाहीं. बातमीदारापुरतेंच पहावयाचें असल्यानें एवढें लक्षात ठेवलें पाहिजे कीं संपादकाच्या सूचनेवरूनच आपण लिखाण लिहून पाठवीत असतो. शहरातील अथवा गावांतील × × × शेटला खूष करण्यासाठीं किंवा × × × वकिलाची मर्जी संपादन करण्यासाठीं आपण काहीं लिहीत नाहीं. त्या शेटजींचा किंवा वकिलाचा आग्रह होईल, त्यांच्या घरीं खाजगी बैठक असेल, हात 'ओले' करण्याचा या नाहीं त्या मार्गानें ते प्रयत्न करतील, नाना प्रकार करून बातमीदाराला वश करून घ्यावें अशी त्यांची धडपड चालू असेल, तर पत्रपटूनें आपलें स्वत्व राखून अशा मोहजालातून शीरसलामत बाहेर पडलें पाहिजे. वर्तमानपत्राना कुठल्या ना कुठल्या तरी उमेदवाराची बाजू घ्यावी लागते व संपादकीय धोरणानुसार ते घेतातही. पण बातमीदारानें तो अधिकार आपणा-कडे घेऊं नये, आणि पैसे उकळण्याचें साधन असें मानून त्या अधिकारावर कमाई करूं नये. असो.

निवडणुकींत बातमीदाराचीं मुख्य कामें म्हणजे वेगवेगळ्या उमेदवारांची लायकी लिहिणें, त्यांची मागील सार्वजनिक कामगिरी लोकांपुढें ठेवणें;

उमेदवारांचीं निरनिराळीं पत्रकें निघत असतात, त्यांचा सारांश काढणें व वेगवेगळया सभा होतात त्यांची बातमी देणें, हीं होत. संपादकीय कांटा जिकडे झुकला असेल त्या मानानें त्या लिखाणावर संस्कार होतीलच. पण बातमीदारानें आपली कर्तबगारी संपादकाच्या नजरेंत भरविण्यासाठीं प्रथम पक्षातीत राहून मजकूर लिहिण्याचा प्रघात ठेवावा आणि संपादकांची बातमीदाराबद्दल खात्री पटली कीं मग विशिष्ट पक्षातर्फेचा रंग त्यांत मिसळावा. नाहीं तर हा बातमीदार ‘ खाजगी ’ कमाईसाठीं असें लिहितो हें संपादकीय वर्गास ताबडतोब समजतें आणि बातमीदाराचें वजन कमी होतें. वरील माहिती देतांना विस्तार फार करतां येत नाहीं. स्थानिक पत्रांत वाटेल तितका मजकूर चालेल असें वाटलें तरी त्याला मर्यादा ही असतेच. तेव्हां मर्यादा ठरवून, होतां होईल तो बातमीदारानें पक्षपात केला असें कोणालाही वाटूं न देतां लिखाण लिहावें. सार्वजनिक कामगिरीच एखाद्या उमेदवाराची नसली तर त्याला बिचारा बातमीदार काय करील ?

इतकें झाल्यावर गांवांतील मंडळींच्या इच्छा, त्यांच्या अपेक्षा, म्हणून थोडा मजकूर पाठवितां येतो. प्रत्येक व्यक्तीबद्दल त्या त्या गांवच्या लोकाचें म्हणून कांहीं मत असतेंच. तें कसें आहे, निवडणुकीस त्याचा कितपत उपयोग होईल, लोकांची इच्छा कोणती वगैरे माहिती ठिकठिकाणीं जाऊन, चकाटे पिटण्याचे अड्डे असतात तेथें ऐकून, कांहीं प्रस्थांना भेटून, क्लबमध्यें, व्यापारी लोकांत मिळून मिसळून, अशा सर्व ठिकाणीं चांचणीसाठीं फिरून त्यांच्या विषयीं माहिती मिळवावी लागते. ‘ लोकमताचा वारा ’ कसा वहातो याची वास्तविक कल्पना त्यावरून पराठिकाणच्या लोकांना आली पाहिजे. हें ध्यानांत ठेवून अशा प्रकारचा मजकूर लिहावा. त्याचप्रमाणें मतें कशीं पडतील, मतवाल्यांचा रोख कसा दिसतो, लायक उमेदवारांना मतें मिळणार, कां केवळ आपल्या जातीचा म्हणूनच लोक * * * यांना मतें देणार, कॉंग्रेस पक्षाचा म्हणूनच एखाद्याला अधिक मतें मिळण्याचा संभव आहे काय, किंवा ब्राह्मणेतरांनीं एक स्वतंत्र गट करून ब्राह्मणेतरांनाच सर्व मतें द्यावयाचीं असें ठरविल्यामुळें * * * हा उमेदवार निवडून येणार अशी शक्यता दिसते, अशा पुष्कळ तर्कटास ‘पोटभर’ वाव असतो. पण म्हणून पोट भरून घेण्याकडे

मुळींच प्रवृत्ती ठेवूं नये. साधारणपणें निवडणुकीच्या आधीं दोन एक महिने कोण कोण उमेदवार उभे आहेत त्यांची यादी विभागवार द्यावी. पुनः केव्हां तरी त्यांची सार्वजनिक कामगिरी, त्यांचे विचार, काम करण्याची त्याची पात्रता वगैरेचें विवेचन निःपक्षपातीपणानें लिहावें. लोकमताची चाचणी घेऊन अशा अशा प्रकारचें वारें वहातें, हा अंदाज निवडणुकीचे आधीं सुमारें १०-१५ दिवस करावा आणि दोन एक दिवस अगोदर त्यात कांहीं बदल झाला असल्यास कळवावा. निवडणुकीच्या दिवशीं मतें कसकशीं पडलीं, कोण कोण येण्याचा संभव आहे व तो कां, याचा अंदाज, अंदाज बरोबर करतां येतो असा आत्मविश्वास असेल तरच, करावा. नाहीं पेक्षां स्वस्थ रहावें.

शेवटीं निवडणुकीचा निकाल झाल्यावर मतें किती पडलीं, यशस्वी कोण झालें, किती मतांनीं अंदाजापेक्षां किंवा त्यांच्या स्वतःच्या अपेक्षेपेक्षाही त्यांना कमी मतें का मिळालीं वगैरे माहिती जमवून लिहावी लागते. तसेंच एकंदर मतदार किती होते, त्यापैकीं किती जणांनीं मतें दिलीं, बाकीच्यानीं कां दिलीं नाहींत, मागील निवडणुकीचे वेळीं हें प्रमाण काय होतें, दोन्हींची तुलना केल्यास काय अनुमान निघतें, वगैरे पुष्कळ माहिती बातमीदारांस द्यावयाची असते. याचवेळीं आपले पूर्वीचे अंदाज बरोबर असल्यास त्यांचा निर्देश करावा; नसल्यास चुकीचें कारण सांगावें. त्यांत लाजण्याचें कारण नाहीं.

आणखीही किती तरी मजकूर बातमीदारांजवळ तयार असतो. तो मात्र गमतीचा असूनही द्यावयाचा नाहीं. मतदारांना उमेदवारांनीं काय काय आमिषें दाखविलीं, ताडीचीं पिपें कुठें ठेवलीं होतीं, बुंदीच्या लाडवाचें जेवण कोणीं घातलें, मताला ‘ अडीच रुपये दर ’ कां ठरला, या व अशा प्रकारच्या अनेक हास्योत्पादक व हास्यास्पदही बाबी घडघडीत डोळ्यांसमोर दिसत असतां वर्तमानपत्रांत सहसा येऊन बसत नाहींत. त्याचीं कारणें उघड आहेत. तेव्हां सारासार विचार करण्याची कठिण वेळ ती हीच असते. शिवाय उमेदवारांची ओळख करून देतांना किंवा लोकमताचा वारा कसा वहातो हें कळवितांना कुणाही उमेदवारावर चुकून शिंतोडा न उडेल अशी खबरदारी घ्यावयास पाहिजे. भरपूर स्तुती केल्याबद्दल तुम्हांस कोणीं कोर्टांत खेचणार नाहीं. परंतु चुकून जरी एखादा शब्द अब्रू नुकसानीचा पडला कीं मग नाक घासावें लागेल, यासाठीं प्रत्येक शब्द तोलून पारखून लिहावा.

अध्यक्षांची निवड होते, तेव्हांही अशाच प्रकारची कामगिरी बातमीदारास बजवावी लागते. पण ती कुणाच्याही आहारीं न जातां. अध्यक्षाच्या खुर्चीसाठीं असल्यास कोणा कोणाची चुरस आहे, ती कशी रंगेल किंवा निकाल कसा होईल व कां, या संबंधींचें विवेचन लोकांना खात्रीनें आवडेल. मात्र आवडेल म्हणून वाटेल तसें भरकटून टाकावयाचें असें करूं नये. ज्यांचें म्हणणें म्हणून आपण सांगणार त्याच्यांत थोडें फार हिंडल्याखेरीज स्वतःच्या कोठडींत बसूनच तर्कटें लढविणें अत्यंत गैर आहे.

ह्याच प्रकार थोड्याबहुत फरकानें लोकल बोर्डास लागू पडतो. पण लोकल बोर्डाच्या निवडणुकींत व म्युनिसिपालिटीच्या निवडणुकींत एक मोठा फरक असतो, तो हा कीं म्युनिसिपालिटीचे सर्व सभासद एका गांवांतलेच असतात. त्यामुळें एका ठिकाणीं खळबळ उडते. तशी लोकल बोर्डाची गोष्ट नसते. निरनिराळ्या ठिकाणचे एक दोन एक दोन सभासद मिळून तालुक्याचें किंवा जिल्ह्याचें बोर्ड बनतें. त्यामुळें म्युनिसिपल निवडणुकींत लोकांचें लक्ष असतें, लोकांची उत्सुकता दिसते, तितकी लोकल बोर्डाच्या बाबतींत दिसून येत नाहीं. लोकवस्तीच्या विविध घटकांत ती वाटली गेल्यानें तिचा दाब डोळ्यांत भरत नाहीं. पण बातमीदाराच्या लिखाणांत त्यामुळें होणारा फरक म्हणजे ह्याच कीं म्युनिसिपल ‘ विलक्षण ’ च्या वेळीं, समजा, त्यानें एकंदर ८–१० कॉलम मजकूर भरला तर लोकलबोर्डाच्या ( तालुका व जिल्हा ) दोन्ही निवडणुकीस मिळून फार फार तर ३–४ कॉलम द्यावे लागतील. आतां कोणता मजकूर कमी होतो व तो का हें आपसूकच लक्षांत येण्यासारखें आहे.

बातमीदार ह्या मोहाच्या दिव्यांतून पार पडला, पैशाचा मोह त्यानें जिंकला कीं मग त्याची प्रगति होऊं लागलीच असें नव्हे. त्यानें इतर सुद्धां गुण संपादन केले पाहिजेत. म्हणजे त्याच्या लिहिण्यास किंमत चढत जाते. आणि एकदां कां लेखणी वाटेल तशी विकण्याची चटक लागली म्हणजे मात्र कुचकामी लिखाण पैदा होतें, ही गोष्ट पुनः एकदां प्रकरणाचे शेवटीं सांगावीशी वाटते.

## प्रकरण अकरावें

# बैठा बातमीदार

इतका वेळ बातमी मिळवून ती कशी लिहावी या विषयीं चर्चा झाली. आतां कचेरींत बसूनच. बातमी लिहिणारा म्हणजे भाषांतर करणारा बातमीदार असतो, त्याच्या कामाविषयीं लिहिलें पाहिजे. सर्वच ठिकाणीं हें काम कांहीं शेलक्या मंडळींना वाटून दिलें असेल असें नाहीं. सवड सांपडेल तेव्हां स्थानिक बातमीदाराला, 'उप – सह' अशीं उपपदें मागें आपण होऊनच जोडून घेतलेल्या संपादकांनाही, हें काम करावें लागतें. पण तेवढयानें तें संपादकीय पुस्तकांत जाऊन बसत नाहीं. त्याचा व्याप बातमीदाराच्या क्षेत्रांतला असल्यानें येथें तो विषय घेतला आहे.

बहुधा इंग्रजींतूनच पुष्कळ मजकूर भाषांतरावा लागतो. इंग्रजी वाचकवर्ग अगदीं वेगळा असल्यानें मराठी पत्राच्या वाचकांना त्यांतील कांहीं बातम्या समजणार सुद्धां नाहींत. आणि कित्येकांत तर त्या समजण्यासाठीं सविस्तर टीपांचा भरपूर पुरवठा करावा लागेल. भाषांतरांतही दुर्बोधतेमुळें कांहीं बातम्या वाचल्या म्हणजे अर्थबोध होणार नाहीं; खेडेगांवांतील खडबडीत रस्त्यावरून खटारा चालतांना आंत बसणारास होणाऱ्या अनुभवाची आठवण होईल. म्हणून भाषांतर करण्याची पद्धत, त्या त्या भाषेची मोडणी, वाक्प्रचार, समानार्थी म्हणी, यांचें ज्ञान असणें आवश्यक असतें. अद्याप आपणाकडे वैशिष्ट्य युग अवतरलें नाहीं असें म्हणण्यास प्रत्यवाय नसल्यानें वैशिष्ट्य राखूनही इतर दोन तीन शाखांत प्राविण्य मिळविणें बातमीदाराला परिस्थिती-मुळेंच भाग पडेल. इंग्रजी भाषेची मोडणी अगदीं निराळी; ते खलाशी, खेळाडू व बनिये लोक. त्यांच्या भाषेंतील वाक्प्रचार हे नाविक, क्रीडा व व्यापार या परिभाषांतलेच येणारे उदा०:—

Man at the helm, smooth sailing, burning of boats, holding the field, backing a wrong horse, holding 'the trump card' a blank cheque,......

त्याच्या उलट आमची मराठी भाषा पडली लढवय्यांची. तींत सर्व रूपकें

युद्धशास्त्रांतलींच आढळतात. व्यापारासंबंधीं किंवा क्रिकेट – फुटबॉल विषयक वाक्प्रचार, गनिमी कावा खेळणाऱ्या मराठ्यांना सुचावे कसे? भोजन-प्रसंगीं आग्रह करून लाडू वाढले तरी म्हणे '**भडिमार**' केला; सासूबाई संतापून सूनबाईला बोलूं लागल्या तर आम्हीं म्हणणार 'झाली **सरबत्ती** सुरु'. बरें, सून-बाईवरून त्यांच्या '**माऱ्याचा' नेम** दुसऱ्या कोणावर वळला कीं लगेच **मोर्चे** वळले असेंच आम्हीं म्हणणार. एकूण काय, तर साध्या बोलण्या चालण्यातसुद्धा आमच्या युद्धप्रीतीचें प्रदर्शन नकळत होतें व भाषातराची सर्व अडचण येते ती यामुळेंच. " मॉडर्न रॉबिनहूड " चे नुसतें भाषांतर "आधुनिक रॉबिनहूड" असें केल्यानें कुणाला अर्थबोध होईल? रॉबिन हूडच्या कहाण्या ज्यानें ऐकल्या वाचल्या असतील त्यालाच. पण " रॉबिनहूड " च्या ऐवजीं मराठींत " ठकसेन " म्हटल्यानें योग्य अर्थबोध होतो. " हर्क्युलीस " ही काय चीज आहे हें मराठी वाचकापैकीं फार थोड्याना समजेल. परंतु ' हर्क्युलीस ' असाच शब्द ठेवण्यापेक्षा ' भीम ' असा तुल्यबल शब्द योजण्यास कसली हरकत आहे? परंतु अडचण अशी कीं हर्क्युलीस हा कोण हेंच भाषांतर करणाराला ठाऊक नसतें. असला तर आपल्याकडील पौराणिक व्यक्तींचीही माहिती असल्याविना ' भीम ' हा डोळ्यापुढें येणार नाहीं. अशासाठीं इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषांचें चांगलें ज्ञान हवें.

वाक्यरचनेची अडचण वेगळी आहेच. इंग्रजी वाक्यांतील शब्दाला शब्द जोडत गेल्यानें किती विचित्र मराठी भाषा उद्भवते हें पुष्कळशीं दैनिकें चाळल्यानें सहज समजेल.

उदाहरणार्थ :—

> " एकसारखा पोषाख केलेल्या निळ्या शर्टवाल्याची परिणामकारक स्वरूपाची परेड थर्ल्स येथें झाली. ओ डफी यांनीं डी व्हॅलेरा यांस असें बजावलें कीं, आपल्या पक्षास धोका येतो या कारणावरून आमची कायदेशीर चळवळ नष्ट करण्यासाठीं कायद्याचा उलट सुलट उपयोग करून किंवा दुसऱ्या कांहीं युक्तीनें डी व्हॅलेरा यांनीं प्रयत्न केला तर त्याचें सरकार आपण त्वरेनें व तत्काळ संपुष्टांत आणूं. "—

या वाक्यांतला मूळ अभिप्रेत अर्थ या मराठीवरून तरी लक्षांत येत नाहीं. याचीं कारणें :– भाषान्तर करणारानें ( १ ) वाक्याला वाक्य, शब्दाला शब्द ठेवण्याचा प्रयत्न केला; ( २ ) त्याला स्वतःला त्यांतील अर्थ समजला नाहीं. ( ३ ) त्यानें त्याचा अर्थ समजावून घेण्याचा प्रयत्न केला नाहीं. ( ४ ) मराठींतील वाक्प्रचार त्याला माहित नसावेत असें वाटतें.

पण एवढयानेंच भागलें नाहीं. बातमी वाचून वाचकांना कांहीं अर्थ कळलाच पाहिजे असें त्याला वाटत नसावें. शब्दाला शब्द ठेवावयाचा, हातीं आलेल्या मजकुरावर ' घेतला ' म्हणून सही ठोकावयाची, आणि लिहिलेला मजकूर छापण्यास द्यावयाचा, एवढीच आपल्या कामगिरीची कल्पना त्यानें आपल्या मनाशीं ठरविलेली दिसते. ' कर्मण्येवाधिकारस्ते ' चें कडक तत्वनिष्ठ आचरण करणारा कर्मयोगीच तो. वाचकांना अर्थ समजतो कीं नाहीं या फलाकडे त्याचें लक्ष कसें जाईल ? ' निळया डगलेवाल्याची परेड ' व ' ओ डफी याचें डी व्हॅलेरास बजावणें ' या दोहोंचा अर्थाअर्थी काहीं संबंध आहे कीं नाहीं ? तसेंच, अस्मानी डगलवाले व ओ डफी यांचें तरी नातें काय ? हा खुलासा तारेंत असणार नाहीं. पण पत्रपटूनें तो लिहिल्यास कांहीं बिघडेल ? दुसरे एक पहा. सरकार संपुष्टांत आणणें म्हणजे काय ? देशद्रोहाची ती कमालच म्हणावी लागेल ! पण तसें काहीं घाबरण्यासारखें वास्तविक कारण नाहीं. पार्लमेंटरी राज्यपद्धतींत निरनिराळे पक्ष अधिकारारूढ असतात त्यांची ' खांदे-पालट ' लोकमतानुसार होत रहाते. एक पक्ष जाऊन त्याचे जागीं दुसरा येतो. पण तेवढयानें सरकार संपुष्टात येत नाहीं. एवढा विचार केल्यानंतर मग ही बातमी अशी लिहावी लागेल :—

> निळया डगलेवाल्यांची एक भली जंगी परेड थर्ल्स येथें झाली. त्या निमित्तानें त्यांचे पुढारी ओ डफी यांनीं डी व्हॅलेराच्या अधिकारारूढ पक्षाला उद्देशून भाषण केलें. " आमची ( निळया डगल्याची ) चळवळ सनदशीर असतांही केवळ आपल्या पक्षाला विरोधी म्हणून ती बंद पाडण्याची खटपट डी व्हॅलेरानें करूं नये. प्रचलित कायद्यांचा भलताच अर्थ करून किंवा दुसऱ्याच कसल्या

तरी लबाडीनें ( युक्तीनें ) तशी खटपट केल्यास सत्ताधारी पक्षाला खालीं ओढण्यास आम्हांला मुळींच वेळ लागणार नाहीं. "

यांत १०-१२ शब्द अधिक लागले खरे; पण त्यानें अर्थ नीट कळूं लागला. वास्तविक तार फारच मोठी असून घेतलेल्या भागाचें संपादित मूळ असें आहे:—

" An imposing parade of the Blue Shirts in uniform was held at Thurles.......General O Duffy warned Mr. de Valera that if he attempted by the perversion of law or a trick to get rid of the law-abiding movement, because it was a political danger to his party, he would bring government to a sharp & speedy end......"

विलायतेहून येणाऱ्या बहुतेक तारांचें भाषांतर करणें कठिण असतें. कारण थोडक्या शब्दांत पुष्कळ अर्थ आणण्याचे उपाय त्यांना योजावे लागतात. शिवाय प्रत्येक शब्दाला जबर आकार देऊनच तार पाठवितां येते, म्हणून शब्दांची काटकसर करतात. आणि इंग्रजी वाक्यरचनाच मुळीं अशी असते कीं, वाक्याची लांबी वाटेल तितकी वाढवितां येते. मराठींत तशी वाक्यें अर्थांतच होत नाहींत. म्हणून एक बडें इंग्रजी वाक्य असेल तर तें फोडून वेगवेगळीं लहान मराठी वाक्यें करण्यास अडचण वाटते. वास्तविक तसें वाटण्याचें कारण नाहीं. इंग्रजी वाक्यांची सुरवातही अगदीं वेगळी करण्याचा वर्तमानपत्री प्रघात आहे. त्यांचेंच अंधानुकरण करणें वेडेपणाचें व हास्यास्पद होईल. विलायती तारांच्याच बाबतींत असा भाषान्तराचा गोंधळ उडतो असें नव्हे. देशी घडामोडींचीसुद्धां खबर हें काम करणारांना नीटपणें देतां येऊं नये हें विचित्रच !

" काल लाहोर येथें श्री. **मेहरोत्रा** * नांवाच्या गृहस्थाचें मूल दाईच्या हातून घेऊन तसे करणारे लोक मोटारींतून पसार झाल्यामुळें शहरभर फार खळबळ उडाली आहे. "

---

* **टीप** :— वास्तविक रीत्या हें नांव ' मल्होत्रा ' असें पाहिजे.

या तारेचें मूळ देण्याची आवश्यकता दिसत नाहीं. पण दोन्हीं उदाहरणां-वरून पुष्कळ शिकतां येण्यासारखें आहे. निदान टाळण्यासारखे असे कोणते दोष आपण नेहमीं लक्षांत ठेवले पाहिजेत एवढें तरी या चर्चेवरून कळेल. असल्या भाषांतरावरून आमच्या संपादकीय शाखेंतला एक मोठा दोष उघड-कीस येतो व तो हा कीं, तारा हातीं पडतांच त्या ' बातमी – संपादका ' कडे ( आधीं अशा प्रकारची कार्यविभागणीच नसावयाची ) जात नाहींत. खरें पाहिलें तर सर्व बातम्या एका मुख्याच्या हातांतून गेल्या पाहिजेत. म्हणजे त्यावर तो संपादकीय संस्कार करतो. आणि संपादकीय संस्कार केले कीं भाषांतरणें थोडेंसें सुकर होतें. परंतु तेवढ्यानें वर दाखविल्या तसल्या चुका हमखास टळतील असें नव्हे. असो. ह्या संपादकीय व्यवस्थेबद्दल सध्यां तरी आपणांस काहींच बोलावयाचें नसल्यानें आपल्या प्रस्तुत विषयाकडे वळूं.

भाषांतरतांना पुष्कळच ( घोड ) चुका होतात. बाकी चुका होतात म्हण-ण्यापेक्षां **करतात** असेंच म्हणणें श्रेयस्कर. त्यामुळे बातमींतील स्वारस्य निमें कमी होतें. इंग्रजी शब्दांचें शब्दशः भाषांतर करण्याची सवय लागली म्हणजे कसा कर्णकटु प्रयोग निर्माण होतो पहा :—

**" हिऱ्याच्या व्यापाऱ्याच्या मृत्यूची हकीकत "**
**" रशियाचे परराष्ट्र व्यवहाराचे कारभारी "**
**" लाहोरच्या कटाच्या खटल्याचा निकाल "**
**" कायद्याच्या विद्यार्थ्याच्या आत्महत्येचा प्रयत्न "**

या सर्वांचा रोख एकच. " च्या च्या " करण्याकडे अधिक कल. ' षष्ठी ' ( विभक्ती ) वर भारी प्रेम. पण त्यामुळें वाचतांना काय वाटतें हें प्रत्यक्षच अनुभवावें. त्याचें वर्णन कसें म्हणून करावयाचें ? शिवाय मथळ्यांत अशा शब्दप्रयोगामुळें किती तरी क्लिष्टता येते. ' डायमंड-मर्चंट ' म्हटलें कीं ' हिऱ्याचा व्यापारी ' असें भाषांतरण्यापेक्षां ' जवाहिरी ' म्हटलें तर तें चुकेल ? शुद्धीकृत मराठीच वापरावयाचें अशी शपथ असेल तर ' रत्न विक्रेता ' असाही नवा शब्द प्रयोग करावा. पण ' रशियाचे परराष्ट्र व्यवहाराचे कारभारी ' हें कसलें सोंग ? प्रचारांतील अगदीं साधा शब्द ' परराष्ट्र मंत्रि ' हा लक्षांत येऊं नये म्हणजे काय ? सहा अक्षरांत

होणाऱ्या कामासाठीं तेरा अक्षरें व्यापणारे तीन शब्द उपयोजल्यास जागा दुप्पटीहून अधिक अडली कीं नाहीं.? पण इतका विचार करणारानें अशी चूक मुळांत केलीच नसती. "कायद्याचा विद्यार्थी" म्हणजे वकिली शिकणारा. इंग्रजींत "लॉ स्टूडंट" म्हणून म्हटलें, त्याबद्दल "कायद्याचा विद्यार्थी" ही विटेला वीट ठेविली ! गवंडयाचें काम व भाषांतर यांत साम्य कांहींच नाहीं हें वारंवार सांगावें लागतें. भाषांतर करणारानें घरगुती व्यवहार विसरून यावें असा कांहीं लिखित किंवा अलिखित नियम वृत्तव्यवसायांत असल्याचें मला तरी ठाऊक नाहीं. आपल्या घरीं कुणी आजारी माणसें असतातच. त्यांच्या आजाराचें स्वरूप "गंभीर" होतांना कोणी ऐकलें आहे ? खालील तार पहा. 'गंभीर' प्रसंगीं सुद्धा अशा हास्यास्पद चुका सर्वांत शहाणे म्हणून समजल्या जाणाऱ्या वर्गाच्या हातून – संपादकीय शाखेंतील मंडळींकडून– होतात, म्हणून त्याबद्दल वाचकांस उद्वेग अधिक वाटतो.

> "जिनेवा सरोवराच्या काठावरील मायन्स जवळ असलेल्या इस्पितळांत श्री. व्ही. जे. पटेल हे अजारी असून त्याची स्थिति **गंभीर** झाली आहे. त्यांच्या काळजास व आंतडयास बिघाड उत्पन्न झाला असून त्यापासून त्यांना त्रास होत आहे. **स्पेशालिस्टांना** बोलावून आणलें असून त्यांना **केसबद्दल** फार चिंता वाटत आहे.

या तारेचें संपादित मूळ असें :—

> Mr. V. J. Patel is very seriously ill in a clinic near Myons lake of Geneva suffering from heartw & intestinal troubles. The specialists who have been called in, take a grave view of the case.

आणखी एक मासला पहा:—

> "असें समजतें कीं, इंग्लंड अमेरिका यांच्या मधील कर्जाच्या सर्वच प्रश्नाची फेर तपासणी करण्याच्या बाबतींतील अपयशाशिवाय १५ डिसेंबर रोजीं कर्जाचा जो हप्ता

भरावयाचा आहे त्याबद्दल प्रे. रूझवेल्ट व ब्रिटिश प्रतिनिधी यांच्यांत तडजोड होऊं शकली नाहीं. ”

ह्या तारेचें संपादित मूळ असें:—

“ It is understood that in addition to the failure to reach an agreement on the revision of the Anglo-American Debt Settlement as a whole, President Roosevelt & the British Negotiators are unable to agree over the question of payment of the debt-instalment falling due on 15th December.”

भाषान्तरकाराचें यांतील कौशल्य काय विचारावें ? मूळ तारेंत एक वाक्य आहे तसेंच त्यानेंही एकच ठेवलें आहे आणि मूळची सुरवात आहे तशीच मराठींतही केली आहे. सर्व तार भाषान्तरून अखेरीस......‘ असें समजतें ’ असें म्हटलें असतें तर भाषान्तर अगदींच वाईट दिसलें असतें, अशी त्याची दृढ समजूत ! ती ब्रह्मदेवसुद्धां बदलूं शकणार नाहीं. ह्या मजकुराचीं दोन अथवा तीन वाक्यें करून अर्थ कळेल असें भाषांतर करतां येतें. पण शब्दाला शब्द ठेवत जाण्याचीच ‘ चटक ’ लागलेली, त्याला कोण काय करणार ? असो.

शब्दशः भाषान्तर करण्याचें व्यसन जडलें म्हणजे साधे, नेहमींच्या प्रचारांतले शब्दसुद्धां आठवत नाहींत. ‘ स्त्री स्वयंसेवक ’ किंवा ‘ स्त्री विद्यार्थी ’ असे प्रचार किती तरी वेळां आपण वर्तमानपत्रांत वाचतो. पण त्याऐवजीं स्वयंसेविका किंवा विद्यार्थिनी हे रूढ असलेले शब्द कांहीं भाषांतरकाराच्या डोळ्यांपुढें आले नाहींत. त्याचप्रमाणें ‘ भुकेचा संप ’ हा शब्दप्रयोग शुद्ध भाषान्तर आहे कीं नाहीं ? वास्तविक ‘ अन्नत्याग ’ असें म्हणणें मुळींच चूक नसतां ‘ हंगर – स्ट्राइक ’ चें बरोबर भाषान्तर हवें म्हणूनच ‘ भुकेचा संप ’ म्हणतात कीं काय कोण जाणे !

भाषांतराची चर्चा येथेंच थांबवून मथळे देण्याविषयीं थोडा उल्लेख केला पाहिजे. बातमींत महत्त्वाचें काय आहे हें हुडकतां आलें, म्हणजे मथळे कसे द्यावे तें ताबडतोब समजतें. परंतु त्यासाठीं सोपी रीत अशी कीं, प्रथम बातमी

भाषांतरून ठेवावी. बहुतेक जण इंग्रजी मथळा असेल त्याचेंसुद्धां भाषांतर करून लिखाणाला सुरवात करतात. वास्तविक पत्राचें धोरण देखील मथळ्यां-वरून ओळखतां येतें आणि म्हणूनच निरनिराळ्या पत्रांचे मथळे, बातमी तीच असली तरी, एक नसतात. पण आमचे मराठी वीर बातमीच्या बरोबर, नव्हे बातमीच्या आधींच, मथळ्यांचेंही भाषांतर करतात. प्रथम बातमी लिहावी व संपादकीय संस्कारासाठीं ती द्यावी, आणि मथळे देणाऱ्या खास इसमाकडे नंतर ती पाठवावी असा सर्व साधारणपणें शिरस्ता सुव्यवस्थित कार्यालयांत असतो. आमचेकडे हीं तीनही कामें एकालाच करावीं लागून त्याच्या जोडीस मुद्रितें तपासण्यास मिळतात. तेव्हां तीं सर्व कामें एकदम करण्याची खटपट करूं नये. प्रथम तार वाचून पहावी. तिचा मराठींत अर्थ आपणांस समजला अशी खात्री झाल्यावर, तिखट मीठ न लावतां जशीच्या तशी मराठींत लिहावी. मूळ बरोबर घेऊन काय चुकलें तें ताडून पहावें आणि मग पुनः आपलें लिखाण जुळाऱ्याकडे देण्यापूर्वी वाचावें. म्हणजे काय दोष असतील ते कळतील. मुद्रितें आल्यानंतर मथळे द्यावे किंवा हस्तलिखिताचें दुसरें वाचन चालू असतांना लिहावेत. अशी सवय वर्तमानपत्रांसारख्या धांदलीच्या कचेरींत कशी शक्य होईल ? म्हणून नवशिके म्हणतील. त्याला उत्तर इतकेंच कीं, प्रथम प्रथम असें करण्यांत वेळ फार जातो असें वाटलें, तरी वस्तुस्थिति तशी नसते. शिवाय ही रीत फक्त नवशिका रुळण्यापुरती असते. कामाचा परिपाठ पडल्यानंतर बातमी-दाराला ह्या कामाच्या पायऱ्या करण्याचें कारण नाहीं. दोन तीन पायऱ्यां-वरूनच तो एकदम उडी मारतो.

मथळे वाईट दिल्यानें किंवा खरी आकर्षक बाब प्रामुख्यानें पुढें आणली नाहीं तर वर्तमानपत्र अधिक खपत नाहीं हें उघड आहे. बातमी लिहिण्याची धर्ती अशी असावी कीं, रोज वर्तमानपत्रें वाचण्याची चटक वाचकांना उत्पन्न झाली पाहिजे. एकच उदाहरण पहा. पेशावरची तार. एक पठाण सहा गाढवां-वर कांहीं बोजा लादून अटकेचा पूल ओलांडीत असतां शिपायानीं झडती घेतली. गाढवांवर असलेल्या बोजांत १० बॉंब, बंदुकीची दारु ३ पोतीं, काडतुसें १०००, बंदुका १७, रिव्हाल्वर्स ७......इतकें 'सामान' सांपडलें. हत्यारें रशियन बनावटीचीं नवीं दिसतात.......वगैरे.

ही तार किती तरी महत्त्वाची असून त्या दिवसाच्या प्रमुख बातमींत बसेल. पण तिचें महत्त्व न कळणाऱ्या बातमीदारानें — उपसंपादकानें पाहिजे तर म्हणा — काय मथळा दिला असेल ? त्यानें

" पठाणाच्या गाढवांवरील बोजा "

एवढा मोठा, अर्थपूर्ण, सूचक व आकर्षक मथळा दिला ! त्याला बोब दिसले नाहींत, बंदुका रिव्हाल्व्हर्स आढळलीं नाहींत, सरहद्दीवरील टेहळणी चुकवून इतका दारुगोळा अटकेपर्यंत कसा आला याचें आश्चर्य वाटलें नाहीं, क्रांति-कारकांची चळवळ आठवली नाहीं, रशियन बनावटीच्या निर्देशांत कांहीं तथ्य वाटलें नाहीं, रशियाचें व ब्रिटिशांचें ' सख्य ' त्याला ठाऊक नव्हतें... फक्त पठाणाच्या ' गाढवांवरील ' बोजा ही एकच बाब त्याला त्या बातमींत महत्त्वाची वाटली. बातमींत ' गाढव ' आलें कसें याचेंच त्याला आश्चर्य वाटलें. तेव्हां त्याला काय म्हणावें ? असो.

हा प्रकार इतक्या विस्तारानें सांगितला याचें कारण कोणत्या चुका टाळावयाच्या तें बातमीदारांस कळावें हें होय. बातमीला महत्त्व कां येतें याची नीट जाणीव असणारा किंवा लोकांत खळबळ उडते कशानें हें चटकन् ओळखणाराच इसम मथळे देण्यास लायक ठरतो. इंग्रजी वृत्तपत्रांतील शिरस्ता वारंवार सांगूं लागलों, तर कुणालाही संताप यावयाचा व मजवर इंग्रजाळलेला असा आरोप होईल. पण वस्तुस्थिति काय आहे हें सांगणें माझें कर्तव्य आहे. इंग्रजी वर्तमानपत्रांच्या कचेरींत मथळे देणारास सर्वांत अधिक मजुरी मिळते. त्याचें काम तेवढेंच ! सर्व मजकूर चाळून कोणत्या मथळयाखालीं तो जावा हें त्यानेंच ठरवावयाचें असतें. मथळे नुसते आकर्षक असल्यानें भागत नाहीं. मथळयांत पत्राचें धोरण यथायोग्य रीत्या प्रतिबिंबित झालें पाहिजे. आणि इंग्रजी पत्रांचें तसें असतेंही. टाइम्स ऑफ इंडियांत व फ्री प्रेस जर्नलमध्यें एकच बातमी वेगवेगळ्या शीर्षकानें झळकते याचें कारणही तेंच. परंतु आपणांकडे सर्वच कामें बातमीदाराला करण्याचा प्रसंग येतो म्हणून वैतागून धंदा सोडण्याचें प्रयोजन नाहीं. युरोपमध्यें असणाऱ्या सर्वच बाबी आम्हांला कुठें साध्य झाल्या आहेत ? केवळ तुलना करतां यावी म्हणून तिकडील परिस्थिती सांगितली. पण आपणां-वर सर्वच कामें पडल्यामुळें गोंधळून जाण्यांत शहाणपणा नसून पडलेलीं सगळीं कामें चांगल्या तऱ्हेनें बजावणें यांतच कौशल्य आहे. आणि असें केलें तर

युरोपीय पत्रपटूपेक्षांही आपण श्रेष्ठच नाहीं कां ठरणार ? ह्या वादाला अंत नाहीं. तेव्हा येथेंच थांबणें श्रेयस्कर.

बैठ्या बातमीदाराला आणखीही दोन तीन प्रकारचीं कामें कचेरींत बसून करावीं लागतात. एक, कार्यालयांत येऊन पडणाऱ्या बातम्यांचा समाचार घेणें. निरनिराळ्या संस्थांतर्फे कांहीं कार्यक्रम घडतात, त्याची सूचना आधीं वर्तमानपत्राकडे पाठवितात. तसें करण्यात हेतु दुहेरी असतो. बातमी मिळविण्यासाठीं म्हणून त्या समारंभाच्या अथवा कार्यक्रमाच्या वेळीं बातमीदारानें हजर रहावें हा एक व दुसरा असा कीं अमुक ठिकाणीं असा असा समारंभ ( अथवा कार्यक्रम ) आहे, लोकांनीं हजर रहावें, अशी आपली जाहिरात वर्तमानपत्रांतून व्हावी. त्याप्रमाणें दोन्ही हेतू साधतात यांत शंका नाहीं. पण आपणास बातमीदाराचें या संबंधांत काय कर्तव्य असतें तें पहावयाचें आहे. अशा कार्यक्रमाच्या सूचना लेखी अथवा तोंडी आल्या तर पहिलें काम म्हणजे संकेत पुस्तकांत त्यांची नोंद करणें हें होय. तारीखवार कुठें कुठें काय कार्यक्रम आहेत हें त्या पुस्तकावरून लक्षात येतें व आजच्या ( उद्यांच्या ) पत्रात जागा कसकशी वाटून द्यावयाची हें त्या पुस्तकांतील नोंदीवरून ठरवितां येतें. समजा श्री. सुभाषचंद्र बोस विलायतेहून × × रोजीं सकाळीं मुंबईत उतरणार असतील तर त्या दिवशींच्या ( म्हणजे त्या दिवशीं छापल्या जाणाऱ्या ) पत्रात इतर मजकुरास कात्री लागलीच पाहिजे. सुभाष बाबू आल्यानें मुंबईतील इतर कसल्याही कार्यक्रमाकडे लक्ष न देतां सर्व नागरिक त्यांच्याच भोंवती घोळका करतील हें उघड आहे. म. गांधींचा उपवास चालू होता तेव्हां इतर सर्व बातम्या मागें पडल्याच कीं नाहीं ? पण त्यांचा उपवास सुटताच इतर बातम्या प्रामुख्यानें पुढें आल्या. व्यक्तिमाहात्म्य, कालमाहात्म्य अथवा विषयाची थोरवी यामुळेंच वर्तमानपत्रांत जागा कमीजास्त ठरत असते आणि म्हणूनच एखादा मोठा पुढारी आला असेल तर नवा आहे तोंपर्यंत तरी स्थानिक बातमीपत्रांत तो अधिक जागा व्यापणार हें नक्की. याच कारणासाठीं संकेत पुस्तकांत निरनिराळ्या ठिकाणचे कार्यक्रम टिपलेले असावे. त्यावरून इतर मजकूर किती अवकाशांत आटपावयाचा तें अजमावतां येतें.

संकेत पुस्तकांत ती नोंद झाल्यानंतर मग लगेच आपल्या वर्तमानपत्रांत

ती बाब समाविष्ट करावी काय ? व करावयाची असल्यास कशी करावी ? हे प्रश्न उद्भवतात. वर्तमानपत्रांत कार्यक्रम कधी द्यावे ही पंचाईत पडेल. पण साधारणपणें दोन तीन दिवस आधीं पासून जागा असेल त्या मानानें अशा कार्यक्रमांची प्रसिद्धी करावी. तसेंच ' आज ' शहरांतील लोकांना कोठें कोठें काय काय कार्यक्रम व्हावयाचे आहेत हें कळावें म्हणून त्या दिवशींच्याच पत्रांत त्याचा समावेश व्हावयास हरकत नाहीं. मात्र काळजी घ्यावयाची ती इतकीच कीं कोठें, कधीं, केव्हां व काय होणार आहे याची स्पष्ट कल्पना ती ' बातमी ' वाचून लोकांना आली पाहिजे. आज, परवां, पुढल्या गुरुवारीं असले निर्देश होता होईल तो टाळून तारीख व महिना लिहावा. आणि अशा मजकुराचें मुद्रित काळजीपूर्वक तपासावें. वेळही नीट लिहावी. म्हणजे घोटाळा उडण्याचा संभव मुळींच उरूं देऊं नये.

बैठ्या बातमीदारास दुसरें नेहमीं पडणारें काम म्हणजे कित्येक वर्तमान पत्रांतून बातम्या काढण्याचें. जिल्हानिहाय निघणारीं किंवा इतर प्रांतिक ( पण मराठी ) पत्रें बातमीदारापुढें टाकून, खुणा केलेल्या बातम्या घ्या, असें सांगतात. तेव्हां नुसतें कापे घेऊन म्हणजे त्या पत्रात असेल तशीच बातमी उतरून घेऊन भागणार नाहीं. त्या वर्तमानपत्रानें लिहिलें तसेंच घेण्यांत साहजिकच एक प्रकारचा कमीपणा असतो. मात्र त्याच माहिती-वरून रूपांतर करून बातमी अगदीं दुसरी अशी भासवितां येते. त्या साठींच बातमीदाराची आवश्यकता. नाहीं तर संपादकांनीं अथवा दुसऱ्या कुणीही कात्रीनें वर्तमानपत्राचे कापे काढावे व कंपोजिंगला द्यावे म्हणजे भागेल. पण तसें आज पुष्कळ ठिकाणीं होत असलें तरी, तो अनिष्ट प्रकार टाळण्यास प्रयत्न केले पाहिजेत. बातमी देण्यांतलें वैशिष्ट्य म्हणून येथें ' विविधवृत्ता 'चा निर्देश करावा असें वाटतें. त्या साप्ताहिकांत ' जगांतील घडामोडी ' म्हणून पहिल्या पानावर बातम्या छापतात त्या बहुधा इतर वर्तमानपत्रांतूनच मिळविलेल्या असतात. पण प्रत्येक बातमीवर ' विविधवृत्त ' असा शिक्का वैशिष्ट्य-निदर्शक म्हणून दिसत असतो. तसें इतर कोणत्याही पत्राचें नाहीं. कारण इतका त्रास घेतो कोण ? आतां, सर्वांनींच विविधवृत्ती चष्मा लावावा असा ह्या म्हणण्याचा अर्थ नाहीं.

त्याचप्रमाणें कांहीं प्रसंगांचे रिपोर्ट त्या त्या कार्यकर्त्यांकडून प्रसिद्धीसाठीं म्हणून येतात. त्यांना अर्थातच बातमीदारी दृष्टी नसते. तेव्हां त्याचें लिखाण संस्कार केल्याविना आपल्या पत्रांत जाऊं देऊं नये. मूळ अर्थात बदल न करतां हें काम करतां येतें आणि तसें करावें हें श्रेयस्कर. समजा, कामगारांच्या सभेचा रिपोर्ट आपणांकडे आला आहे. कामगार चळवळीकडे असावें तितकें वर्तमानपत्राचें लक्ष नाहीं आणि त्यांच्या रिपोर्टांत दुसऱ्याच अवांतर बातमीस प्राधान्य मिळतें, अशी कामगार पुढाऱ्यांची समजूत असते. म्हणून ते स्वतःच त्या वेळेपुरते बातमीदार बनून वर्तमानपत्रांस रिपोर्ट लिहून पाठवितात. असाच प्रकार थोड्या फार फरकानें कांहीं कांहीं संस्थांचा असतो. त्या त्या ठिकाणीं कार्यकर्ती मंडळी बातमीदाराचें तात्पुरतें काम करतात व त्यांचेकडून वारंवार लिखाण कचेरींत येतें. अशा लिखाणाचा उपयोग तर करावा लागतो. कारण त्याच रिपोर्टांच्या प्रती इतर वर्तमानपत्रांकडे जातात. बरें जसें आलें तसेंच छापून काढल्यास तें ठीक होत नाहीं. त्या लेखकाला जागेची, बातमीच्या महत्त्वाची वगैरे कसलीच कल्पना नसते. वर्तमानपत्राचें धोरणही त्याला ठाऊक नसल्यानें त्याचे हातून प्रत्येक पत्रास पाहिजे तसा रिपोर्ट तयार होणें शक्य नसतें. म्हणून बैठ्या बातमीदारानें हातीं आलेल्या मजकुरावरून आपल्या पत्रांत ‘ बसेल ’ असा रिपोर्ट तयार करावा लागतो. रिपोर्ट लिहिण्याविषयीं आतांपर्यंत पुष्कळ चर्चा झाली आहे, तीच पुनः येथें करण्याची आवश्यकता नाहीं. वेगवेगळे छेदक लिहिणें, पहिल्या छेदकांत थोडक्यांत सर्व बातमीचें सार आलें पाहिजे, वगैरे सूचनांची पुनरुक्ती कशाला करूं ? असो.

बैठ्या बातमीदाराचें काम एवढ्यानेंच संपत नाहीं. वर्तमानपत्रांच्या कचेरींत ‘ सारांश ’ काढण्याचें विशेष महत्त्वाचें कार्य असतें. परिषदा, सभा, संमेलनें वगैरे प्रसंगीं होणाऱ्या अध्यक्षीय भाषणांच्या छापील प्रती कचेरींत येऊन पडल्या असतील. त्यांचा ‘ अर्क ’ काढून जागा असेल त्या मानानें छापण्यास द्यावा लागतो. कारण सर्वच भाषण छापतां येण्यासारखें नसतें. अशा वेळीं नुसती कापाकापीच करून मुळींच चालत नाहीं. त्याचा सारांश काढणें ही एक वेगळीच कला आहे असें म्हणतां येतें.

" श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः "

ही बढाई सर्वांनाच यथार्थरीत्या मारतां येईल असें नाहीं. दोनशें पानांचा रिपोर्ट वर्तमानपत्राच्या कचेरीत रात्रीं येतो व त्याचें सार थोडक्यांत सकाळीं वाचकांच्या हातीं पडावें लागतें. रिपोर्टांचें भाषांतर करणें एक वेळ सोपें झालें असतें. परंतु दोनशें पानांतील महत्त्वाचे भागच नेमके वेचून काढणें हें अभ्यासाशिवाय साध्य होणार नाहीं. वक्त्याचें भाषण ऐकतांना पुष्कळ गोष्टी ऐकून त्यांतील आवश्यक तेवढयाच घ्याव्या लागतात. तशीच बाब वर्तमानपत्रांतील बहुतेक शाखांत चालते. म्हणजे भाराभर वाचलें कीं त्याचें थोडक्यांत सार काढणें हेंही काम बातमीदारानें शिकून घेणें आवश्यक आहे. एक पॅरा इकडला, त्याच्या मधील बराचसा भाग गाळा, पुढें एक कुठला तरी छेदक जुळवा, अशा प्रकारें सारांश वाचनीय होत नाहीं इतकेंच येथें सुचवावयाचें. इंग्रजी शालेय अभ्यासांत ' सारांश ' काढण्याचा एक विषय असतो, त्यावरून ह्या कामाची पुष्कळ माहिती होईल.

आणखीही विविध प्रकारचीं कामें बातमीदारांस करावीं लागतात. त्याचा स्वतंत्र विचार यथाक्रम होईलच.

प्रकरण बारावें

# खेळ – खेळाडू

मराठी वृत्तपत्रांना राजकारण व कित्येक वेळीं सामाजिक वाद या विना तिसऱ्या विषयांत ' राम ' वाटतच नसावा असें त्यांच्या लिखाणावरून वाटतें. म्हणून कुठल्या ही प्रकारचा खेळ असो, त्यांत चांगली म्हणविणारीं पत्रें सहसा लक्ष घालावयाचीं नाहींत. नाहीं म्हणावयास बुद्धिबळाविषयीं मात्र उच्च दर्जाचीं पत्रें सुद्धां आपलेपणा दाखवीत असत. पण तत्संबंधीं संपादकीय उल्लेख असा क्वचितच होतो. असो. अलीकडे हा सर्व नूर साफ बदलला आहे. वाचकांना पाहिजे म्हणूनच कित्येक वर्तमानपत्रांना त्यांच्या मनांत नसतांही क्रीडांगणावरील बातमी द्यावी लागते. ती वगळून मुळींच चालणार नाहीं. जिल्हानिहाय निघणाऱ्या पत्रांत तर अशा ' घडामोडी ' वगळतांच येत नाहींत. आमच्या संपादकांना क्रीडाविषयक बातमींत, इंग्रजी संपादकांना वाटतें तितकें महत्त्व नसल्यानें, हें प्रकरण इतक्या उशिरां हातीं घेतलें. तें वगळून अर्थात भागणार नाहीं.

खेळांचे ढोबळ मानानें दोन प्रकार करतां येतील. एक देशी व दुसरे विदेशी. किंवा मैदानी खेळ व घरगुती बैठे खेळ असेंही पाहिजे तर प्रकार करावे. पण ते पाहण्यास अथवा तत्संबंधीं बातमी ऐकण्यास लोकांची उत्सुकता असेल त्या मानानेंच त्या क्रीडेच्या वर्णनास वर्तमानपत्रांत जागा मिळेल. साधारण रीत्या ही बातमी बहुतेकांना आवडत असते. आधींच बातमीदारानें " प्रख्यात मल्लांची जंगी कुस्ती होणार " असा गाजावाजा केला असेल त्याच प्रमाणांत लोकांत कुतूहल अधिक वाढणार हें उघड आहे. म्हणून क्रिकेट, फुटबॉल, हॉकी इत्यादिकांचे सामने होतात, त्याची खबर आधीं होणार होणार म्हणून झळकते आणि मग लोकांची वाढलेली जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं बातमीदारांना विस्तृत रिपोर्ट लिहावा लागतो. असा हा परस्पर पोषक संबंध आहे. आतां प्रत्येक खेळासंबंधीं थोडक्यांत सूचना देऊन हें प्रकरण थोडक्यांत आटोपतों. कारण खेळ – खेळाडूंच्या बातम्या देण्याचें काम करतां आलें तरी माझ्या

माहितीची परिमिती मला स्पष्ट दिसत आहे. बहुधा क्रीडांगणावरील बातमी ही ‘ खास ’ तज्ञांकडूनच लिहवितात. म्हणून यांविषयीं अधिक विस्तार मला करतां येणार नाहीं, याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी.

क्रिकेट, फुटबॉल व हॉकी हे खेळ परकी असले, किंवा त्यामुळें हिंदुस्थानांतील पुष्कळ द्रव्य साल दरसाल परदेशीं जात असलें, तरी त्यांचे आसन आता येथें स्थिरावल्यासारखेंच आहे. त्यांचा कित्येकांच्या मतें अनिष्ट परिणाम कांहींही असो, लोकसमुदायांवर पडलेली त्याची छाप सहसा निघणार नाहीं. एक वेळ ब्रिटिश मालावरील बहिष्कार पूर्णपणें पाळण्यास हिंदी जनता तयार होईल. पण परदेशी क्रीडा हिंदी लोकांतून आतां उठून जाणें शक्य नाहीं. कसलीही राजकीय चळवळ असो, व्यापारी मंदी असो, दुष्काळ पडो, खेळ पहाण्याकडे लोकांचा जमाव कांहीं केल्या कमी होत नाहीं हें पाहून तरी असल्या खेळांची बातमी देणें मराठी वर्तमानपत्रास भाग पडतें. क्रिकेटचीच बाब पहा. सामना कधीं, केव्हां, कुठें होणार, दोन्ही ‘ टीम्स ’ मधील खेळाडूंची यादी ह्या उल्लेखनीय गोष्टी प्रथम ‘ होणार ’ अशी बातमी देतांना लिहाव्या लागतात. नंतर झालेल्या सामन्याची बातमी लिहितांना * * * चा * * शीं सामना झाला. त्यात * * हा पक्ष ....... रीतीनें विजयी झाला किंवा खेळ अर्धवट राहिला, अशा रीतीनें पहिल्या वाक्यांत खेळाचा निकाल कळविणें इष्ट असतें. क्वचित् प्रसंगीं लोकांचीं मनें विलक्षण रीत्या आतुर झालेलीं असतात तेव्हां, – आणि ह्या खेळांत निकाल कसा केव्हां एकाएकीं बदलेल हें मुळींच सांगतां येत नसल्यानें,– ताणलेल्या उत्सुकतेस अधिक ताण देणारें वर्णन आधीं देऊन नंतर मग ‘ गौप्यस्फोट ’ करावा. क्रीडांगणावरील प्रेक्षकांच्या मनांत क्षणोक्षणीं उद्भवणारे विकार, घरीं बसून वर्तमानपत्रें वाचणाऱ्या प्रेक्षकांच्या मनांत आले पाहिजेत, अशा हेतूनें क्रीडांगणावरील हें ‘ संजयकार्य ’ साधावयाचें असतें. केवळ * * * धावानीं * * * चा पराभव झाला अशा तोटक्या वृत्तान्तानें वाचकांचें समाधान केव्हांही होत नाहीं. एम. सी. सी. चे किंवा चौरंगी सामने होतात तेव्हां ‘ क्रिकेट शास्त्रा ’ ला व तत्संबंधीं आंकडयांना अधिक महत्त्व असतें. म्हणजे प्रत्येक खेळाडूचें नैपुण्य अजमावण्यासाठीं आजपर्यंतच्या त्याच्या खेळाची बारकाईनें नोंद केलेली असते तिची सरासरी काढतात. म्हणून तें एक वेगळें आंकडेशास्त्रच होऊन बसतें. तसा प्रयत्न आपणांकडे होत नाहीं व हें काम खाशा

बातमीदाराचें असल्यानें आपण तिकडे येथें अधिक लक्ष न देणें बरें. खेळाचें वर्णन कसें करावें एवढेंच तूर्त पहाणें आहे. प्रत्येक चेंडूफेकीच्या किंवा फटकारे मारणाराच्या हालचालीच्या बारीक सारीक नोंदीस वर्तमानपत्रांत नेहमींच वाव नसतो. फक्त सुरवात कोणी केली, म्हणजे ‘ उन्हाळी पावसाळी ’ कोणीं जिंकली, खेळावयास कोण गेले, प्रत्येक गडी बाद होई तेव्हांच्या धांवा किती होत्या, कोण कसा बाद झाला, धांवा काढणाराचें, चेंडू फेंकणाराचें किंवा तो झेलणाराचें वर्णनीय नैपुण्य यांबद्दल मधून मधून निर्देश करावा. आणि प्रेक्षकांची उत्कंठा कां वाढली किंवा त्यांच्या भावना मध्येंच उद्दीपित कां झाल्या, ते कां ओरडले हें सांगावें लागतें. गोलंदाजाची, फटकारे मारणाराची व क्षेत्ररक्षकाची कामगिरी, क्रीडापटूंच्या सूक्ष्म निरीक्षणानें पाहून खेळाडूंच्या उदार वृत्तीनेंच तिचें वर्णन करावें. तो विरुद्ध पक्षाचा, त्याचें गुणवर्णन मी करणार नाहीं, अशी अनुदार वृत्ती बातमीदारानें बाळगून चालत नाहीं. खरें बोलायचें म्हणजे खेळाडूंत सुद्धां जी वृत्ती नको, ती बातमीदाराचे अंगीं असून चालेल कसें ?

पुनः पुनः बजावून सांगण्यासारखी गोष्ट ही कीं, क्रीडांगणांची बातमी लिहिणारे बातमीदार स्वतःस भलताच मोठा अधिकार प्राप्त झाला असें मानून, ‘ ह्या वेळीं त्यानें चूक केली ’, ‘ मूर्खपणा केला ’, ‘ असें करावयास नको होते ’, अशा पुष्कळ टीका करीत असतात. पण तें केव्हांही रास्त नव्हे. कप्तान किंवा त्याचे भिडू चुका करीत नसतील असें नाहीं. चुका सर्वांच्याच हातून होतात. पण त्या सांगण्याचा किंवा त्यांचा उल्लेख करण्याचा अधिकार आहे कीं नाहीं, हें ज्याचें त्यानें ओळखलें पाहिजे. आपणांस कोणी बोलणार नाहीं, आपणांवर कोणी फिर्याद करीत नाहीं, मग करा एकाद्याची मनसोक्त निंदा, असा मोह बातमीदारास पुष्कळ वेळा होतो. क्रीडांगणावर गेल्यावर तर हटकून होतो. “ * * ला न घेतां * * ला घेतलें, यांत कप्तानांनीं काय शहाणपणा केला कुणास ठाऊक ” किंवा “ * * ला पुढील सामन्यांत वगळण्यास हरकत नाहीं. या खेळांत त्यांनीं काय दिवे लावले तें सर्वांस कळलें आहे ” अशा आशयाची टीका पुष्कळ वेळां वाचण्यांत येते. ती करण्याचा बातमीदाराचा काय अधिकार ? असा प्रश्नाही वाचकांचे मनांत ताबडतोब उद्भवून त्या पत्राबद्दल व बातमीदाराच्या ‘ शिष्ट ’ पणाबद्दल एक प्रकारचा तिरस्कार

वाटूं लागतो. केवळ आपण संपादकीय कृपाछत्राखालीं ( अनामिक असल्यामुळें ) सुरक्षित आहोंत आणि तोंडातोंडी करायला कोणी येत नाहीं याच बाबींचा फायदा घेऊन टीकास्त्र सोडूं नये, ही विनंती मराठी बातमीदारांना — क्रीडांगणीय बातमीदारांना तर विशेषतः — करावीशी वाटते.

क्रिकेटचें वर्णन वाटेल तितकें लांबवितां येतें. अर्थात् हें संपादकाच्या मर्जीवर राहील. तसेंच चार दिवसांपूर्वी होऊन गेलेल्या सामन्याचें सविस्तर वर्णन कोणी वाचणार नाहीं. म्हणून दैनिकांनाच विस्तृत रिपोर्ट लिहिणें परवडतें. इतरांना थोडक्यात सारांश द्यावा लागतो. परंतु त्याचा अर्थ * * हा गडी आला, त्यानें * * धांवा काढल्या. मग तो बाद झाला. त्याच्या जागीं * * आला. अशा प्रकारची कंटाळवाणी पद्धत न स्वीकारतां कांहीं तरी वैशिष्ट्य ठेवून खेळाडूंच्या नैपुण्याबद्दल लिहावयाचें असतें. कोणानंतर कोण आला ह्या अनुक्रमालाच विशेष महत्त्व देऊन चालेल कसें ? कोठें तरी सर्व गड्यांची नांवें, त्यानीं मिळविलेल्या धांवा, केलेले बाद गडी, यांची याद येतेच. मग पुनः अनुक्रमानें सर्व सागण्याची आवश्यकता नसते. " * *चा खेळ प्रेक्षणीय झाला. कारण त्यांनीं * * मिनिटांत * * * धावा केल्या. पैकीं चौकड्याच * * व 'छकड्या' * होत्या." अशा प्रकारें लिहितां येतें. कवित्व प्रकटविण्यास क्रीडागणावर वाव मुळींच नसतो. आणि क्रीडागणावरील रिपोर्टांत कवित्व, सुभाषितें किंवा संस्कृत वचनें खेचून भरणे म्हणजे खेळाशीं तन्मयता न झाल्याची कबुली होय. घरीं बसून वाचणारांस — क्रीडागणावरील बातमी वाचण्यास उत्सुक असलेल्यांस नव्हे — लेखनीचा विलास म्हणून तो मजकूर वाचनीय वाटेल यांत शंका नाहीं. पण क्रीडांगणावरील रिपोर्ट तो नव्हे, असेंच क्रीडापटु म्हणतील. असो.

क्रिकेटची एखादी ' मॅच ' पाहण्यास आपण हजर नसलों — कारण त्या वेळीं दुसरें महत्त्वाचें काम होतें — तर एक दोन छेदकांत त्या सामन्याचें वर्णन करण्यास " स्कोअर बुक " उपयोगी पडतें. सामना दोन पक्षांत होतो आणि दोघांपैकीं कुणाचेंही पुस्तक पाहिलें तरी भागतें. गोलंदाजांचें कौशल्य, क्रीडा-नैपुण्य, वगैरे सर्व माहिती, बातमीदाराला खेळाचा थोडा जरी सराव असला

तरी, स्कोअर बुकावरून मिळते. तशी देण्यास हरकतही नसते. पण सविस्तर वृत्तान्तासाठीं समक्षच हजर रहावें लागतें.

ठिकठिकाणचे क्लब, शाळा, कॉलेजें यामधील क्रीडामंडळें यांत बातमीदाराचा प्रवेश अवश्य हवा. खेळाडूंना बातमीदारानें ओळखलें पाहिजे. विशेषतः मोठ्या मैदानावर क्रीडापटूंचा ‘ गण वेश ’ असतो, तेव्हां तर लांबून प्रत्येकाला ओळखणें कठिण होतें. म्हणून चेहरेपट्टी किंवा कपडे यावरच खूण न ठेवता, चालण्याची ढब, उभे राहण्याची पद्धत, धावण्याची तऱ्हा यांवरूनच बातमीदारांस खेळाडू ओळखतां आला पाहिजे. याचा अर्थ चेहरेपट्टी ओळखीची नसावी असा नाहीं. पण मनुष्य ओळखण्याचे सर्व प्रकार बातमीदारास विदित असले पाहिजेत. तसेच, त्या खेळाडूंची पूर्वीपासूनची पीठिका माहीत असली तर पुष्कळ कार्य साधतें. म्हणजे मागील आठवणी देऊन त्यावेळचीं चित्रें डोळ्यापुढें उभीं करता येतील.

कोणकोणते सामने ठरले आहेत, त्यापैकीं कोणता विशेष रंगेल, तो कां, त्यासाठीं तयारी कशी चालली आहे वगैरे किती तरी गोष्टी बातमीच्या सदरात येऊन बसतात व बातमीदाराला त्यांचा उपयोग होतो. पण असे करण्यासाठीं त्याला खेळाडूंशीं फटकून वागून मुळींच भागणार नाहीं. उलट, बहुतेकाशीं खेळीमेळीची गट्टी आहे, अशा दिलदार व प्रेमी वृत्तीनेंच रहावें लागेल. असो.

क्रिकेटला आपणांकडे विशेष महत्त्व आहे, तितकें फुटबॉल व हॉकीला नाहीं. एक तर या दोन्ही खेळांत वर्णन करण्यासारखें विशेष नसते. आणि दुसरें असें कीं क्रिकेटचा प्रसार आपल्याकडेच अधिक आहे. टेनिसची बाबही अशीच. फार विस्तारानें वर्णन करून सांगण्यापैकी तो खेळ नव्हे. आणि खेळणारे फार तर चारच गडी असूं शकतात. त्यामुळें टेनिसच्या सामन्यांत प्रेक्षकाचा उत्साह इतकासा दिसत नाहीं. शिवाय टेनिस हा ‘ सांघिक ’ ( team-play ) खेळ नाहीं हें लक्षात घेतलें पाहिजे. मात्र, टेनिसचे तीन ( किंवा पाच ) सेट्स् होतात, त्या प्रत्येकाचा स्कोअर ठराविक अनुक्रमानें देण्यांत खबरदारी बाळगली पाहिजे. टेनिसचा सर्वच स्कोअर एका ठराविक पद्धतीनें सांगत असतात. त्याप्रमाणें शेवटपर्यंत एकच क्रम ठेवणें इष्ट असतें. नाहीं तर, खेळाची प्रगती कशी झाली तें नीट कळत नाहीं. खेळाडूंचे विशेष

‘ हात ’ कोणते, त्यांची ‘ स्टाइल ’ कशी आहे, ‘सर्व्हिस’ कशी होते, ‘ प्लेसिंग ’ कसें करतात वगैरे बाबींचा मधून मधून उल्लेख करावा लागतो. त्यानेंच खेळाचें यथातथ्य वर्णन होईल. मात्र निकाल काय झाला तें आधीं स्पष्टपणे सांगितलें पाहिजे. आणि दुसरी मुख्य लक्षात ठेवण्याची गोष्ट म्हणजे कित्येक वेळा प्रेक्षकाच्या तोंडून खेळाडूंना न साजणारीं वाक्यें बाहेर पडतात. तीं बातमीदाराला समजलीं तरी त्यांचा निर्देश मुळींच करून चालणार नाहीं. खेळासंबंधींची बातमी देताना खेळाडूंचीच वृत्ति आंगीं बाणली असेल तर उत्तम.

पिंग–पॉंगची तऱ्हा थोडी वेगळी पडते. तो खेळ पाहण्यास मंडळी फार जमूं शकत नाहींत. म्हणून वाचकाना त्याचें सविस्तर वर्णन घेऊन काय करावयाचे असतें ? पण एक दोन ओळींतच संभावना करण्यासारखे हे खेळ वगळता येत नाहींत. ‘ बॅडमिंट्न् ’ चा उल्लेख अशा पैकींच. त्याला महत्त्व तसे फारसें नाहीं. परंतु स्त्रिया खेळ खेळतात, तेव्हां पुरुषाना व स्त्रियानाही त्यात कौतुकमिश्रित उत्सुकता वाटते. म्हणून खेळाचे फार विस्तृत पुराण न सागता तत्संबंधी बातमी थोडक्यात देता येते. मात्र प्रत्येक प्रकारची गणना ( स्कोअर ) कशी करतात, हे नीट ठाऊक असलें पाहिजे.

इंग्रजी पद्धतीचा आणखी एक बैठा खेळ हल्लीं इतका बोकाळला आहे कीं त्याचा उल्लेख टाळणें शक्य नाहीं. ‘ कॅरम ’ ( म्हणजे विलायती टिचकीपाणीचा प्रकार? ) सध्या लोकप्रिय असल्यानें तत्संबंधीं बातमी द्यावी लागेल. “ मला स्वतःला त्यात गोडी वाटत नाहीं, ” अशा प्रकारची सबब बातमीदाराला सागता येत नाहीं. वाचकाना त्यात गोडी असली म्हणजे झालें. बातमीदारानें, स्वतःत नसेल तर ‘ गोडी ’ उत्पन्न केली पाहिजे. ‘कॅरम’च्या सामन्यांची नोंद व विशेष निपुण असलेल्याच्या खेळाचें वर्णन थोडक्यात द्यावें लागेल.

वेळ प्रसंग पाहून बातमीदाराला आपली विद्वत्ता प्रकट करण्यासही अवसर मिळतो. अशा इंग्रजी खेळांत वाकब कोण होऊं शकतो, तो कां, त्या खेळाची लोकप्रियता वाढत आहे हे चागलें कां वाईट, तें तसें कां, असे किती तरी विविध चर्चात्मक प्रश्न उपस्थित करून वाचकांना नवी माहिती देऊन, त्यांना विचार करावयास लावतां येतें. पत्राचें धोरण असेल त्या मानानें ‘ विलायतेला पैसा फार जातो ’ म्हणून ओरडही करतां येईल किंवा, ‘जनमनावर पाश्चात्यांचा

पगडा मनस्वी बसूं लागला, आपणांकडील खेळ सुद्धां त्यांना आवडत नाहींत, अशा प्रकारची टीका माहिती देऊन करता येते. पण या सर्व बाबींत एक मुख्य गोष्ट ती ही कीं, ' खेळ खेळाडूं ' कडे वर्तमानपत्रांना लक्ष हें दिलेंच पाहिजे. लोकांत कुतूहल असतें तें संपादकीय इच्छेमुळें नाहींसें होईल असें नव्हे.

' बुद्धिबळा ' च्या डावाला आरंभीं थोर थोर पत्रेंही स्थळ देत असत. क्रीडानैपुण्य संपादण्यास त्यानें मदत होते खरी; पण अलीकडे त्या बाजूनें अंधःकार पसरूं लागलेला दिसतो. बुद्धिबळाच्या सामन्याचे निकालच तेवढे वर्तमानपत्रांत चमकतात. त्या ऐवजीं दोन्ही गडयांचे ' डाव ' सांगितल्यानें प्रत्येक खेळाडूला तसे घरीं खेळून पाहतां येतील. आणि म्हणूनच बुद्धिबळाचे डाव वर्तमानपत्रांतून समजावून सांगणे, ही नेहमींच्या बातमीदाराला साधणारी गोष्ट नव्हे. चित्रें काढून त्याची एक लेखी परिभाषा ठरवावी लागते. तसें करण्याचा विचारच कोणी करत नाहीं. परंतु नवे नवे डाव सुचवून, वाचकांना सोडविण्यासाठीं ( बक्षिसाच्या लालचीनें ) डाव लिहून, वर्तमानपत्राचा खप वाढवितां येतो. बुद्धिबळ हा मूळचा पौर्वात्य खेळ अशी आम्हीं आज पोकळ बढाईच मारावी. कारण आज तागायतही नित्य नवे नवे डाव सुचवून वाचकांना खाद्य पुरविणारीं पत्रें इंग्लंडमध्यें आहेत, तितकीं देखील मराठींत नाहींत. लंडनमध्यें राजकीय बाबतींत अग्रगण्य अशांपैकीं पत्रांतही बुद्धिबळांचे डाव येतात. पण आमचेकडे मात्र सार्वत्रिक औदासिन्य. बाकी हा दोष संपादकाचा आहे. बातमीदारांचा नव्हे.

देशी खेळात कुस्तीला अधिक महत्त्व द्यावें लागेल. हा खेळ सर्वांत प्राचीन कालापासून चालत आला असल्यानें व अडाणी लोकांना सुद्धां त्यांत मौज वाटते म्हणून, कुस्त्याची दंगल पाहण्यास भयंकर गर्दी जमते. तेव्हां कुस्ती कोणाकोणाची, पैलवान राहणारे कुठले, त्यांची आजपर्यंतची कीर्ति, वगैरे पुष्कळ माहिती लिहिता येते. ऐन कुस्तीच्या वेळीं सुद्धां वर्णनांत ताजेपणा यावा म्हणून तेथील वातावरणाचा परिणाम बातमीपत्रांत दिसला पाहिजे. पंच कोण होते, कुस्तीला प्रारंभ कसा झाला, कोणाची पाठ कशी टेकली, ( किती 'मुंडया चीत ' झाला ) ह्या बाबींची नोंद अवश्य हवी. त्यामुळें कुस्तीचा खरा निकाल कळेल. बक्षिसाची रकम दोघात वाटली असल्यास तसें लिहावें लागेल. बारीक

सारीक बाबींशीं वाचकांना कांहीं करावयाचें नसतें. परंतु 'गमती' म्हणून त्यांना वेगळें स्थान असतें. सर्व बातमी लिहून झाल्यावरच ह्या गमतींना अधिक महत्त्व.

साघिक खेळांत आटयापाटया, खोखो, हुतुतू यांचा उल्लेख येईल, पण मराठी वाचकांना त्यात विशेष राम वाटत नाहीं. नाहीं तर, 'सूर' धरण्यांत अट्टल कोण, कोंडी कोणाची फोडणें कठिण असतें, कसलीही कोंडी 'पडून' फोडण्यांत वस्ताद कोण आहे, इत्यादि किती तरी वाचनीय बाबींचा उल्लेख करता येतो. पण वाचकांना त्यात विशेष आवड नाहीं म्हणून म्हणा किंवा संपादकांना त्याची महति पटत नाहीं म्हणून असेल, नुसते सामने झाले, अमुक संघ यशस्वी झाला, या पलीकडे अधिक निर्देश कोणी करीत नाहीं.

खोखो किंवा हुतुतूंत आटापाटयाच्या डावाइतकी रमत नसते खरी. पण तेही डाव बरेच रंगतात. शाळेंतलीं मुलें किंवा मुलींसुद्धा हे खेळ खेळतात, तेव्हां त्यांचें कौशल्य कौतुकास्पद वाटतें. शाळेच्या वार्षिक संमेलनाचे वेळीं असे पुष्कळ खेळ होतात. त्याचीही बातमी द्यावी लागते. पण बहुधा यादी करण्यापलीकडे कुठलाही बातमीदार त्यांत अधिक लक्ष घालीत नाहीं. वास्तविक हे प्रकार पुष्कळ मनोरंजक व उपयुक्त करतां येतात. समजा, १०० यार्ड धावण्याची किंवा उंच उडीची शर्यत असली आणि तींत एकादा निपुण गडी फारच जोरानें धावून अल्पावधींत पहिला आला, किंवा त्याच्या स्वतःच्या उंचीच्या ( व वजनाच्याही ) मानानें त्यानें अधिक उंचीवरून उडी मारली असेल, तर हें सर्व विवेचन बातमीदारानें केलें पाहिजे. निदान आपल्याकडील वाचकाना माहीत नसलेल्या गोष्टी कळाव्या म्हणून तरी, पाश्चिमात्त्यांची या क्रीडाक्षेत्रांतली प्रगति ( म्हणजे त्यानीं साध्य केलेले वेग, उंची, लांबी, वगैरे ) सागतां येते. अशा निर्देशावरून बातमीदाराचें वाचन दाडगें असल्याची किंवा त्याची दृष्टी व्यापक असल्याची खात्री वाचकांची होणार नाहीं काय? आतां, ह्या सर्व अधिकृत माहितीचा संग्रह कसा करावा, ती कोठें मिळेल, या अडचणी बातमीदारानें तरी सांगू नयेत. कारण इंग्रजींत अशा प्रकारची सालोसाल माहिती देणारीं किती तरी पुस्तकें बाहेर पडत असतात.

ह्याच प्रकारें आणखीही पुष्कळ खेळाचें किंवा शर्यतींचें वर्णन करता येतें. ठराविक पद्धतीनुसार नुसतीं नावें देण्याची रीत मधून मधून टाळल्यास काहीं बिघडावयाचें नाहीं. त्यात प्रात्यक्षिक अनुभूतीचा अंश आहे असें वाचकास वाटलें पाहिजे, अशा रीतीनें प्रत्येक बातमी लिहावी. असो.

मल्लखांब, लांब अथवा उंच उडी, बांबू उडी, दांडपट्टा, फरी–गदगा असे विविध पण एकाकी पराक्रमाचे प्रकार आहेत. त्यांचा समाचार थोडक्यांत घेतां येतो. लेजिम, लाठी, जोडी वगैरेचे हात होतात, तेव्हां किंवा साधी कवाईत करतात तेव्हाचें वर्णन थोडक्यातच आटोपावें लागतें. मात्र कुठलाही प्रकार सविस्तर वर्णन करून चालणार नाही. कारण त्यामुळें ते लिखाण कंटाळवाणें होईल. विस्तृत पुराण तर नाहीं, पण काय काय कार्यक्रम घडला याची साधारण कल्पना तर वाचकास आली पाहिजे, अशा बेतानें लिखाण लिहावें. सहानुभूति देशी खेळांकडे अधिक ठेवावयाची कीं कसें, विलायती खेळावर बहिष्कार घालावयाचा कीं काय, या गोष्टी अर्थातच संपादकीय निर्णयावर अवलंबून असतात. त्याची चर्चा येथें नको. चागलें क्रिकेट कशाला म्हणतात, गोलंदाजीचें श्रेष्ठत्व कशावर अवलंबून असतें, टेनिस मधील कौशल्य कसें कळतें, मल्लखांबांतील अवघड उडी कोणती, खेळाडू 'ग्रेसफुली' खेळतो असें कशाला म्हणतात, क्रीडापटु 'ग्रेसफुल्' खेळलाच पाहिजे कीं काय, वगैरे पुष्कळ गोष्टी बातमीदारास ठाऊक असल्या पाहिजेत. कुस्तींत कोणीं पेंच कसा घातला, फुटबॉलमध्यें 'फॉल्ट' कां झाला, ह्या बारीक सारीक बाबी कळल्या म्हणजे ठीक. बातमीदारास ह्या सर्व निरनिराळ्या बाबींची ओळख अशासाठीं असावी लागते कीं, खरें कौशल्य कुठें आहे, वास्तविक नैपुण्य कुणी दाखविलें, तारीफ कुणाची करावी, हें सकारण सांगतां आलें पाहिजे. कारण त्या त्या खेळाडूची श्रेष्ठता ठरविण्याचें साधन असें कांहींच नसतें. शिवाय शाळा कॉलेजें वगैरेंतील खेळाचें वर्णन लिहितांना × × शाळेपेक्षां × × × शाळेंतील विद्यार्थ्यांनीं चांगले हात करून दाखविले असें वैयक्तिक तुलनेचे प्रसंग टाळावे. 'साधिक' सामने होतात, तेव्हां कोण चांगला व कोण वाईट खेळला याचा निर्णय ताबडतोब लागला तरी, त्यावरून कोणा एका खेळाडूचें श्रेष्ठत्व प्रस्थापित होत नाहीं.

वैयक्तिक क्रीडानैपुण्याची अशी तुलना केल्यानें आपसातील अहमहमिका अनिष्ट प्रकारानें वाढते. बातमीदाराला वास्तविक अशी नसती तरफदारी करण्याचें कारण नाहीं. मात्र कुस्तीचें वर्णन लिहिताना ठिकठिकाणच्या तालीमबाजांचें वैशिष्ट्य सागावें. कर्नाटकांतील पैलवान कुस्ती कां जिंकतात, पंजाबी मल्लाना धिप्पाड शरीरयष्टीचा फायदा कसा मिळतो, फार ताकद नसतां केवळ पेचावरच कुस्ती जिंकणारे मल्ल कुठले, अशा विवरणात्मक लेखामुळें वाचकाची वाचन विषयक गोडी वाढते; आपलें निरीक्षण व ज्ञान अनायासें प्रकट होतें. अशा किती तरी प्रकारें वैयक्तिक निर्देश टाळून विवेचनात्मक लिहितां येतें. नामांकित खेळाडूंशीं एकमेकांची तुलना करण्यास हरकत नसते. पण तें सुद्धां जपूनच लिहावें. लिहिण्याचा भरात कलमाचा फटकारा अधिक पडण्याचा संभव असतो. नवशिक्यानें अशी नसती जबाबदारी सहसा घेऊं नये.

खेळ खेळाडूंच्या ह्या प्रकरणांत मुख्य अडचण म्हणजे पारिभाषिक शब्दाची. विशेषतः इंग्रजी खेळाचा प्रसार अलीकडेच आमचेकडे झाला असल्यानें आणि देशी वृत्तपत्रात त्यांना स्थान तर नुकतेंच मिळूं लागल्यानें, ती परिभाषा अद्याप तयार जाहली नाहीं. कारण खेळाडू अशा भाषाशुद्धीच्या विचारात पडतील कशाला ? इंग्रजी असो किंवा दुसरी कोणतीही भाषा असली, तरी खेळाडूंच्या नैपुण्याला त्यामुळें कसलाही बाध येत नसल्यानें, या क्षेत्रातील पारिभाषिक शब्द बनविण्याचें काम बातमीदारावरच पर्यायानें पडतें. परिभाषा बनली नाहीं म्हणून लिहिणें मात्र अजीबाद टाळतां येत नाहीं. परिभाषा तयार नसल्यास असेल त्या रूढ शब्दावरच काम भागवावें लागतें. आणि भाषाशुद्धीचा ‘ सावरकरी ’ आग्रह धरूनही चालत नाहीं. एकाच दिवशींच्या वर्णनात सर्व शब्द एकाएकीं बदलल्यास, तें सर्व लिखाण छापलेले कागद, चिवडेवाल्याच्याच उपयोगी पडतील. म्हणून दर मोसमाला दोन चार किंवा पचनीं पडतील तितके शब्द रूढ करीत जाणें हा मार्ग श्रेयस्कर. ‘ धावा ’ ‘ बाद ’ ‘गोलंदाज’ हे शब्द जुने असले तरी ‘ त्रिफळा ’ हा अगदींच नवा आहे कीं नाहीं ? हळू हळू तो रूढ होईल यांत शंका नाहीं. पण सर्वच शब्द एका फटकाऱ्यासरशीं बदलून टाकावे हा आग्रह क्रीडांगणावरील परिभाषाचे बाबतींत तरी चालणार

नाहीं. हें क्रिकेटच्या परिभाषेबद्दल झालें. फुटबॉल, हॉकी, टेनिस वगैरे खेळां-चीही हीच अडचण आहे. परंतु वर्णन असें क्रिकेटचेंच अधिक विस्तारानें लिहितात म्हणून क्रिकेटच्या परिभाषेला महत्त्व साहजिकच येतें. खेळ – खेळाडूंची बातमी लिहिणाऱ्या पत्रपटूंवर ही एक अगदींच नवी अशी जबाबदारी येऊन पडते. इतर निरनिराळ्या क्षेत्रांतील परिभाषा ठरविण्यास तज्ञ येतील किंवा पुष्कळ बाहेरचे लोकच नवे नवे शब्द सुचवितील. तसें क्रीडाक्षेत्रांत होत नाहीं. बातमीदारानेंच वेळ प्रसंग पाहून आपली शब्द बनविण्याची भट्टी चालू ठेवावी.

सरते शेवटीं पंचांच्या निर्णयाबद्दल व आणखीही खेळाडूंना न शोभणारें वर्तन कित्येकांचे हातून घडतें त्याविषयीं उल्लेख करून हें प्रकरण संपवूं. पंचांचा निकाल देव वाक्य ( वेद वाक्य ) मानून तो ताबडतोब मान्य करण्यास शिकणें सर्वांच्याच फायद्याचें आहे. व पंचसुद्धां माणसांपैकींच एक असल्यानें त्यांच्या हातून चूक ही होणारच. परंतु पंचांविषयीं ( म्हणजे त्यांनीं दिलेल्या निर्णयाविरुद्ध ) चुकून सुद्धां अनुदार उद्गार कोणीं काढल्यास त्याबद्दल बोलणारांना दोष द्यावा. तद्वतच एकमेकांविषयीं आपसांतील कुजबुजणीं बातमीदाराला कळलीं तरी तीं पडद्या आडची बाब म्हणून सोडून द्यावी पुष्कळ वेळां पक्षाभिमान अगदींच वेगळ्या थराला जाऊन बारीक सारीक बाबतींतही सवतीची संशयी वृत्ति दिसून येते. ही गोष्ट क्रीडांगणावर मुळींच शोभत नाहीं आणि क्रीडापटूंना आवडतही नाहीं. पण कशामुळें तरी – म्हणजे देवापेक्षां भगतांचा मानापमान फार नाजुक असतो म्हणून – विकार भडकतो व गर्हणीय असे उद्गार तोंडांतून बाहेर पडतात. तेव्हां या सर्व बाबी त्याज्य समजून त्या वर्तमानपत्रांत आणूं नयेत.

प्रकरण तेरावें

# मुलाखती

वर्तमानपत्राचा संपादक सर्वज्ञ म्हणून मिरवितो आणि वर्तमानपत्रांतील माहिती पाहून कोणाही वाचकाला तो सर्वज्ञ असावा असें वाटतें. कारण वाटेल त्या विषयावर माहिती देणारा लेख वर्तमानपत्रांत आपण पहातों. चलनी नाण्याचा किंवा हुंडणावळीसारखा अर्थशास्त्रीय वाद असो; भूकंप वारंवार जपानमध्येंच कां होतात हा प्रश्न उपस्थित होवो; मोहांजादारो येथील पुराण्या अवशेषांवरून सांस्कृतिक इतिहासाची चर्चा करण्याचा प्रसंग येवो; इंग्लंडच्या गादीवर, हल्लींच्या युवराजानें लग्न केलें नाहीं तर मग हक्क कोणाचा हा वाद माजो,...... वाटेल तिथले आणि वाटेल त्या प्रकारचे प्रश्न लोकांपुढें उभे राहोत, संपादक तत्संबंधीं माहिती वर्तमानपत्रांतून वाचकांना पुरवितो. आणि ती मिळविण्यास आपल्या हाताखालील बातमीदारांना त्या त्या विषयावरील तज्ञांची ‘ मुलाखत ’ घेण्यास पाठवितो. मुलाखत घेणें ही अभिनव पत्रपटूंना सांगण्याची कामगिरी नसून कांहीं काळ मुरलेल्यांनाच त्या ‘ मोहिमे ’ वर पाठवितात. मुलाखती घेण्यांत पत्रपटूंचें कौशल्य कसाला लागतें. पण तत्संबंधीं प्रात्यक्षिक शिक्षण मात्र मिळूं शकत नाहीं. सभा-संमेलनें किंवा कोर्टांतील कामकाज कसें रिपोर्ट करावें याविषयीं सूचना कोणांबरोबर जाऊन मिळूं शकतील. पण मुलाखतीचें तसें नाहीं. म्हणून मुलाखत घेण्याचें हें स्वतंत्र प्रकरण केलें.

नुसते वाद माजतात म्हणूनच मुलाखतींची आवश्यकता भासते असें नाहीं. राजकीय प्रश्नांवर वेगवेगळीं मतें पडतात. तेव्हां कुणाचा कल कुणीकडे झुकला आहे हें समजण्याची आतुरता वाढते. कोणी मोठा पुढारी आपल्या शहरांत आला तर त्याला आपल्या शहराविषयीं काय वाटतें हें जाणण्याची प्रत्येकाची इच्छा असतेच. आपल्या घरींही पाहुणा आला तरी आपण त्याला ‘ आमचा गांव तुम्हांला कसा काय आवडला बुवा ? ’ हा प्रश्न टाकतो. तशांतलाच हा थोडा बहुत प्रकार असल्यानें कोणी अतिथि-विशेष आपल्या शहरीं आले

तर त्यांची मुलाखत घेण्याचा प्रघात पडला आहे. विलायतची वारी करून कोणी शिष्ट आले, कीं त्यांना तिकडील परिस्थितीसंबंधाने काय वाटतें किंवा इकडे झालेल्या राजकारणाविषयीं त्याचें काय मत आहे, तें लोकापुढें माडण्यासाठी मुलाखती घ्याव्या लागतात. इतर बातम्या मिळविण्याकरितांही मुलाखतींचा अवलंब करणें क्रमप्राप्त होतें. समजा, काबूलमधील नादिरशहाच्या खुनाची बातमी सविस्तर आली नाहीं. तेव्हा काबूलहून येणाऱ्या मडळीपैकीं कोणाला तरी गांठून त्याचेकडून मिळेल तेवढी माहिती 'काढावी' लागते. किंवा सयाममध्यें माजलेल्या बंडाळीचे काहींच कारण समजत नाहीं. तेव्हा तिकडून येणाऱ्या मुशाफराची भेट घेऊन सयामच्या अंतस्थ परीस्थितीवर थोडा अधिक प्रकाश पाडतां आल्यास उत्तम. इतकेंही दूर नको, कुठें आग लागली, मोटारींची टक्कर झाली, गाडी उलटली, कोणाचा खून झाला, त्याची सविस्तर माहिती मिळविण्यासाठी त्या त्या प्रसंगीं हजर असणाराना भेटून काहीं प्रश्न विचारून पुष्कळच न कळलेली माहिती आपणाला मिळते. शाळा-कॉलेजातील विद्यार्थ्यांचा संप झाला, दोन्हीं पक्षाच्या पुढाऱ्याची – विद्यार्थ्यांच्या म्होरक्याची व शाळा-कॉलेजातील मुख्याधिकाऱ्याची – मुलाखत घेणें इष्ट ठरते. कोणी मोठ्या व्यापाऱ्याने दानधर्मासाठीं पुष्कळशी रक्कम वेगळी काढून ठेविली, तर त्याचा हेतु, विनियोग करण्याची पद्धत इत्यादि माहिती जनतेला सागण्यासाठीं त्याची किंवा त्याच्या निकटवर्ति जनाची मुलाखत घेणें सोईचें होतें. अशा एक ना अनेक वेळा मुलाखतीस जाण्याचा प्रसग बातमीदारावर येतो – नव्हे, बातमीदार स्वतःस असलेल्या पत्रपाडित्याच्या 'व्यसना' मुळें मुलाखतींत ओढला जातो.

आणखीही एका हेतुसाठीं मुलाखतींचा उपयोग करतात. कुठल्याही शास्त्रीय अथवा वादग्रस्त मुद्द्यावर तज्ञाचीं मतें मागवून किंवा त्याच्या नांवानें लेख प्रसिद्ध करून संपादक लोकात ज्ञानप्रसार करतो व लोकमत बनविण्यास मदत होते. तज्ञांची मुलाखत त्याच्या नावचा लेख म्हणून छापतात. कारण अशा शास्त्रीय तज्ञांना लेख लिहिणें शक्यही नसतें आणि किंवा त्याना तें साधतसुद्धां नाहीं. तेव्हां मुलाखत उपयोगी पडते. म्हणजे बातमीदार पाहिजे तेवढेंच नेमके प्रश्न विचारून तज्ञांना लेखनाच्या पेचांतून सोडवितात. कारण लेख

लिहिताना विषयाची मांडणी करण्याचें किंवा त्याची परिमिती ठरविण्याचें काम लेखकावरच पडते व विविध कार्य–व्यासत्वामुळें तें त्याना सहजासहजीं साधतही नाहीं. पण मुलाखतींचें तसें नाहीं. फक्त नियमित प्रश्नांना जबाब देणें एवढेंच काम त्याना करावें लागतें. बाकीची सर्व जबाबदारी मुलाखत घेणारावर पडते. मोठमोठे डॉक्टर, गवई, नट किंवा साहित्यक्षेत्रात पदार्पण न केलेली अशी कार्यकर्ती पुष्कळ मंडळी असतात, कीं त्यांचे विचार, त्याचीं मते, त्याचा उपदेश, मुलाखतींच्या रूपानेंच जनतेला ऐकावयास मिळतो. राजेरजवाड्याचेही बहुशः असेंच असतें. त्यांच्या नावानें लेख सहसा प्रसिद्ध होत नाहींत. त्याचीं मतें मुलाखतीच्या रूपानेंच बाहेर पडतात. पण अशा खास कामगिरीवर खास बातमीदार अथवा ‘ संपादकीय ’ वर्गांतील ‘ प्रतिनिधी ’ म्हणून कोणी जातात. म्हणून तत्संबंधीं अधिक चर्चा येथें नको.

मुलाखतीची पहिली तयारी म्हणजे वेळ ठरवून घेण्याची. व्यक्ति ज्या मानानें मोठी त्या मानानें तिचा व्यापही मोठाच असतो. तेव्हा आधीं चिठ्ठी पाठवून कोण, कशाकरतां येतो, किती वेळ घेणार, हें कळवावें. आणि केव्हा येऊं तें कळविण्यास सांगावें. वेळ असेल त्या मानानें टेलिफोननेंसुद्धा हें काम करतां येतें किंवा अचानक गांठूनही पूर्वसूचना न देता, प्रसंग तसाच आकस्मिक असेल तर, मुलाखत घेण्यास हरकत नसते. परंतु मुलाखतीचा आपला राजमार्ग वर सांगितला तो. शक्य असल्यास आपण विचारणार असणाऱ्या प्रश्नांची लेखी प्रतही पाठवावी. पण असें करण्यापूर्वी आपणास त्या व्यक्तीच्या स्वभावाची नीट माहिती असली पाहिजे. नाहीं तर, प्रश्न पाहूनच कित्येक जण बिचकून जातात आणि मग त्याचें दर्शन होणें सुद्धां मुष्कील होतें. ते युक्ती प्रयुक्तीनें बातमीदाराला टाळण्याची खटपट करतात. पण त्यांनाही तोंड उघडावयास लावणें बातमीदाराच्या हातीं असतें. ते कसें तें पुढे पाहूं. आधीं वेळ ठरवून घेतल्यानंतर ठराविक वेळीं तेथें जाऊन त्याना गाठणें हें बातमीदाराचें मुख्य काम. बंगला सापडण्यास पंचाईत पडली, रस्ता बंद होता, टांग्याचा घोडा बुजला, सायकल पंक्चर झाली ...अशा कुठल्याही सबबी न सांगतां ठरलेल्या वेळेच्या आधीं फक्त एकदोन मिनिटें – शक्य असल्यास अगदीं ठराविक क्षणास – तेथें जावें. आपल्या नांवाच्या

पत्रिका ( व्हिजिटिंग कार्ड्स् ) बरोबर न्या व त्यांचा उपयोग करा असें सांगण्याची आवश्यकता दिसत नाहीं. परंतु ज्याला भेटावयास जावयाचें त्याच्या स्वभावाची पूर्ण ओळख असल्याविना **फौंटन पेन्, पेन्सिल, कागद वगैरे लेखन साहित्य खिशांतून बाहेर न डोकावेल अशाच रीतीनें ठेवावें.** मुलाखत देणारे कांहीं लोक त्याला फार बुजतात. म्हणून होतां होईल तों त्यांचा उपयोग त्याच्या देखत करावयाचा नसतो. पोषाखाच्या बाबतींतही थोडीशी खबरदारी बाळगावयास पाहिजे. ' देवीदास–लक्ष्मीबाई ' विवाहाविषयीं महामहोपाध्याय श्रीकृष्णद्वैपायनाचार्य याना भेटावयाला जावयाचें तर बूट सूट काय कामाचा ? बूट घालून बसण्याची सोय त्याचे ' आश्रमीं ' नसावयाची हें तर खरेंच; पण अशा धर्मनिष्ठाना ' साहेबाळलेल्या 'शीं बोलण्यास संकोच वाटेल; त्यांच्या जिभेला पान्हा फुटणार नाहीं हें मुख्य. आणि मग मुलाखतीचा प्रयत्न निष्फळ व्हावयाचा. म्हणून ब्राह्मणी थाटांत कपाळभर गंध लावून गेलेलेंच चागलें. त्याच्या उलट, एका पोलिस अधिकाऱ्याची गांठ घ्यावयास जाताना गाधी टोपी व खादी ड्रेस असेल, तर द्वारपालच पुढें जाऊं देणार नाहींत. परंतु साहेबी थाट असल्यास कसलीच पंचाईत पडणार नाहीं. या सारासार विचाराचा विपर्यास करून, बातमीदारानें कुठलेंही तत्वनिष्ठ आचरण करूं नये, वारा येईल तशी पाठ फिरवावी, असा माझ्या सांगण्याचा अर्थ करूं नये. सर्वच मंडळींना तत्वनिष्ठ होणें साधतें असें नाहीं. रहावयाचें असेल त्यांनीं रहावें. अशा तत्वनिष्ठेच्या जोरावरच खादीचे कपडे असूनही पोलिसाच्या वरिष्ठाला भेटतां येतें, – वाटेल तितक्या वेळ बोलून पाहिजे तशी मुलाखतही मिळते – हें स्वानुभवानें मी सांगतों. कपड्यावर आणि व्यवस्थितपणावर भर दिला तो यासाठीं कीं,

Apparel oft proclaims the man

हें जुन्या काळचें सुभाषित आजही खरें आहे. आपणाबद्दल मुलाखत देणाऱ्यांचें सकृद्दर्शनीं मत बनेल, त्यावरच पुष्कळसें अवलंबून असल्यानें, होता होईल तो मत बनेल चांगलें बनावें, म्हणून खटपट होईल तितकी करावयाची. अल्पावकाशांत एकमेकाबद्दल काय तें मत बनत असतें. प्रत्येकाच्या अंगचे भाराभर सद्गुण किंवा मनांतील विशुद्ध भाव स्पष्ट होण्यास तेव्हां अवसर मिळणार कसा ?

म्हणून पोषाखाची आणि नीटनेटकेपणाची महती अधिक विस्तारानें सांगण्याची जरूरी दिसत नाहीं. मात्र छाकटेपणा किंवा छचोरपणा म्हणतात, तो नीटनेटकेपणाहून अगदीं निराळा असतो. आणि सर्व साधारण मंडळींना तर तो नकोसा वाटतोच; पण खुद्द छाकटयांनासुद्धां दुसऱ्यांनीं छाकटेपणा केलेला आवडत नाहीं, ही गोष्ट लक्षात ठेवावी.

औपचारिक अभिवादन होतांच आपल्या मुद्दयाला हात घालावा. बातमीदार गप्पिष्ट आहे, गप्पा छाटण्यास त्याला ठेवून घेतल्यास हरकत नाहीं, अशी चुकूनसुद्धा समजूत होण्यास थोडाही अवसर देऊं नये. प्रश्न नेहमीं मुलाखतीच्या आधीं कागदावर लिहून त्यांचा क्रम ठरविलेला असावा. कोर्टांत पुरावा जमवितांना वकिली प्रश्न विचारून साक्षीदारांकडून फक्त "होय" किंवा "नाहीं" एवढेंच उत्तर मिळवितात, तो प्रकार होता होईल तो टाळावा. प्रश्न विचारल्यावर त्याचें उत्तर निदान दोन तीन वाक्यांत मिळालें पाहिजे, अशा रीतीनें ते विचारावे. उत्तर मिळेल तें **ताबडतोब लिहून घेऊं नये.** स्मरण शक्तीवर विसंबण्याइतका आत्मविश्वास यासाठीं पाहिजे. परंतु मुलाखत घ्यावयाची ते गृहस्थ मुरलेले पुढारी असतील किंवा सार्वजनिक कार्यक्षेत्रांत चांगले वावरलेले असतील, तर त्यांच्यादेखत सर्व लिहून घेण्यास हरकत नसते. फार काय, ते आपण होऊनच सांगतील कीं "लिहून घ्या." इतकेंच नव्हे, तर अगदीं महत्त्वाच्या प्रसंगीं वादग्रस्त बाबींची चर्चा चालते, प्रत्येक शब्दातील अक्षरावर भिस्त असते, तेव्हां मुलाखतीची कच्ची प्रत तेथल्या तेथें करून मुलाखत देणाराला वाचून दाखवून त्याची सही घ्यावी लागते. कारण त्या विधानामुळें एखादे वेळीं भलतीच खळबळ माजावयाची आणि कदाचित् हें प्रकरण कोर्टातही जाईल असा प्रसंग येतो. शिवाय, बातमीदारावर दोष लादणें अशा (थोर) मंडळींना फार सोपें पडतें. नवशिका, अर्धवट, पढतमूर्ख असा वाटेल तो अहेर पत्रपट्टूंना देऊन ते मोकळे होऊं शकतात. आणि कित्येक वेळीं तर मी मुलाखतच दिली नाहीं असें म्हणण्यापर्यंत त्यांच्या धीटपणाची तयारी असते. यासाठीं मुलाखत विशेष खबरदारीनें व जपूनच घेतली पाहिजे. मुलाखतींत कोणा व्यक्तीबद्दल किंवा संस्थेविषयीं (अनुदारपणाचीं) विधानें असलीं अथवा कांहीं आरोप

केले असतील तर आपल्या वरिष्ठाचा त्याविषयीं **सल्ला घेतल्याविना ते कधींही लिहूं नयेत.** कारण लिहिणे कितीही सोपें असलें तरी न्यायालयांत तसले आरोप सिद्ध होणें फार मुष्कील असतें. आणि विधान करणारा उपरणें झाडून " मी नाय बा " म्हणायला केव्हांही तयार असतो. कोर्ट कचेरींतील बातमी लिहितांना खबरदारी बाळगावी लागते, तशीच काहीं अंशानें मुलाखतीं-तील वैयक्तिक निर्देशासंबंधींही घेणें जरूर आहे.

मुलाखतीस गेल्यावर प्रथमतः आसपासच्या वस्तूंचें निरीक्षण करणें श्रेयस्कर होईल. मुलाखत घ्यावयाची ती व्यक्ति, समजा, लष्करी खात्यातली असली व विषयही हडेलहप्पी पैकींच असेल, तर त्याच्या दिवाणखान्यांत लष्करी वाता-वरण निर्माण करणाऱ्या वस्तू डोळ्यातून निसटूं देता कामा नये. कुठल्या तरी लढाईचे मोठें तैल चित्र, नेपोलियनचा पुतळा, टेबलावर पितळी बॉबशेलची आवरणें, तोफेसारखी दौत, काडतुसाच्या पोकळ नळ्याची केलेली माळ, अशा अनेक वस्तू पाहून लष्करी जीवनाची आठवण होईल. तें सर्व सूक्ष्म दृष्टीनें पाहून मुलाखत लिहितांना त्याचा उपयोग केल्यास, लेखन परिणामकारी झाल्यावाचून खास राहणार नाहीं. त्या व्यक्तीचें थोडक्यात शब्दचित्रही काढतां आलें पाहिजे. म्हणून निरीक्षण त्वरेनें व अचुकपणें करता येणे ही कला बातमीदाराने साध्य करावी. तसेंच आपण ज्याच्याशीं बोलतो, त्याच्या डोळ्याला डोळा भिडविल्यानें मुलाखत यशस्वी होते. नाहीं तर ' दृष्ट्वा दृष्टि-मधो ददाति ' अशा प्रकारची ' नवोढा प्रिये ' ची वृत्ति काय कामाची ? बोलणाराच्या संभाषणामुळे आपल्या मनावर परिणाम काय झाले, ते ताबडतोब व्यक्त केल्यास मुलाखत देणारा जास्ती बोलू शकेल. एखादें विधान आपणास पटलें नसल्यास तशी चर्चा करावी; प्रश्न विचारावे, पटत नाहीं, विश्वास ठेववत नाहीं, असें सागावें. म्हणजे बोलणाराचा प्रवाह सहसा थाबत नाहीं. त्यानें कांहीं कोटि केली, विशिष्ट प्रकारें एखादी गोष्ट सांगितली, तर स्वाभा-विक हास्य चेहऱ्यावर झळकले पाहिजे. त्यांच्या विनोदाबद्दल परिस्थितीच्या योग्य आकलनाबद्दल त्यांचा रास्त तो ' गौरव ' तत्काळ होणें आवश्यक असतें. " काय बरोबर बोलला आपण, " " इतकी पारख अजून कुणाला झाली नाहीं, " वगैरे वाक्यांनीं आपलें मनोगतच आपण व्यक्त करीत असतों,

तें अवश्य करावें. उगीच औपचारिकपणें बोला कशाला ? अशा विरागी वृत्तींत जाऊं नये. हा स्तुतिपाठाचा धडा नसून, योग्य आचरण करण्यास कां शिकलें पाहिजे हें सांगतांना इतकें लिहावें लागलें. *Thanks*, " क्षमस्व " " नमस्कार " इत्यादि शब्द अगदीं औपचारिक वाटले तरी ते टाळून चालणार नाहींत. जातां येताना " नमस्ते " म्हणणें, चूक झाली असल्यास *I am sorry* चा उपयोग करणें, ' प्लीज ' ची रेलचेल उडविणें, या व अशा सूचना मराठी बोलणारांना अवश्य दिल्या पाहिजेत. आपली भाषाच मुळीं ' तुसडी ' व कठोर आहे. त्यात भर मराठी एकांडेपणाची पडल्यानें दरबारी, रुबाबदार, आदबीची अशी मराठी भाषा होऊं शकली नाहीं. पण ह्या मूळ दोषावर पाघरूण घालण्यासाठीं इतर भाषातील वाक्प्रचाराचा उपयोग करण्यास कोणाचीच बंदी नाहीं. मुलाखत घेतल्यानंतरही औपचारिक समारंभाचा थोडा भाग राहतो. वेळ घेतल्याबद्दल, तसदी दिल्याबद्दल, माहिती पुरविल्याबद्दल ........... अशा अनेक कारणासाठी आभार मानण्यास आपलें काय जातें ? पण तेवढे सुद्धा करण्यास आमची मंडळी विसरतात.

एकदां मुलाखत घ्यावयाची ठरली म्हणजे त्या विषयावर चालू मितीपर्यंतची माहिती मिळवून ठेवावी. त्या वादांतील पारिभाषिक शब्दाचा नीट अर्थ ठाऊक असला पाहिजे. नाहीं तर बातमीदाराचें हंसें होतें. प्रथमतः इंग्रजी अथवा मराठी ज्ञानकोशातून त्या वादाचें स्वरूप समजावून घेऊन नंतर अगदीं ताज्या घडामोडींची माहिती जमवावी. ज्ञानकोशात आढळली नाहीं तर त्या विषयांतील तज्ञाला गाठून त्याना आपली अडचण कळवून त्यांचेकडून सर्व माहिती मिळविता येते. कधीं कधीं तर प्रश्न सुद्धा अशा अधिकारी मंडळीकडून काढून मिळतात. उदाहरणार्थ असें समजू कीं ' सैरंध्री ' चित्रपटासाठीं जर्मनींत जाऊन आलेल्या प्रभात फिल्म कंपनीच्या डायरेक्टराची — श्री. शांताराम याची — ते परत येतांच मुलाखत घ्यावयाची आहे. तर मुलाखतींत कोणते प्रश्न विचारावे ?

बातमीदाराचा सिनेमाशीं फक्त प्रेक्षक व फार तर टीकाकार म्हणून संबंध येणार. पण तेवढयानें त्या धंद्यांतील बारीक सारीक अडचणी काय असतात, त्या नाहींशा करण्यासाठीं काय करावें लागतें,

वगैरे शास्त्रीय ज्ञान त्याला कसें असेल ? म्हणून श्री. शांतारामांची मुलाखत घ्यावयास जाण्यापूर्वी कोणा तरी ' सिनेमा शास्त्र-तज्ञ ' ( नुसता प्रेक्षक-तज्ञ नव्हे ) इसमाला भेटून आपलें ' अज्ञान झांकण्यासाठीं ' झांकणें मिळवावीं व नंतर प्रश्नाची यादीही त्या तज्ञांकडूनच लिहून घ्यावी. धंद्यांतील स्पर्धा कदाचित् आड येण्याचा संभव जास्त. म्हणून फिल्म तयार करणाऱ्याचा सल्ला बातमीदारास या वेळीं उपयोगी पडणार नाहीं. पण असल्या भेदांपासून अलिप्त असणारी काहीं मंडळी असतातच. कच्चा माल पुरविणाऱ्या कंपन्या — फोटोग्राफी सामानाचे बडे कारखानदार किंवा त्याचे प्रतिनिधी — असल्यास त्याना भेटन त्याचेकडून हें कार्य सहज साधतां येतें. सिनेमाचा फैलाव होण्यांतच त्यांचा फायदा असल्यानें कोणाविषयींही पूर्वग्रह करून घेऊन त्यांचे भागणार नाहीं. तेव्हा त्याची मदत मिळवावी. जर्मनींतच कां जावें लागलें ? ही रंगीत फिल्म काढण्याची योजना हिंदुस्थानांत अधिक फैलावेल कां नाहीं ? हिंदुस्थानांतच तिचा प्रसार अधिक होईल म्हणतात तें खरें काय ? जर्मनींत सैरंध्रीबद्दल काय मत होतें ? फिल्मच्या धंद्यांत ह्या उपक्रमानें कोणते परिणाम घडून येतील ? पुनः रंगीत फिल्म काढावयाची झाल्यास जर्मनींतच जावें लागणार कीं काय ?

इत्यादि अनेक प्रश्न तुम्हाला ते तज्ञ सुचवितील. कित्येक महत्त्वाच्या गोष्टीही तुम्हांला त्याचेपासून कळतील. प्रथम रंगीत चित्रपट कधीं, कुठें व कोणी काढला ? तो कितपत यशस्वी ठरला ? जर्मनींतच ही सोय चागली का आहे ? हिंदुस्थानात तसें करण्यास कोणत्या अडचणी असतात ? इतर देशांत रंगीत चित्रपट काढण्यास अडचण कां भासते ? हिंदुस्थानांत ती अडचण का नाहीं ? वगैरे माहिती मिळाली म्हणजे, श्री. शान्तारामांना सुद्धा एक दोन प्रश्न अधिक विचारण्याचें साधन मिळेल. शिवाय ही माहिती त्या मुलाखतीच्या आधीं दिल्यानें विषयाचें महत्त्व ( व बातमीदाराचें चौफेर ज्ञानही ) वाचकांना कळेल.

मुलाखतीची सर्व मदार विचारावयाच्या प्रश्नांवर असते. म्हणून नेमके प्रश्न काढण्यातच सर्व कौशल्य आहे. हे प्रश्न कसे काढावे हें सांगतां येणें मला तर कठिण दिसतें. विषय विविध, मंडळीही तितक्याच प्रकारची, तेव्हां तत्संबंधीं निश्चित असे कोणते धडे देतां येतील ? इतकें मात्र खरें कीं वर्तमानपत्रांत

वारंवार आढळणाऱ्या निवडक मुलाखती वाचून कोणते प्रश्न विचारले असावेत याचा अंदाज करतां येतो.

प्रश्न विचारताना, त्याला "होय" किंवा "नाहीं" असा थोडक्यांत जबाब येणारे प्रश्न होता होईल तों टाळावें म्हणून म्हटलें. पण आणखीही एका प्रकारचे प्रश्न बातमीदारानें वगळले पाहिजेत. एका प्रश्नाचें उत्तर देण्यास सबंध रामायण सांगावें लागावें असे व्यापक प्रश्नही कधीं विचारूं नयेत. कारण त्यानें मुलाखत देणारा एकदम चिडतो, बातमीदाराचें अज्ञान प्रकट होतें आणि काम अर्धवट राहून विन्मुख परतावें लागतें. प्रश्न अगदीं मुद्देसूद व थोडक्यांत असावा. उत्तरही थोडक्यांत यावें. 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' असें म्हणण्याचा अवकाश, कीं ब्रह्म व्याख्यानाला सुरवात व्हावी, असें मुलाखतींत कदापि नसावें. लेखसुद्धा अधिक वाचनीय व्हावा म्हणून त्यांत खुद्द लेखक कित्येक प्रश्न उपस्थित करून त्याचीं उत्तरें स्वतःच देतात. तो हेतु लक्षात ठेवावा. "सोशॅलिझम् म्हणजे काय?" किंवा "आपणांला जपानची काय माहिती आहे?" अशा आशयाचे विश्वव्यापक प्रश्न विचारण्यात मूर्खपणाच पदरीं यावयाचा. म्हणून हा मार्ग अवलंबण्यात अर्थ नसतो. मुलाखत वर्तमानपत्रांत येते तेव्हां तींत सर्वच प्रश्न किंवा सगळींच उत्तरें दिलेलीं असतात असें नाहीं. उत्तराच्या रोखावरून प्रश्न काय असावा हें समजतें. कित्येक प्रश्नोत्तराचा सामुदायिक उल्लेख केला तरी भागतें. पण मुलाखत घेण्यास गेलेल्याला थोड्या बहुत युक्त्या ठाऊक असणें जरूर आहे. बऱ्याच वेळा सरकारी अधिकारी किंवा इतरही बडी मंडळी, वर्तमानपत्राना 'उद्योग' नाहीं, भिंतीला तुंबड्या लावण्यापैकींच त्यांचा धंदा आहे, अशा समजुतीनें पछाडलेली असतात. त्याच्याकडून सरळ मुलाखत मिळणें कठीण जातें. आधीं निरोप किंवा चिठ्ठी पाठविली तर जबाब येत नाहीं. आलाच तर नकारार्थी येतो. आणि मोठ्या युक्तीनें बातमीदारांस टाळण्याचा प्रयत्न ते करतात. तेव्हा मुलाखतीसाठीं आलों असें न दाखवितां सुद्धां त्यांच्यासमोर उभें राहूनच मग आपला हेतु स्पष्ट करावा लागतो. तेवढ्यानेंच हीं खट्ट कुळें बधतात असें नव्हे. त्यांना जालीम मात्राच लागू पडते. म्हणून सौम्य भाषेंत गोड शब्दांनीं सांगावें, कीं आपण कृपाकरून थोडासा खुलासा सार्वजनिक सोईसाठीं कराल तर उपकृत

होईन. सर्वच वृत्तपत्रांवर किंवा एखाद्या विशिष्ट पत्रांवर त्यांनीं आग पाखडण्यास सुरवात केल्यास अगदीं शांतपणें स्मित करीत म्हणावें, " हा मोठाच वादग्रस्त प्रश्न आहे. पुनः केव्हां तरी सवडीनुसार येऊन मी पाहिजे तर आपली विधानें खोडून काढीन. सध्यां मला फुरसत नाहीं. क्षमस्व." या उपरही स्वारी कांहीं टाळाटाळ करूं लागली कीं सांगावें, " माझ्याकडे × × × अशा अशा आशयाची बातमी आली आहे. जशीच्या तशी छापण्यास कांहींच हरकत नव्हती. पण म्हटलें आपणाला विचारून पहावं खरं खोटं काय आहे. आपणांला तत्संबंधीं अधिक ठाऊक असणार. आपणांला कांहींच सांगावयाचं नसेल, तर मी सक्ति कशी करूं शकेन ! आपणांला विचारावयास मी आलों पण आपण कांहींच बोलत नसल्याचें मात्र वृत्त उद्यांचे पत्रांत येईल. "

इतकें झाल्यावर बहुधा दोन चार प्रश्नोत्तरें होतील. तेवढ्यावरच काम भागवावें. किंवा आणखीही पुष्कळ गोष्टी कळल्या आहेत असें दाखवून त्यावर 'साहेबमजकुरांचें' मत मागावें. नाहीं तर, " ही बातमी सपशेल खोटी आहे, " असें सांगण्यासाठीं तरी तुम्हांला एखादें पत्रक काढावें लागेल, म्हणून विनवावें. " विनाकारण गैरसमज किंवा खोट्या बातम्या पसरतात. त्यांचें निराकरण करणें हातांत असतां, मी येऊन आधीं सर्व खाजगी रितीनें आपणास कळविण्यास आलों असतांही आपण ही संधि नाकारतां, माझा नाइलाज आहे " असें सांगून रामराम ठोकून जाण्याची तयारी दर्शवावी. मग इष्ट तो परिणाम घडून येईल असें वाटतें. परंतु याही पेक्षां कांहीं ' खट्ट ' अशीं कुळें असतात. त्यांना ' पान्हा ' सोडावयास लावणें फार कठिण असतें. अशांचे बाबतींत मुलाखतीस गेलेल्यानें काय करावें हा मोठाच प्रश्न पडतो. पण अनुभवानें पुष्कळच युक्त्या सुचतात हें कांहीं खोटें नाहीं. आत्मप्रौढीचा दोष मजवर कोणी लादणार नसेल, तर मुलाखतींतील अनुभवाची एक छोटीशी गोष्ट सांगावीशी वाटते. तीवरून मुलाखती घेतांना कसें तयार असावें लागतें याची थोडी तरी कल्पना येईल. हा मुलाखतीचा प्रसंग चितगांगमधील आहे. शस्त्रागारावर आक्रमण झालें, तो खटला चालू असतां गांवकऱ्यांवर जादा पोलिस बसविले होते. तुरुंगांत बॉंब, पिस्तुलें, गोळ्या, काडतुसें वगैरे पुष्कळ सामान पुरलेलें उघडकीस आलेलें, अशा वेळीं मी तेथें गेलों. डिस्ट्रिक्ट

मॅजिस्ट्रेटना भेटण्यास त्यांच्याच बंगल्यावर कडक पहाऱ्यांतून जावें लागलें. मॅजिस्ट्रेट म्हणाले, " आतां कांहींच रिपोर्ट करण्यासारखें राहिलें नाहीं. तुम्हाला विनाकारण त्रास पडला. तुम्ही परत जावें हें बरें " मी विचारले, " या प्रकारासंबंधींच मी आपली मुलाखत घेण्यास आलों आहे. आपणास वेळ केव्हां आहे ? " त्याचें उत्तर ठराविक आलें. " सध्या सांगण्यासारखें कांहींच नाहीं. सरकारनें एक पत्रक काढलें आहे त्यांत सर्व हकीकत आलीच आहे. "

**मी**—पण आलेली माहिती अगदींच अपुरी आहे. तींत मला पाहिजे तो खुलासा नाहीं. पांच दहा मिनिटातच मी आपणांस मोकळा करीन.

**डि. मॅ.**—वर्तमान पत्रांत आलें आहे त्यापलीकडे अधिक मी काय सांगूं शकणार ? तुम्ही तें सर्व वाचलें असेलच.

**मी**—तें सर्व कांहीं केलें. पण स्थानिक बंगाली पत्रांत कांही माहिती आली आहे. ती खरी का खोटी तें मला पारखायला नको ? आपण आजू-बाजूच्या खेडयात दौरा काढला होता. तेथील लोकांनीं आपणांपुढें गाऱ्हाणीं सांगितलीं आणि होत असलेल्या त्रासांतून सोडवा असें म्हटलें तें खरें का ? खेडवळाना त्रास कसला होता ? त्यांचीं गाऱ्हाणीं कोणत्या प्रकारचीं ? ही माहिती आपण मला दिली नाहीं, तर आहे तीवर विश्वास टाकून मला लिहावें लागेल आणि तींत तथ्य नसलें तर मग आपणास इन्कार करण्यासाठीं एखादें पत्रक काढावे लागेल. असा द्राविडी प्राणायाम करण्यापेक्षा सरळ जाऊन काम साधलें तर पहावें म्हणून मी आपणांस भेटण्यास आलों. आपणास फुरसत नाहीं हें खरें. परंतु वर्तमानपत्राचें कामही महत्त्वाचें असतें......

इतकें झाल्यावर मॅजिस्ट्रेट साहेबांनीं थोडासा खुलासा केला. खेडेगांवीं झालेल्या प्रकाराचें सरकारी वर्णन सांगितलें. " असें " " खरं काय ? " म्हणून तें ऐकून घेतल्यावर पुनः बोलणें वाढवून तुरुंगांत सांपडलेल्या बंदुका—दारू-गोळयांबद्दल विचारलें. त्यावेळीं मात्र थोडेसें वेड पांघरावें लागलें. हा दारूगोळा खरोखरच सांपडला कीं काय ? आमच्याकडील लोक तर यावर विश्वास ठेवण्यास मुळींच तयार नाहींत. कुठेंही झालें तरी ब्रिटिश सरकारची व्यवस्था इतकी ढिली राहणें शक्यच नसल्यानें, हा सर्व माल जुना पुराणा असावा अशी

कल्पना आमचेकडे पसरत आहे. हल्लीं तुरुंग आहे तेथें जुन्या काळीं काय होतें ? दारूगोळा कसल्या प्रकारचा दिसतो ? " ह्या प्रश्नांनीं पुष्कळच काम झालें. मॅजिस्ट्रेटनीं दारुगोळा कसा व कधीं सांपडला, त्याची यादी सांगितली आणि तो अगदी आधुनिक असल्याचें कबूल केलें. मी मध्येंच विचारलें कीं," इकडे तुरुंगांचे नियम कांहीं वेगळे आहेत कीं काय ? " साहेबांनीं रोख लक्षांत घेतला आणि संभवनीय असा एकच मार्ग सांगितला. ' पोलिसांना व पहारेकऱ्यांना कैद्यानी वश करून घेतलें असावें. ' ' तें शक्य नसावे ' असा माझा तर्क, रंग चढविण्यासाठी मी मध्येंच सांगितला. साहेबांनीं सबळ कारणे दाखविलीं. सर्व कैदी हिंदू आहेत. पहारेकऱ्याची बहुसंख्या हिंदूच असल्याने हें शक्य झालें असावें. " सरकारच्या शिस्तीला व व्यवस्थेला हें न शोभणारें कृत्य झालें तर " असा टोमणा मी दिला. " हो झालें खरें " असें साहेब म्हणाले – पुढेंही आणखी कांहीं प्रश्न विचारून मुलाखत संपविली.

"मुलाखत देण्याचें नाकारतात" अशी रडवी सबब घेऊन बातमीदार परत आला कीं संपादकीय पेढीवर त्याची पत उतरलीच म्हणून समजावें. आपणाला पाहिजे ती माहिती काढण्यासाठीं जरा आड रानांत शिरून वेगळ्याच प्रश्नांनीं बोलणें सुरू करणें श्रेयस्कर असतें भेटावयास जाण्यापूर्वी त्या सद्गृहस्थांच्या किंवा विदुषीच्या आवडी-निवडीचा अंदाज निकटवर्तिजनांकडून काढलेला असावा. त्याचा उपयोग असा :– समजा, कीं म० गांधींना भेटण्यासाठीं गेलात आणि तेथे महात्माजीवर आलेल्या विसंगतपणाच्या आरोपाबद्दल खुलासा विचारलात, तर अगदीं थोडक्यात तुमची बोळवण तेथून होईल. स्वतः वर्तमानपत्राचे प्रतिनिधी म्हणून तुम्ही जात असला, तरी स्वतःला विसरून मुळींच चालणार नाहीं. वरील माहितीच विचारावयाची झाली, तर थोडयाशा ( वकिली ) युक्तीनें असें म्हणावें, " बापूजी, आज इतके दिवस मी तुमचा अनुयायी आहे खरा. पण माझ्या शेजारचे लोक तुमच्यासंबंधीं असे अनुदार उद्गार काढतात तें मला ऐकवत नाहींत. वाद करावयालाही मी जातों. शेवटीं विनाकारण ह्यांच्या नादी लागलों असें वाटतें. त्याचा मला मनापासून राग येतो. पण तो दाबण्याचा प्रयत्न मी पुष्कळ करतो. त्यांच्या म्हणण्यातला आरोप एकच, कीं आपली ( गांधींची ) वागणूक नेहमी विसंगत असते. माझें कोतें ज्ञान म्हणून असेल कदाचित्, पण

मला त्याचें म्हणणें खोडून काढतां येत नाहीं. आणि त्यांचा आरोप तर ऐकवत देखील नाहीं. उलट ऐकतांच राग येतो. तर मी काय करावें ? रागावर ताबा कसा चालवावा ? राग यावाच कां मुळीं ? बरें, त्याचें हें असें मत कां आणि माझें असें कां ? ”

अशा प्रस्तावनेमुळें खरा मुद्दा दूर गेल्यासारखा वाटतो खरा; परंतु गांधीजींची मनोभूमिका समजावून घेतली तर ह्या दूर जाण्यानें फायदाच होतो हें कळेल. “मनोव्यापारांचे झगडे” हा महात्माजींचा आवडता विषय. कुठूनही वाद निघो, तेथें नेऊन भिडवावा, बापूजींच्या वाणीला स्फुरण चढलेंच म्हणून समजावें. आणि ह्या वादावरून हळू हळू त्या आपल्या “गौण” ( म्हणजे आपल्या दृष्टीनें मुख्य पण गांधीजींच्या दृष्टीनें तो गौणच ) मुद्दयाकडे यावें. स्वतःची दृष्टि थोडीशी बाजूला ठेऊन मुलाखत देणाऱ्यांच्या चष्म्यांतून तिकडे पहावें, म्हणजे कार्य सुलभ होतें. नाहीं तर एक दोन वाक्यातच गांधीजी बोळवण करतील.

नुसते अप्रत्यक्ष प्रश्नच विचारून चालत नाहीं. मुलाखत देणाराला आवडत नाहीं, अशा विषयाचा निर्देश अजिबात टाळला पाहिजे. उदाहरणार्थ बॅ. जयकराची मुलाखत घेतांना त्यांच्यावर वर्तमानपत्रात आलेल्या टीकेचा उल्लेख केल्यास आपलें काम साधावयाचें नाहीं. त्याचा विचारौघ आपण भलती कडेच नेला असें होईल. श्री. न. चिं. केळकरांशीं बोलताना महात्माजींच्या सत्याग्रह चळवळीबद्दल प्रशंसापर उद्गार काढूं नये. हे विषय निघालेच तर त्याची चेष्टा करण्यासाठीं तयार रहावें. यांत कुठल्याही तऱ्हेचें दूषण देण्याचा हेतु नसून, केवळ स्वभाव निरीक्षणानें आपलें कार्य साधण्याकडे किती लक्ष देता येतें तें सांगितलें आहे.

अप्रत्यक्ष प्रश्न विचारण्याचा हेतु उघड आहे. सरळ प्रश्न विचारला तर उत्तर होय किंवा नाहीं एवढेंच येणार. तेव्हां जेणें करून अधिक माहिती मिळेल असे प्रश्न हुडकावे लागतात. प्रे. पटेलांची स्मशानयात्रा निघण्यापूर्वी मिरवणूक कमिटीच्या सेक्रेटरींची गांठ घेऊन कोणी बातमीदारानें “ महात्माजी हजर राहणार आहेत का ? ” अशी पृच्छा केली तर, त्याला फक्त नाहीं अथवा होय एवढाच जबाब मिळेल. परंतु दुसऱ्या एकानें थोडीशी युक्ति करून

खालील प्रश्न विचारला तर वेगळाच जबाब मिळेल कीं नाहीं ?—" आमच्या नागपुरच्या बातमीदारानें आजच तार पाठविली आहे कीं कदाचित् महात्माजी मुंबईस पटेलांच्या स्मशानयात्रेस हजर राहतील आणि त्यामुळें वऱ्हाडांतील दौऱ्याच्या तारखा बदलतील. कमिटीनें त्यांना हजर राहण्यास आग्रह केला आहे. खरें का ? गांधीजी येथें कधी येणार ? "

याला उत्तर मिळेल त्यांत प्रथम कमिटीनें गांधीजींना आग्रह केला कीं नाहीं तें कळेल आणि त्यावर गांधीजींचें आलेलें उत्तरही समजेल. त्याचप्रमाणें एखाद्या पुढाऱ्यांस " आपला पुढील कार्यक्रम काय आहे ? " असा प्रश्न केल्यास " निश्चित नाहीं " असाच जबाब मिळेल. परंतु, अजमेरला दयानंद अर्धशताब्दीला आपणास जावयाचें असेलच. मग मुंबईस सायन्स कॉंग्रेसमध्यें आपण, मला वाटतें, कांहीं प्रबंध वाचणार आहांत ना ? अशा प्रकारचे माहितीपूर्ण व सूचक प्रश्न विचारल्यानंतर पुष्कळच माहिती मिळेल. " अजमेरचें निमंत्रण मला आहे आणि लाहोरचे खुशालचंद ही तेथें भेटतील म्हणून मी जाईन. परंतु सायन्स कॉंग्रेसला हजर राहतां येईल कीं नाहीं तें आज निश्चित नाहीं. माझा × × × विषयावरील प्रबंध मी आधींच पाठवून दिला आहे. पण त्याचवेळीं कांहीं महत्त्वाचे प्राणी गोळा करण्यासाठीं प्रो. × × × यांच्यासह मला सुंदरबनांत गेलें पाहिजे." वगैरे वगैरे सविस्तर कळेल. परंतु स्वतः बातमीदारानें ते पुढारी आर्यसमाजी आहेत, त्या अर्थी अजमेरला ते नक्की जाणार, त्यांच्या अभ्यासाचा विषय × × × असल्याने सायन्स कॉंग्रेसकडे त्यावर त्याचा प्रबंध गेला आहे इत्यादि माहिती आधींच मिळविली नसेल, तर त्याला अशा प्रकारें बोलता येणारच नाहीं. आणि म्हणून पर्यायानें अधिक माहिती बातमी म्हणून देता येणार नाहीं. असो.

अलीकडे सार्वजनिक चळवळींत स्त्रियांचा प्रवेश अधिकाधिक होत असून त्यांच्या मुलाखतीस जाण्याचे प्रसंग बातमीदारावर वरचेवर येतात. शिवाय पुरुषांच्या लेखापेक्षां स्त्रियांचे लेख किंवा स्त्रियांच्या मुलाखती वाचण्यासाठीं वाचक अधिक उत्सुक असतात म्हणून संपादकांची धडपडही कुणीकडून तरी स्त्रियांना ( त्यांच्या चित्रांना सुद्धां ) बातमींत ओढण्याची चालू असते. तेव्हां स्त्रियांची मुलाखत घेतांना कांहीं विशेष खबरदारी का घ्यावी लागते तें पाहूं.

प्रथमतः स्त्रीपुरुषांच्या स्वभावांतील आणि मनोभूमिकेमधील अंतर समजावून

घेणें इष्ट आहे. स्त्रियांच्या हौशी वेगळ्या. त्यांच्या आवडी–निवडी पुरुषांच्या आवडी-निवडींहून अगदीं भिन्न. प्रचलित रूढींचा प्रभाव स्त्रियांच्या स्वभावावर असतोच. पुरुष एकमेकांशीं अल्पावधीत सलगीने मिसळतात, तसें स्त्रियांचें होत नाही. त्यांचा जातिसहज विनय, रूढींचें बंधन, आणि आपल्या समाजाची जुन्या प्रकारची समजूत या सर्वांमुळें कोणा त्रयस्थाशीं स्त्रिया मोकळेपणानें बोलूं शकत नाहींत. स्त्रियांना भेटताच ‘ नमस्कार ’ करावा कीं नाहीं, ‘ तुम्ही ’ म्हणावें का ‘ आपण ’ म्हणून संबोधावें, त्यांच्या शेजारीं बसावें कीं, उभे राहूनच सर्व बोलणें आटोपावें, अशा किती तरी अडचणी बातमीदारास पडतात. कारण स्त्रियांच्या समाजात मिसळण्याचा रिवाज आपणांकडे नुकताच सुरू झाला आहे. आणि खरें म्हटलें तर पुरुषाशीं वागतों अशाच मोकळेपणानें म्हणजे भेटतांच नमस्कार करून, त्यांच्या समोर ( त्या बसल्या असतील तर आपणही ) बसून बोलण्यास कसलाच प्रत्यवाय नसावा. परंतु जुन्या पद्धतींतून एकदम नव्या आयुःक्रमात शिरताना थोडे बहुत धक्के बसून वेगळीच चाल रूढ होते, तशापैकीं आपल्या समाजाचें झालें आहे. स्त्रियांना सार्वजनिक चळवळींत भाग तर घ्यावासा वाटतो, परंतु त्यांच्याकडे ‘ घरच्या मंडळीस ’ ( मग ती कुणीही असो ) न विचारतां, परस्पर गेलेलें त्यांचें त्यानाच खपत नाहीं. अर्थात् हा सर्रहा लागू पडणारा नियम नसून पुष्कळ वेळां याला अपवादात्मक उदाहरणें आढळतात. परंतु स्त्रियांची प्रथम भेट किंवा परिचय करण्यासाठीं घरच्या मंडळी मार्फत गेलेलेंच श्रेयस्कर असतें. कोणीं तरी ओळख करून दिल्याविना अपरिचिताशीं पुरुषसुद्धा नीट बोलत नाहींत. स्त्रिया तर ह्या बाबतींत अधिक मितभाषणी बनतात. आणि म्हणून मुलाखत नीटपणें पार पडत नाही.

स्त्रियांचा स्वभाव समजला असेल तर अवांतर गोष्टी बोलूनच मुख्य मुद्दा मध्यें ओघाओघानें आणणें त्यांना अधिक आवडतें, हें कळेल. नवीन प्रकार कसलाही असो, ( दागिने, कपडे, फॅशन वगळून ) त्याला स्त्रिया बुजतात, त्याविरुद्ध त्यांच्या मनांत ( नसता ) ग्रह बसतो, म्हणून मुलाखत देण्यास किंवा आपलें नांव वर्तमानपत्रांत छापण्याससुद्धां त्यांना ‘ कसेंसेंच ’ होतें त्या पुष्कळ आढे-वेढे घेतात. विनयाचें प्रदर्शनही करतात. पण बातमीदारानें मोठ्या प्रयुक्तीनें काम साधून त्यांच्या गळीं ही गोष्ट उतरविली, तर अल्पावधींत होकार मिळतो

व पुढील खेपेस त्यांना अधिक आत्मविश्वास येतो. मग मात्र बातमीदारास त्या बुजणार नाहींत. तेंव्हां मुलाखतीस जातांना त्या बाईच्या स्वभावाची थोडी माहिती मिळविलेली असावी.

मुलाखत घेणारानें सर्वांसच ‘ आपण ’ म्हणून संबोधण्याचा प्रघात ठेवावा. ‘ तुम्ही ’ म्हणणें हें जरा तुसडेपणाचें व योग्य मानाभावाचें निदर्शक वाटतें. स्त्रीस्वभावाची ही एक मख्खी लक्षात ठेवावी कीं, जेणें करून त्यांना श्रेयाचा वाटा मिळेल अशाबद्दल, थोडा जातां जातां उल्लेख केल्यानें स्त्रिया खुलतात व मुलाखत चांगली मोकळेपणानें मिळते. उल्लेखनीय बाबी ठराविकच असतात व अनिर्देश्य अशाही पण कित्येक आहेत. त्या नीट ध्यानांत राहिल्या तर उत्तम. नाहीं तर घोटाळा उडावयाचा. समजा, मुलाखतीला गेल्यावर तुमच्या दृष्टीस त्या बाईची मुलगी पडली, तर ‘ काय चलाख पोर आहे बुवा ’ म्हणून तारीफ करणें फायद्याचें होईल. घरांतली व्यवस्था, चहा मिळाल्यास त्याची और लज्जत, मागें कुठें भाषण–लेख आले असतील त्याबद्दल थोडक्यांत प्रशंसापर उद्गार काढण्याची संधि व्यर्थ मुळींच दवडूं नये. कांहींच साधन हातीं लागले नाहीं, तर “ गेल्या आठवड्यात आपण × × × ठिकाणीं प्रदर्शन पहायला आला होता, तेव्हां आपल्या विषयींच ( आपल्या लुगड्याच्या फॅन्सी रंगाविषयीं, स्वदेशी प्रेमाविषयीं, साधेपणाबद्दल, गोड भाषणाकरितां, नाना कारणें असतील, ) सर्व लोक बोलत होते असें सांगितल्यानें काम भागतें. त्यांतील मर्म हें कीं अप्रत्यक्ष अशी स्तुति मानवाना आवडते. स्त्रियांना त्यांतल्या त्यांत अधिक. त्याजबरोबर दुसरीही एक गोष्ट विसरतां कामा नये. आधीं दुसऱ्या कोणा विदुषीची मुलाखत घेतली असेल किंवा मागाहून घ्यावयाची असेल तर तिचा निर्देश टाळणें इष्ट होईल. क्वचित् प्रसंगीं अशा नुसत्या उल्लेखानेंच काम होतें. पण सर्वदा लक्षांत बाळगण्याची गोष्ट ही कीं स्तुति व खुषमस्करी एक नव्हत. अस्तु.

हा विचार इतक्या बाइकाईनें करावा लागला. कारण मिश्र समाजात वावरण्याचा प्रघात अलीकडचा असल्यानें स्त्रियांनाही त्यांत थोडेसें विचित्र वाटतें. पुरुषांची तर तारांबळ उडतेच. पण सरावानें त्यांत गोंधळण्यासारखें कांहीं नाहीं हें समजेल. शेवटीं स्त्रियांशीं बोलतांना कोणत्या प्रकारची भाषा असावी हें सांगून मुलाखत – पुराण संपविलें पाहिजे. बायकांशीं बोलतांना

आपल्या लक्षांत ही गोष्ट आली असेलच कीं त्या सरळ, स्पष्ट अर्थाचीं वाक्यें न वापरतां सूचक वाक्यें उपयोजितात. कित्येक विचार, कल्पना, प्रश्न, अगदीं अप्रत्यक्ष अशा प्रकारें त्यांच्या तोंडून निघतात, म्हणून स्त्रियांच्या तोंडीं म्हणी नेहमीं असतात. " तूं हें खोटें बोललास " असें आपल्या मुलाला सुद्धां प्रत्यक्ष न म्हणतां, " मला खोटेपणा कधींच खपत नाहीं " असें त्या म्हणतील. म्हणीचा दाखलाही अशासाठींच. बोलणाराला सरळ सरळ 'गाढव' म्हणण्यापेक्षा, " त्याला कसली आली आहे गुळाची चव ?" असें मर्मी लागणारें पण सूचित बोलतील. दोन्हींचा अर्थ एकच. ही भाषा नीटपणें समजून घेतली पाहिजे व तशाच प्रकारें जबाब मिळाला म्हणजे बरें. अस्तु.

हें प्रकरण संपविण्यापूर्वी मुलाखतीचे कांहीं नमुने दाखवून त्यांतील दोषाविष्करण करणें अप्रस्तुत होणार नाहीं. चांगली मुलाखत कोणती हें सहज समजेल. पण अमुक मुलाखतींत चुका किती व कां झाल्या हें एकदम लक्षांत येत नाहीं. हें उदाहरणच पहा ना !

वैमानिक कबालींची मुलाखत. ते मुंबईहून पुण्यास प्रथम गेले तेव्हांचा प्रसंग. पुण्यातील एका पत्राच्या ' प्रतिनिधी ' नें म्हणे ' त्याची मुलाखत घेतली ' तिचा साराश खालीं दिला आहे. प्रथमच्या मजकुराबद्दल मागाहून पाहूं. मुलाखतींत पहिला प्रश्न, " कबाली, तुम्ही मुंबईहून पुण्यास आपल्या विमानांतूनच आला असाल नाहीं ! " असा आहे. त्याचें उत्तरही कबालींनीं दिलेलें सांगितलें आहे. कबालींच्या जबाबात, खरें बोलायचें तर, अवास्तव मजकूर फार दिसतो. " होय, पुण्यास दोन चार मित्र मंडळींची ओळख दृढ करावी, विमानांतून इकडील भागाचें निरीक्षण करावें व येथील तरुण वर्गांत वैमानिक कलेची आवड उत्पन्न करावी म्हणूनच मी आपलें लहानसें विमान घेऊन आलों. "

आतां ह्याबद्दल दोष कबालींना द्यावा कीं पत्राच्या त्या हुषार प्रतिनिधीला हा मोठा वादग्रस्त प्रश्न आहे ! प्रश्न पुनः वाचून पहा आणि उत्तर मुद्देसूद आहे काय तें ठरवा. वास्तविक पहातां वैमानिक कबाली मुंबईहून पुण्यास आल्यानंतर, हा प्रश्न विचारण्याचें प्रयोजन काय ! बरें, विचारल्यानंतर, त्याचें उत्तर, " होय, माझ्या विमानांतूनच आलों. " एवढेंच

मिळणार. पण कबाली पहावें तों कशासाठीं आलों ह्याचीच सविस्तर फोड करणारा जबाब देतात. तेव्हा प्रश्न लिहिला तो चुकीचा, कां कबालींनीं उत्तर भलतेंच दिलें ?

एवढयावरच ही जिज्ञासा थाबत नाहीं. दुसरा प्रश्न असा: –" तुम्ही प्रथम लंडनहून हिंदुस्थानात विमानातून येण्याकरिता निघाला नाही कां ? " किती औचित्यपूर्ण व मार्मिक प्रश्न हा ! उत्तर शोधण्यासाठीं कबालींना किती तास डोकें खाजवीत बसावें लागलें हें मुलाखतींत निर्दिष्ट नाहीं. मात्र कबालीचें १०–११ ओळींचे उत्तर दिलें आहे. त्यांत कबाली निघाले कसे, वाटेंत अडचणी कुठें व कशा आल्या, त्याचें थोडक्यात वर्णन देऊन गाडी पुनः तिसऱ्या प्रश्नापाशीं येऊन थाबली ?

आणखीही एक दोन मासलेवाईक प्रश्न वाचल्यास काय वाटतें तें सांगणें कठिण आहे.

**प्रश्न:**—पण तें एक असो, समजा पुण्यास एक एरो क्लब काढण्याची कल्पना कोणी काढली तर ती यशस्वी होईल काय ?

याला कबालींच्या तोंडचा म्हणून २४ ( अक्षरीं चोवीस ! ) ओळींचा जबाब आहे. त्यांतील माहिती गैर आहे असें नव्हे, पण प्रश्नाच्या रोखानें उत्तर दिलें नाहीं हे खास. आणखीही पुढें पहा.

**प्रश्न:**—सायसेन्सचे किती प्रकार आहेत ?

या मोठया दीर्घ प्रश्नाला बारा ओळींचें उत्तर आहे.

या मुलाखतींवरून एकच अनुमान निघतें. तें हें की, * कबालींना मुद्देसूद मुळींच बोलता येत नाहीं; भावबंधनातील ते तरुण वैमानिक 'धुंडिराज' दिसतात. किल्लीवर नुसता हात ठेवण्याचा अवकाश कीं झालीच प्लेट सुरू ! मुलाखत घेणारा बातमीदार – नव्हे प्रतिनिधि म्हणे – बाकी हुषार खरा. काय काय खुबीदार प्रश्न विचारले आहेत पण त्यानें ! नुसते प्रश्न पहाताच कबालींची वाणी स्रवूं लागते ! त्या प्रतिनिधीला वैमानिक बाबींचीही पुष्कळ माहिती दिसते. मुलाखतीच्या आरंभीं एका छोटया छेदकांत कबालींच्या पुण्यांतील

---

* श्री. कबाली, मी आपली माफी चाहतों. केवळ चर्चेला म्हणून आपणांला या पुस्तकांत ओढावें लागलें. ( याबद्दलचें श्रेय त्या प्रतिनिधीला ! )

कामगिरीचें वर्णन केलें आहे. त्यांत कुणाच्या भेटी घेतल्या, कांहीं मंडळींना विमानांतून बसवून आणलें, " महाराष्ट्र व्यायाम शाळेंत वैमानिक विद्या व अनुभव या विषयावर एक व्याख्यानही दिलें " असें सांगून मग प्रतिनिधीने घेतलेल्या मुलाखतीचा सारांश दिला आहे. ह्या प्रथम छेदकांत वैमानिक कबालींविषयीं माहिती नसती कां सागता आली ? त्यांच्या घरीं मुलाखतीला हे प्रतिनिधी गेले असतील, तर तेथील वातावरण, आजूबाजूच्या जिनसा, चित्रें वगैरेचें शब्द-चित्र, थोडक्यांत काढल्यानें वैमानिक कबाली वाचकाच्या पुढें उभे राहिले असते. तसेंच, पहिले औपचारिक, किंवा विशेष माहिती नसलेले प्रश्न विचारून उत्तरें मिळविलीं त्याचा ओझरता निर्देश करतां येतो. तेच प्रश्न व त्याना अप्रस्तुत अशीं उत्तरें लिहिण्यानें काय फायदा ? समजा, कबाली त्या पत्रप्रतिनिधींनें दाखविले तसे आहेत असें धरून चाललें, ( ते तसे नाहींत ही माझी खात्री आहे ) तरी त्यांच्या ह्या दोषावर पांघरूण घालणें इतक्या हुषार बातमीदाराला शक्य नव्हतें काय ? प्रश्नाचा रोख बदलून त्यानें ते छापले असते तर, .......

परंतु अशी शक्यताच संभवत नाहीं. त्या बातमीदाराला इतका विचार असता तर त्यानें अशा चुका राहूंच दिल्या नसत्या. कबालींनीं दिलेली माहिती प्रश्न न देतां छापली असती तरी मुळींच बिघडलें नसतें. ती चांगली उपयुक्त आहे. मात्र अमुक प्रश्नाला उत्तर म्हणून ती येते तेव्हा आश्चर्य वाटतें. आहे या उत्तरांना प्रश्न असे असावयास पाहिजेत :—

१ ( मुंबईहून ) पुण्यास ( विमानांतून ) येण्याचा उद्देश काय ?

२ लंडनहून हिंदुस्थानचा आपला प्रवास कसा झाला ?

३ एरो क्लब स्थापावयाचा म्हटल्यास काय काय तयारी पाहिजे ?

४ लायसेन्स कुणाला व कसे मिळतात ?

प्रश्नांत किंचित् बदल केला कीं मग कबालीवरील आरोप पार निघून जातील. ह्या मुलाखतीला उठाव येण्यासाठीं कबालींच्या बैठकीचें वर्णन — ते बसले असतील त्या खोलींतील विमानमार्ग दाखविणारे नकाशे, वैमानिक कलेविषयीं त्यांच्या मेजावरील ग्रंथ, त्यांच्या वैमानिक पोषाखाच किंवा विमानाचें थोडेसें वर्णन, बोलतांना कांहीं विधानास पुष्टि आणण्यासाठीं लगेच उठून पुस्तकांतले आंकडे काढून दाखविला तो प्रसंग, अशा बारीक सारीक एक

दोनच बाबींचा उल्लेख केल्यानें मुलाखत खरी वाटते. वाचक तन्मय होतात. प्रश्नोत्तरांची नुसती यादी देण्याने कांहीं साधत नाहीं. मुलाखत त्यांच्या घरीं झाली नसेल किंवा कुठल्या तरी हॉटेलांत झाली असेल तर वैमानिक कवालींची मूर्ति डोळ्यांपुढें .उभी करण्यासाठीं बातमीदारानें कांहीं तरी शब्द खर्ची घालावयास पाहिजे होते यांत शंका नाहीं.

आणखीही एक प्रसंग सांगतों. * * * येथील रुग्णालयाची माहिती वर्तमानपत्रांत देण्याच्या हेतूनें एका दैनिकाचे खास प्रतिनिधी ( संपादकीय शाखेंतील ) तेथील डॉक्टरना भेटण्यास गेले होते.

त्यांना प्रश्न विचारून वाटेल ती माहिती तेथल्या तेथें मिळूं शकली असती. रुग्णालयांत येणाऱ्या लोकांशीं गप्पा गोष्टी करून त्यांच्यापैकीं एकाच्या विचित्र दुखण्याचें, सुमारें × × × मैल लांबून तो आला त्याचें, त्यानें त्या रुग्णालया-संबंधीं ऐकलेल्या कीर्तीचें, असें किती तरी यथातथ्य वर्णन करण्यास त्या प्रतिनिधींना पुष्कळ माहिती मिळवितां आली असती. कांहीं आकडे, किंवा दरमहा — दरसाल — येणाऱ्या रोग्याची संख्या, एकूण केलेल्या शस्त्रक्रिया, वगैरे त्यांनीं तेथील डॉक्टर्सकडून विचारून घेणें त्यांचें कर्तव्य होतें. निदान 'अहवाल' मागून घेऊन त्यावरून आपणांस पाहिजे त्या बाबींचा उल्लेख करणें त्यांना अवघड नव्हतें. छापील रिपोर्टांची नक्कलच त्यांनीं आपल्या पत्रांत छापावयाची नसते. पण त्याच्या सहाय्यानें वेगळाच मजकूर लिहितां येतो. पण हे संपादकीय प्रतिनिधी पडले मोठे धूर्त. त्याची कल्पना अगदींच निराळी. संपादकीय शाखेंत त्यांची बुद्धि स्वतंत्रतेनें वावरत असल्यानें त्यांनीं नंतर त्या रुग्णालयावरील मुख्याला एक पत्र लिहिलें.

त्यातील कांहीं भाग जसाच्या तसा देतों :—

छापील अहवालाला उद्देशून ते म्हणतात :— एकदां छापलेला मजकूर पुनः छापण्यांत महत्त्व नाहीं. आपण जर × × × येथील दवाखान्यात (!) येणाऱ्या रोग्यासंबंधीं मनोरंजक पण महत्त्वाची माहिती द्याल, तर अजूनही मी छापण्याचें पहातों. दवाखान्यात कोणत्या वर्गाचे लोक येतात, त्याना बहुधा कोणता रोग विशेष असतो, पैसे देण्याचें सामर्थ्य असून गरिबी दाखविणारे किती ?.... डोळ्याबद्दल सामान्यतः काय काळजी घ्यावी ? अभ्यास करतांना दिवा ठेवण्याची चुकीची व बरोबर पद्धत ( चित्रें पाठवा ), रोज दवाखान्यांत येणाऱ्या रोग्यांची

संख्या, हे मुद्दे लेखांत हवेत. लिखाणाबद्दल वाट पाहूं कीं नको त्याचें त्वरित उत्तर पाठवा. ”

जगात वर्तमानपत्राचा संपादक काय तो अत्यंत कार्यमग्न व डॉक्टर मात्र रिकामटेकडे लोक, असा ‘ दर्प ’ या पत्रास येत नाहीं ? बरें, हेच प्रश्न समक्ष भेटीचे वेळीं विचारण्यास काय हरकत होती ? पैसे देण्याचें सामर्थ्य असून गरिबी दाखविणारे किती, ह्या प्रश्नाचें समाधान कसें करावयाचें ? म्हणजे डॉक्टराचें काम काय आणि ह्या प्रश्नामुळें रुग्णालयाची काय माहिती लोकांना होणार याबद्दल यत्किंचितही विचार त्या ‘संपादकां’नीं केलेला दिसत नाहीं. रोग्यांची संख्या त्यांना त्या छापील पत्रकात ( अहवालांत ) मिळूं शकली नसती ? तसेंच डोळ्याबद्दल सामान्यतः काय काळजी घ्यावी, अभ्यास करतांना दिवा ठेवण्याची पद्धत ( चित्रें पाठवा ! ) इत्यादि प्रश्न रुग्णालयावरील मुख्याला विचारण्याचा हेतु काय ? त्याची परीक्षा तर हे प्रतिनिधी घेत नाहींत ? ह्या विषयीं साधारणपणें व समग्र चर्चा आधुनिक शिक्षण-पद्धती संबंधींच्या पुस्तकात आढळते. व्यावहारिक व शास्त्रीय ज्ञानाचीं पुष्कळ मासिकें इंग्रजींतून निघतात. त्यांत ह्या बाबींचा ऊहापोह येतो. डॉक्टर्सना ‘ चित्रें पाठवा ’ असा सुलतानी हुकूम सोडून व ही माहिती मागून काय फायदा ? डॉक्टर्सनीं आपलें काम सोडून प्रतिनिधी महोदयाच्या फर्मानानुसार चित्रें काढण्यास, इन्कम-टॅक्स कचेरींतील आकडे तपासून व्यापक दृष्टीनें ‘ मनोरंजक पण महत्त्वाची ’ माहिती गोळा करण्यास लागावें, म्हणजे ती छापण्याचें ते पाहतील ! डॉक्टरांना केवढा मोठा आधार आणि केवढें जंगी आश्वासन ! त्यांच्यावर डोंगराएवढा हा उपकारच म्हणावयाचा. आणि संपादकाचा अधिकार तर पहा — “ लिखाणाबद्दल वाट पाहूं कीं नको त्याचें त्वरित उत्तर पाठवा. ” जशी काहीं पी. एण्ड ओ. ची मोसमांतली गर्दी. आधीं चार सहा महिने जागा रिझर्व केल्याशिवाय चालावयाचें नाहीं. डॉक्टरनीं म्हणे त्यांना लिखाण पुरवावें आणि मग हे संपादक आपल्या नांवावर तें छापणार ! भाषा कशी पण ? चित्रें पाठवा — उत्तर पाठवा — खडखडीत आज्ञार्थ ! विध्यर्थ सुद्धा नाहीं ! खरोखर अशा पत्रपंडितांना अगदीं कोपरापासून हात जोडावे.

तिसराही एक मासला पहाणीय आहे. जर्मनीहून नुकतेच स्वदेशीं आलेल्या डॉ. लेल्यांची मुलाखत. पुनः ‘ प्रतिनिधी ’ नेंच घेतली. तींत सुरवातीस

“ वेळ अगाऊच ठरली होती....मी गेलों त्यावेळीं डॉक्टरसाहेब स्नान गृहांत असल्यामुळें मला जरासें थांबावें लागलें ” अशी तक्रार आहे. डॉ. लेले याना वक्तशीरपणें आपले संकेत पाळतां येत नाहींत हें दर्शविण्याचा तर त्या प्रतिनिधीचा हेतु नव्हे ना ? अशी शंका येते. किंवा असेंही असूं शकेल कीं वेळ चुकवून हे प्रतिनिधीच उशीरां गेले असावेत. पण ह्या क्षुल्लक बाबींचा निर्देश करण्याचें कांहीं तरी प्रयोजन ?

पुढें आणखी पहा. “ ते आपला टॉवेल खांद्यावर टाकून धोतराचा सोगा सोडलेल्या अशा स्थितींत आले आणि आपले ओलसर केस भिंतींतल्या आरशासमोर उभे राहून विंचरतां विंचरतां त्यांनीं मी विचारलेल्या प्रश्नाचीं उत्तरें दिलीं. ”

ह्यावरून डॉ. लेले यांस साधे शिष्टाचार सुद्धां ठाऊक नाहींत हें त्या प्रतिनिधीच्या मनांतून जगजाहीर करावयाचें आहे असें अनुमान नाहीं निघत ? बरें, ह्या कादंबरीतील वर्णनानें काय साधलें ? डॉ. लेले याच्या ‘ केशभूषेस ’ बराच वेळ खर्च होतो आणि नाटकांतील एखाद्या जहांबाज नायिकेप्रमाणें सर्व पात्रांनीं आपल्या भोंवतींच घुटमळलें पाहिजे, असा त्यांचा आग्रह दिसतो. त्यांनी केस विंचरत रहावें आणि ह्या प्रतिनिधीनें त्यांच्या पाठीकडे पाहून प्रश्न विचारावे, असल्या प्रकारावरून दोनच अनुमानें निघतात. एक, डॉ. मजकुरांना मुलाखतीची ‘ ब्याद ’ वाटली व कशी तरी ती मागची चुकवावी म्हणून त्यांनीं हा मार्ग अवलंबिला. दुसरें, बातमीदाराला — नव्हे प्रतिनिधीला — नसतें बारकाव्याचें निरीक्षण करतां येतें ही बढाई मारावयाची असावी. तें कांहींही असलें, तरी मुलाखतींत डॉ. लेले यांचें शब्दचित्र येण्याऐवजीं ‘ व्यंग चित्र ’ आलें खरें. पण माझ्या स्वतःच्या अनुभवावरून डॉ. लेले असे नाहींत हें खास सांगूं शकतों. असा कांहीं प्रकार झाला असला तरी तो बातमीदारानें लिहावयाचा नसतो.

ही तीनही उदाहरणें ‘ प्रतिनिधीं ’ चीं आहेत. साधे बातमीदार कांहीं ते नव्हत. तरी सुद्धां त्यांत किती दोष राहिले आणि संपादकांनींही ते राहूं दिले हें समजेल. पत्रपटूंनीं यापासून योग्य तो धडा घ्यावा. त्याच चुकांचें अनुकरण करूं नये.

प्रकरण चौदावें

# प क्षा भि मा न

बातमीदाराच्या प्राथमिक शिक्षणासंबंधीं इतका वेळ चर्चा झाली. आतां थोडया वरच्या दर्जाची शिकवणूक द्यावयाची आहे. इतका वेळ घडलेला मजकूर होता होईल तों जसाच्या तसा लिहिण्याकडे प्रवृत्ति ठेवा म्हणून म्हटलें व वर्तमानपत्राचें धोरणही अभ्यासण्याचा सल्ला दिला. त्यानंतर विशिष्ट पक्षाच्या दृष्टीनें मजकूर कसा लिहावा, त्या पक्षाभिमानांत साजतील अशीं बातमीपत्रें कशीं लिहावीं, यासंबंधीं विवेचन करूं.

निःपक्षपाती म्हणून कितीही डांगोरा पिटणारीं वृत्तपत्रें ( काय किंवा माणसें सुद्धा ) असलीं तरी तीं कुठल्याना कुठल्या तरी पक्षाकडे झुकलेलीं असतातच. किंवा असें पाहिजे. तर समजावें कीं, ' निःपक्षपात ' ह्या शब्दाला व्यावहारिक भाषेंत किंचित् वेगळा अर्थ आहे. वातावरणांत शुद्ध ऑक्सीजन आढळत नाहीं. त्यांत कशाचें तरी मिश्रण असतें. तसेंच मानवी मनाचेंही असावें. पूर्वग्रह, समजुती इत्यादिकांच्या वेष्टनात कुणाचे मन खरोखर निःपक्षपाती राहूं शकेल ? राजकीय प्रगति आधीं कीं सामाजिक ? कां दोन्ही बरोबर व्हाव्या ? राजकारणांत काय किंवा सामाजिक व्यवहारांत काय, आस्ते कदम चालावें अथवा ' एक घाव दोन तुकडे ' असें वर्तन ठेवावें ? धर्माला कितपत मानावें ? सदैव सत्य बोलावें काय ? शठं प्रति शाठयम् खरें कां शठं प्रति सत्यम् ही वृत्ति चांगली ? लोकमताला नेहमीं मान द्यावा किंवा लोक म्हणजे ' मेंढराचा कळप ' मानून मेंढपाळानें त्यांना वाटेल तिकडे न्यावें ? साध्या व्यवहारांत सुद्धां जातिभेद मानावा कीं नाहीं ? त्याची मर्यादा कोणती ? इंग्रजी शिकावें किंवा कसें ? परदेशीं जाऊन विद्या संपादणें इष्ट कां अनिष्ट ? फार काय, शंकराची पूजा करावी का विष्णूलाच भजत रहावें ? सगुणोपासना श्रेयस्कर कां निर्गुणोपासनेचा मार्ग चांगला ?...... अशा अशा प्रत्येक क्षेत्रांतील भिन्न रुचींवरून नाना पक्ष, उपपक्ष, पंथ, जाति, वर्ग, समाज निघाले असतां ह्या सर्वांना खूष करणारा – म्हणजे खरा निःपक्षपाती

कुणी इसम असेल, ( त्यानें चालविलेलें वर्तमानपत्रही तसेंच निःपक्षपाती धोरणाचें असेल ) ही कल्पनाच मुळीं शक्य वाटत नाहीं. त्याचीं कारणें अगदीं उघड आहेत. प्रत्येक मनुष्याची आवडनिवड, मतभिन्नता अशी कांहीं ठरलेली राहणारच. आणि त्यानें चालविलेल्या वर्तमानपत्रांत ती प्रतिबिंबित झाल्याविना कशी राहील ? मतें, मनाचा कल, पूर्वग्रह, संस्काराचा परिणाम, इत्यादि मानसिक बाबी, जरूरीप्रमाणें अंगावरील कपडे बाजूस काढून ठेवतां येतात तशा, अधिष्ठित व्यक्तींपासून वेगळ्या होणें शक्य नसतें. म्हणून हे पक्षभेद साहजिकच उद्भवतात. वर्तमानपत्री जिणेंच मुळीं अशा पक्षभेदावर अवलंबून असल्यानें विशिष्ट पक्षांत ‘ फिट् ’ बसणारें लिखाण लिहिण्याचा बातमीदारास सराव अवश्य हवा.

अगदीं रोजच्या घरगुती व्यवहारांतली गोष्ट घ्या. तुमचा कुणाशीही मतभेद झाला, थोडेंसें ‘ भांडण ’ झाले तेव्हांची आठवण काढा. आणि ती हकीकत तिसऱ्याला तुम्हीं कशी सांगितली किंवा तिजवर मनात विचार कसा केला ही स्मृति ताजी तवानी करा. “ **मी** आपला सरळपणें शुद्ध भावनेनें बोलत होतों आणि **त्यानें** मात्र विपर्यास केला, माझे अंगावर तो खेकसला, नाहीं नाहीं ते शब्द मला बोलला ! इतक्या वर्षांचा आमचा स्नेह, पण शेवट असा झाला, ” वगैरे विचार तुम्हाला आठवतील. इतकेंही आत्मनिरीक्षण करतां येत नसले तर रस्त्यावर चाललेलें दोघांचें भांडण पहा. त्यांत कुणाचें म्हणणें खरें व कुणाचें खोटें याची शहानिशा न करतांही प्रेक्षकांपैकीं पुष्कळ जण या नाहीं त्या पक्षाचे बनतात ना ? कुस्ती, टेनिस टूर्नमेंट, फुटबॉल मॅच, कांहीं तरी खेळ चालू असताना लोकांच्या जमावांतील कित्येक एकीकडे व दुसरे दुसरीकडे झुकलेले असतातच. तें कां ? त्याला कारण कांहीं तरी असलेंच पाहिजे. परंतु मुद्दयापुरती गोष्ट बोलावयाची म्हणजे अशी कीं, पक्षभेद हे जवळ जवळ स्वाभाविक बनत चालले आहेत. कोण बरोबर व कोण चूक हें निश्चयात्मक सांगण्याची योग्यता सर्व साधारण माणसास नसली तरी, ह्या पक्षाला कांहीं व त्या पक्षाला कांहीं अशी जनतेची विभागणी होतच असते. प्रचलित राजकारणाची गोष्ट घेतली तर, गांधींच्या म्हणण्याला सर्वस्वी होकार देणारे कित्येक लोक आढळतात व कांहीं मंडळी गांधींचें नांव काढतांच कपाळाला आठया चढविणारी भेटतात.

ह्या सर्व पक्षोपक्ष निरूपणाचा इत्यर्थ हा कीं, स्वाभाविकपणेंच बातमीदार कुठल्या ना कुठल्या तरी पक्षाकडे कललेला असतो. त्यामुळें त्याचें निरीक्षण अर्थातच त्या पक्षाच्या मनोभूमिकेनुसार घडतें. प्रत्यक्ष उदाहरणानें ही गोष्ट अधिक पटेल. महात्मा गांधींची चळवळ घ्या. तींत पडलेल्या लोकांनीं लष्करी शिस्त उत्तम प्रकारें पाळली असें गांधीपक्ष म्हणतो; तर विरोधीपक्षाचें म्हणणें हें कीं, गांधींच्या अनुयायांनीं आपली बुद्धि गहाण टाकली. त्यांत स्वतंत्र विचारशक्ती अशी नाहींच. अमेरिकेंतील वसाहतवाल्यांनीं इंग्लंडचा अधिकार मानण्याचें नाकारलें, तेव्हां राजपक्षीय मंडळींनीं वसाहत करणारांना राजद्रोही, देशद्रोही, अराजनिष्ठ, अशीं विशेषणें लावलीं. पण इतरांनीं अमेरिकन "स्वातंत्र्यवीर" म्हणूनच त्यांचा गौरव केला ना ? म्हणजे, यावरून आपल्या पक्षदृष्टीचा परिणाम न कळतसुद्धां आपल्या एकंदर जीवनावर कसा घडत असतो हें समजेल.

एकदां वरील मुद्दा लक्षांत आल्यानंतर दुसरीही गोष्ट कळली पाहिजे. जगांत वेगवेगळे वर्ग, जाति, वंश, संघ, असले तरी त्यांत पुष्कळांचे हितसंबंध एक नसून परस्पर-विरोधी असतात. "जीवो जीवस्य जीवनम्" हें तत्व अखिल सृष्टींत प्राणिमात्रांना, वनस्पतींना, जल-स्थल-चरांना, सर्वांना लागू पडतें असेंही म्हणतां येईल. आणि ह्या परस्पर-विरोधी कंपूंचे दृष्टिकोनही साहजिकपणेंच भिन्न भिन्न असणार. मृगादिकांना वनस्पत्याहाराची विशेष महति वाटते. व व्याघ्रसिंहांना हरिण, बैल, शेळी, मेंढी अशांच्या रक्ताचीच गोडी असते हें तर आपण नेहमींच पाहतों. यामुळेंच शाकाहाराचें महत्त्व प्रतिपादन करणारा एक व मांसाहाराचे गोडवे गाणारा दुसरा पक्ष निर्माण होतो. यांत खरें खोटें याचा निवाडा कसा व कोणी करावयाचा ? तेव्हां विशिष्ट मताची झांपड न कळतच कशी बसते तें समजेल.

बातमी देतांना ही पक्षाभिमानाची दृष्टि कशी जागरूक असते याचें एकच उदाहरण पहा : — बातमी एकच, पण तीन निरनिराळ्या पत्रांनीं तीन वेगळ्या शीर्षकांनीं दिली.

तीनही उतारे जसेच्या तसे आहेत.

**कॉमन्स सभेंत डेमोक्रॅटिक स्वराज्य पार्टीचा प्रश्न**

"कॉमन्स सभेंत आज रोजीं मि. टॉमस् विल्यम्स

यांनीं असा प्रश्न विचारला कीं शांततेच्या मार्गांनीं पूर्ण स्वराज्य मिळविण्याच्या उद्देशानें मुंबई येथें ऑक्टोबर महिन्यांत लोकशाही स्वराज्य पक्ष स्थापन झाला. त्याचे सभासद निवडणुकी लढविणार आहेत असें ऐकतों. या पक्षाला कार्य करण्यास परवानगी देण्यांत येईल कीं नाहीं – या प्रश्नास उत्तर देतांना भारतमंत्री म्हणाले या पक्षाला कां कार्य करतां येऊं नये तें मला कळत नाहीं. ”

— ज्ञानप्रकाश १३-१२-३३.

ही दृष्टी अगदीं निःपक्षपाती म्हणजे घडलेली हकीकत बातमी म्हणून देण्याची म्हणतां येते. पण ‘ नवाकाळ ’ चा दृष्टिकोन पहावा तर—

**कॉमन्स सभेंत केळकर पक्ष**

**“ होअर साहेबांचें शिक्कामोर्तब :**

**ध्येय संपूर्ण स्वराज्य, मागणी नोकऱ्यांचा ”**

लंडन ता. ११—कॉमन्स सभेंत थॉमस् विल्यम यांच्या प्रश्नास उत्तर देतांना होअर म्हणाले, “ मुंबईत लोकशाही स्वराज्य पक्ष स्थापन झाल्याचें मला कळलें आहे. पक्षाचें ध्येय पूर्ण स्वराज्य असून त्याचे सभासद निवडणुकी लढविणार असून नोकऱ्या पत्करणार आहेत. ”

— नवाकाळ १३—१२—३३.

आतां खुद्द केसरीचें म्हणणें पहा :—

**पार्लमेंटांतील प्रश्नोत्तरें.**

मि. थॉमस विल्यम्स ( मजूर पक्ष ) यांनीं प्रश्न विचारल्यावरून भारतमंत्री सर सॅम्युएल होअर उत्तरलेः — गेल्या ऑक्टोबर महिन्यात मुंबईत डेमॉक्रॅटिक स्वराज्य-पार्टी नावाचा नवीन पक्ष स्थापण्यात आला. शांततेच्या व सनदशीर मार्गांनीं पूर्ण स्वराज्य प्राप्त करून घेणें हें त्या पक्षाचें ध्येय असून कायदेमंडळांत प्रवेश करणें आणि मंत्री मंडळांतल्या जागा स्वीकारणे हें त्या पक्षास तत्वतः मान्य आहे.

मि. विल्यम्स :—त्या पक्षाला आपलें काम चालविण्यास परवानगी दिली जाईल का ?

सर सॅम्युएल होअर :—त्या पक्षाच्या कामाला हरकत घेण्यास मला तर कांहीं कारण दिसत नाहीं.

— केसरी, १५-१२-३१.

या तीनही शीर्षकांत फरक उघड उघड दिसतो. तद्वत् मजकूर पाहिजे तेवढा घेण्याची पद्धतही स्पष्ट होते. विलायतेची तार सर्व ठिकाणीं एकच येणार. केसरी, ज्ञानप्रकाश व नवाकाळ यांना तीन निरनिराळ्या खास तारा आल्या, अशांतला प्रकार नसून त्या त्या कचेरींत पाहिजे तेवढाच भाग त्यांतील घेतला ही गोष्ट सांगण्याची आवश्यकता नाहीं. शब्द योजनेंतही किती फरक आढळतो तो पहा. नवाकाळ कॉंग्रेस पक्षाचा कट्टा अभिमानी असल्यानें सहकारी पक्षाविरुद्ध टीका करण्याची ही संधि त्या पत्रानें फुकट कां जाऊं द्यावी ? होअरांच्या उत्तरांतील थोडासाच उतारा घेऊन, "मंत्रिमंडळांतल्या जागा स्वीकारणें हें त्या पक्षाला तत्वतः मान्य आहे," असें सांगण्याऐवजीं "नोकऱ्या पत्करणार आहेत" ह्या शब्दप्रयोगानें नवाकाळचा हेतु साधतो कीं नाहीं ? शिवाय मथळ्यांतून नवाकाळचा पक्षाभिनिवेश स्पष्ट होतच आहे केसरीनें आपला पक्षाभिमान त्या बातमीला प्राधान्य देऊन म्हणजे प्रमुख ठिकाणीं छापून आणि तिचा विस्तार कमी न करता दिल्यानें, व्यक्त केला. नाहीं तर, पार्लमेंटमधील किती तरी महत्त्वाचीं प्रश्नोत्तरें असतात. त्यांचा धांवता सारांशच देण्याची केसरीची पद्धत असतां ह्या बातमीस केसरीनें प्राधान्य दिलें. कारण पक्षाभिमान. त्या मजकुरास मोठे मथळे देणें इष्ट नव्हतें. कारण "होअर-साहेबांचा शिक्का मोर्तब" ( नवाकाळ म्हणतो त्याप्रमाणें ) मिळाला ही बाब ( उघडपणें तरी ) केसरीला अभिमानास्पद मानतां यावयाची नाहीं. म्हणून नुसता "पार्लमेंटांतील प्रश्नोत्तरें" असा साधाच मथळा देऊन फक्त एकाच प्रश्नाविषयीं चर्चा तेथें आली. पार्लमेंटांत त्या दिवशीं हा एकच प्रश्न विचारला असें नव्हे. तर, केसरीच्या दृष्टीनें त्या दिवसाच्या प्रश्नोत्तरात हाच भाग विशेष महत्त्वाचा वाटला. ज्ञानप्रकाशचें धोरण मात्र प्रतिकूल नाहीं हें उघडच होतें.

राजकीय बातमींत पक्षाभिमान आढळतो तसाच इतर प्रकारच्या बातम्यांतही न कळत तो येतोच. साधाच रस्त्यावर घडलेला मोटारचा अपघात पहा. एका लक्ष्मीपुत्राच्या मोटारीचा धक्का लागून रस्त्यावर काम करणारा एक पाटीवाला समजा मेला, तर ती बातमी वेगवेगळ्या प्रकारें लिहितां येईल हें मागें ( पृ.४९ ) सांगितलेंच. तसेंच संस्थानांतल्या घडामोडी सांगतांना, पत्राचें धोरण असेल त्या मानानें सडकून टीका अथवा ओतप्रोत स्तुति एकाच बातमीच्या आधारें करतां येते हेंही दर्शविलें. आपल्या पत्राचें धोरण कोणतें व त्याला विसंगत न होतां आपणांस बातमी कशी लिहितां येईल हें पाहिलें पाहिजे. अशा प्रकारच्या लिखाणांत विशेष जबाबदारी असते. हें काम पार पाडण्याकरितां थोडें अधिक ज्ञानही असावें लागतें. मात्र तें कुठल्याही पुस्तकांत नसून अनुभवानें प्राप्त होतें. ह्या अनुभवी ज्ञानाची आवश्यकता अशा करतां कीं, समजा, टोकियोहून चीनच्या विरुद्ध कागाळी करणारी, चिनी सरकारच्या बेजबाबदार कृत्याबद्दल तीव्र निषेध प्रगट करून लगेच लष्करी तयारीसाठीं हुकूम सोडल्याची खबर आली. तीवरून चीननेंच खरोखर जपानची कुरापत काढली, जपान आपलें साळसूद सरकार, कुणाच्या वाटेला कधीं न जाणारें, अशी समजूत करून घेऊन ती बातमी जशीच्या तशी छापणें गैर होईल. वरील मजकुरावरून जपानच्या दडपश्यमेचा प्रतिकार म्हणून चीननेंही जपानला कांहीं झोंबणारा टोला दिला असेल, तेव्हांच जपाननें हा निर्वाणीचा खलिता धाडला असावा; जपानचें चढाईचें धोरण तर सर्व प्रसिद्धच आहे आणि चीनची चाललेली सर्वांगीण नागणूक कोणाला ठाऊक नाहीं असें नाहीं; म्हणून जपानमधून आलेल्या वरील आशयाच्या तारेंत काय अर्थ अभिप्रेत असावा हें ओळखण्याचें ज्ञान आवश्यक आहे असें म्हटलें.

जपानी तारेची बाब केवळ काल्पनिक उदाहरण होय. असाच प्रकार देशी बातम्यांचा, निरनिराळ्या पक्षांच्या सभांचा असावयाचा. लोकशाही स्वराज्य पक्षाचीच गोष्ट पुनः उदाहरणादाखल घेतली तर, केसरी किंवा त्या कंपूंतील वर्तमानपत्रांत त्या सभांची विस्तृत हकीकत नियमितपणें येते. आणि ‘ नवाकाळ ’ मध्यें पहावें तर त्यांविषयीं उल्लेखसुद्धां नसतो. म्हणजे ती बातमी खरी नव्हे असें नाहीं. ती सभा होते, तींत ठरलेले ठरावही पास होतात, घटना

मंजूर होते, कार्यकारी सभासद निवडतात, सगळें खरें. पण स्वतःचा पक्ष दिवसेंदिवस वाढीला लागला हें दाखविण्यासाठीं 'केसरी' व तत्पक्षीय पत्रें अशा सभांचा विस्तृत रिपोर्ट देतात. त्यांच्या उलट 'नवाकाळ'च्या मतें हा 'नोकरीवाला' पक्ष, त्यांच्या अनुयायांची संख्या अगदींच थोडी. त्याची टिमकी वाजवा कशाला ? दुर्लक्ष करूनच त्या पक्षाची फजीति उडविण्याकडे 'नवाकाळ'ची दृष्टि असावयाची. आतां, एक दोन बाबींची थोडी फोड करूं. असल्या 'पक्ष – सभा' होतात, त्यांत सर्वसाधारण जनता प्रथमपासूनच सामील होते असें नाहीं. सुरुवातीस प्रत्येक पक्षांत लोकमताचा भरपूर पाठिंबा असतो कुठें ? कांहीं निवडक मंडळींनीं पक्ष, संघ, सभा, मंडळ, स्थापून मग नंतरच "आमच्या पक्षाची आज × × × येथें सभा भरली," "× × × ह्या गांवीं लोकांनीं आपली संमति देऊन मंडळाच्या कार्याबद्दल समाधान व्यक्त केलें; बऱ्याच ठिकाणीं संघाच्या शाखा स्थापन झाल्या." अशी जिकडे तिकडे टिमकी वाजूं लागली, म्हणजे वाचकाना साहजिकच वाटतें कीं, 'हें काय, आपण दुनियेच्या मागें इतके कसे राहिलों ? सर्वच ठिकाणची मंडळी यांत सामील झाली असून आपणच बाकी राहिलों हें ठीक नव्हे. इतकीं माणसें त्याला मिळतात तर आपण कां त्यांत समाविष्ट होऊं नये ?' ही विचारसरणी व तिचा लाभ घेण्याची व्यावहारिक दृष्टी यांच्या योगानें पक्षाभिमानाचें तट्टू हळू हळू पुढें जातें. त्यांत लबाडी असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं. शिष्ट-संमत, सर्वमान्य, राजमान्य पाहिजे तर म्हणा, व अलीकडील कालांत सर्वतोपरी उपयोगी अशी ही कला केवळ वर्तमानपत्रामुळेंच अवतरली असें नव्हे. पूर्वीपासून मानवांनीं तिचा उपयोग केला आणि सध्या वर्तमानपत्रांचा अफाट प्रसारामुळें तिचा अधिक फैलावही झाला.

पक्षाभिमान विरहित असें एकही पत्र आज आढळावयाचें नाहीं. कारण मनुष्याची दृष्टि इतकी साफ कधींच असूं शकत नाहीं. सुधारलेलीं राष्ट्रें याच युक्तीवर आपलें सामर्थ्य दुसऱ्याना दाखवितात. सरकार पक्षीय पत्रें असल्याच कौशल्यानें लोकांची दिशाभूल करतात. (पुनः दृष्टिभेदाचा प्रश्न आलाच ! दिशाभूल नव्हे, 'उन्नतीच्या मार्गावर प्रगती' करतात असें पाहिजे तर म्हणावें.) हिंदु–मुसलमानांचे दंगे, गिरणीवाले व मजूर यांचा लढा, ह्या बाबी त्या त्या

पक्षीय बातमीदाराच्या विवक्षित दृष्टिकोनांतून — विवक्षित पक्षाच्या रंगीत चष्म्यांतून — पाहिल्या असल्यानें त्यांत तो रंग आढळला पाहिजे. म्हणून कुठलेंही पत्र घेतलें कीं, त्याचें धोरण कोणतें हें विचारतात. काँग्रेस कार्यक्रमाचें समर्थन नवाकाळ मध्यें वाचावे तर काँग्रेसचा 'सूत्रवाद' किंवा गांधींची भोंदूगिरी यांचें वर्णन विरुद्ध पक्षाच्या पत्रात असतें. दोन्हीचाही समन्वय करून मध्यम मार्ग सुचविणारा व त्याचेंच ढोलकें वाजविणारा एक प्रागतिकांचा पक्ष असतोच. एकंदरींत प्रत्येक पक्ष आपल्या विवक्षित चष्म्यांतून सर्व घडामोडींकडे लक्ष देतो. अशा परिस्थितींत कडवी तत्वनिष्ठा पुढें करून निःपक्षपातीपणा राखण्याकडे प्रयत्न करणें हास्यास्पद होईल.

एकदा पक्ष निश्चित झाला कीं वर्तमानपत्रांतील सगळा मजकूर, प्रत्येक ओळ, प्रत्येक शब्द, त्या ठराविक धोरणाकडे नजर देऊन निवडलेला असावा. नाहीं तर, मग निःपक्षपाताची पोकळ सबब पुढें करून आपली कार्याक्षमता दाखविण्याचा प्रयत्न करूं नये. लहानशीच बाब पहा. 'गांधी-आयर्विन' करार, हिंदी पत्रांनीं गांधींना प्राधान्य देऊन निर्देशण्याचा प्रघात पाडला. पण सरकार पक्षीय वृत्तपत्रें चुकून सुद्धां तसें म्हणत नाहींत. त्यांचें 'आयर्विन-गांधी' करार असेंच स्वरूप प्रथमपासून कायम आहे. हें का? तर धोरण. कांहीं महिने मुंबईच्या टाइम्सनें काँग्रेस स्वयंसेवकांस 'भाडोत्री' 'Hirelings' असें तुच्छता दर्शक विशेषण देण्याचा शिस्तशीर उपक्रम चालू ठेवला. काँग्रेस कार्यकर्ते किंवा स्वयंसेवक असें कधींच त्यांत वर्णन आलें नाहीं. या सर्व पद्धतशीर लिखाणाचा रोख स्पष्ट होता. पण तसेंच बोलायचें झालें तर भाडोत्री नोकरांवरच सगळा हिंदुस्थानचा राज्यकारभार चालला आहे ना? असा प्रश्न विचारतां येतोच! आपणांस इतकेंच पहावयाचें कीं, एका विवक्षित पक्षाभिमानाची दृष्टि घातली म्हणजे शब्दयोजना सुद्धां त्या ठराविक हेतूनें झाली पाहिजे. संपादकीय धोरण केवळ संपादकीय अग्रलेख व सूचनांतच आढळतें असें मुळींच नव्हे, हें वारंवार सांगावें लागतें. बातमी देऊन एका विवक्षित पक्षाला पाठिंबा मिळवितां येतो, तसा लांबलचक अग्रलेख लिहून साधणार नाहीं. म्हणून पक्षाभिमानानें अमुक एक कार्य साध्य करावयाचें असेल तर तशा हेतूनें लिहिलेलीं बातमीपत्रें अधिक उपयुक्त ठरतील यांत संशय नाहीं.

म्हणून इंग्रजी किंवा सरकार पक्षीय पत्राचा कल एक ठराविक असतो. मुंबई 'टाइम्स' चें पुण्याचें, दिल्लीचें, कलकत्त्याचें किंवा मद्रासचें कुठलेंही बातमीपत्र पहा. त्या सर्वांतून एकाच विचाराची पेरणी केलेली असते. तशीं पत्रें आमच्याकडे कुठें आहेत ? विशिष्ट ध्येय ठरल्यावर बातमीपत्रें आमच्या बातमीदाराना लिहितां येत नाहींत असें मुळींच नव्हे. कारण सत्याग्रहाचा पहिला लढा ( १९३० ) सुरू झाला, तेव्हां ठिकठिकाणचीं बातमीपत्रें निरनिराळ्या वर्तमानपत्रांत येत, त्यांत प्रामुख्यानें 'युद्धवार्ता'च असे. पण मुख्य अडचण आमचेकडे आहे ती ही, कीं काय हेतूनें बातमीपत्र लिहावें तेंच निश्चित नाहीं. नुसत्या घडामोडींची नोंद व बातमीपत्रें यांत पुष्कळ फरक आहे. घडामोडी कळवाव्या, नाहीं असें नाहीं. पण त्यांत स्वतःला विसरून चालत नाहीं हेंही ध्यानांत घ्यावें.

स्वतःच्या पक्षाभिनिवेशासाठींच बातमीपत्रें लिहावयाचीं असतात असें नव्हे. एखाद्या अनिष्ट प्रकाराला आळा घालण्याकरिता सुद्धां बातमीपत्रांचा छान उपयोग करतां येतो. उदाहरण घेऊनच हा मुद्दा अधिक विशद करूं. केडगांवीं ११०८ सत्यनारायण झाले. नंतर स्वाहाकार म्हणा किंवा यज्ञ म्हणा कांहीं तरी धार्मिक समारंभही झाला. तन्निमित्त झालेली द्रव्यहानि किती होती आणि त्या द्रव्याचा विनियोग शिक्षणासारख्या अधिक उपयुक्त कार्याकडे करतां आला असता, अशा आशयाची टीका एका पत्राच्या संपादकाला करावयाची आहे. तिजसाठीं त्यानें अग्रलेखाचे चार स्तंभ ( ? ) खर्ची घालण्यापेक्षां दोन अडीच कॉलमाचें केडगांवचें बातमीपत्र लिहिलें तर तें अधिक परिणामकारक होईल यांत तिलप्राय संशय नाहीं. इतर बातमीदारांनीं तेथील व्यवस्थेचा, तेथील बंदोबस्ताचा, खाण्यापिण्याच्या सुव्रत्तेचा, धार्मिक व पूज्य वातावरणाचा, वाटेल तितका निर्देश करून, बातमीपत्रें लिहिलीं असतील. पण हा विशिष्ट हेतूनें आलेला बातमीदार तें मुळींच लिहिणार नाहीं किंवा तें लिहूनही एकंदर द्रव्य किती लागलें, तें जाळल्यापासून किंवा अजीर्ण झालेल्यांना पंच पक्वान्नाचें भोजन आग्रह करून वाढल्यानें, काय काय फायदा झाला असा विचार वाचकाचे मनांत उत्पन्न करील. नवरावायकोंची ११०८ जोडपीं आकंठ तृप्त झालीं — नव्हे त्यांनीं पानांत वाटेल तितकें अन्न टाकून दिलें, पण 'बेटा'बाहेरच

जन्मभर अर्धपोटी राहणारी किती मंडळी मोठया उत्सुकतेनें कांहीं अन्नाचा लेश मिळेल या आशेनें पहात बसली होती, याचें वर्णन तो बातमीदार अवश्य देईल. " विस्तवांत × × मण तूप ओतल्यानें काय पुण्य लाभलें याबद्दल तेथें असलेल्या अनेकांना शंका आली, पण स्पष्टपणें बोलण्यास कोणीच तयार नव्हता, " अशी पुष्कळांची बकिली सुद्धां तो करील. लोकांची अंधश्रद्धा वाढविण्यामुळें देशहित साधतें काय याची चर्चा तेथें कित्येकांची चालली होती म्हणून तो सुचवील. किंवा ह्या सर्व प्रकारानें खरोखर लोकहित काय साधलें असा प्रश्नही तो उपस्थित करील. अंधश्रद्धेची, अविचारानें आपली बुद्धि गहाण ठेवण्याची किंवा देवाच्या दरबारीं सुद्धां ' दलाल ' असतात व ते व्यापारी दलालाप्रमाणेंच दलालीसाठीं धडपडतात, या हीन वृत्तीची टर उडविण्यास तो कमी करणार नाहीं. सगुणोपासना व निर्गुणोपासना हा वाद उपस्थित करूनही त्या प्रसंगाचें वैयर्थ्य स्पष्ट करील. अशा नाना तऱ्हेनें तो आपलें कार्य साधील. या सर्व लिखाणाचा हेतु हा कीं, आपलें ध्येय कोणतें व तें आपण बातमीपत्रांतून कसें साधावें याचा पूर्ण विचार बातमीदारानें केलेला हवा.

दुसरें एक उदाहरण पहा. महात्माजींनीं साबरमतीहून दांडीकडे प्रथम कूच केलें, ( १९३० मार्च – एप्रिल ) तेव्हा बहुतेक सर्व देशी पत्रांनीं त्यांच्यामागें जमलेल्या घोळक्यांचें, लोकांतील अपूर्व उत्साहाचें, जंगी स्वागताच्या थाटाचें, त्यांच्या कार्याला मिळणाऱ्या सहानुभूतीचेंच वर्णन केलें. इतकेंच काय, मी स्वतःही तसें करण्यांत होतोंच. ' टाइम्स ' चा बातमीदारही तेथें असे, आमच्यांत मिसळे. पण त्याचीं पत्रें गांधींच्या अनुयायांना व खुद्द महात्माजींनाही बोचणारीं व टोचणारीं असत. आमच्या ( देशी पत्रांच्या बातमीदारांच्या ) व 'टाइम्स' च्या दृष्टींत वास्तविक फरक नव्हता. म्हणजे त्याला दिसे तेंच आम्हीही पहात असूं. पण कोणता मजकूर ग्राह्य व कोणता त्याज्य हें ठरविण्यांतच सर्व येई. आम्ही टाकून दिलेला मजकूर म्हणजे कानाडोळा केलेल्या बाबी ' टाइम्स ' नें सर्वांच्या डोळ्यांत भराव्या म्हणून प्रामुख्यानें छापल्या. आणि थोडयाफार फरकानें आजही तसेंच चालतें. इतक्या विस्तारानें ही गोष्ट सांगावी लागली याचें कारण तिचें महत्त्व व ती साध्य करण्यास लागणारी जागरूकता समजावी

म्हणून. ‘ अंबालाल साराभाई गांधींना भेटले ’ असा आमचा नुसता निर्देश असावयाचा; तर टाइम्सनें ‘ आश्रमांतील कामधेनु ’ ( दुभती गाय ) असें विशेषण लावून त्यांच्या कडूनच गांधींना द्रव्याचा पुरवठा होतो असें ध्वनित केलें. अशा किती तरी गोष्टी सांगता येतील. असो.

पक्षाभिमानाची बाब एकदां चांगल्या तऱ्हेनें मनावर ठसली कीं, मग प्रत्येक लिखाणांत ती दृष्टी राहील. साधे अपघात लिहितांना, नवीन करांच्या युक्तायुक्ततेची चर्चा करतांना, मजुरांच्या संपाचें विवेचन करतांना, सरकारच्या कृत्यावर टीका काराना, संस्थानी वातावरणांतील बातमी देताना,......अनेक प्रसंगीं बातमीदाराचा कल कुणीकडे झुकला आहे तें आपसूक बाहेर पडतें. “ गिरणी मालकांना यंदा फारच नुकसान सोसावें लागल्यानें, हिंदी कापडाचा धंदा नीट चालावा म्हणून मजुरींत कपात करणें प्राप्त आहे, ” अशी तरफदारी कोणी मजूर करणार नाहीं. एकाद्या शेटयाचा आश्रितच अशा प्रकारची भाषा बोलेल. “ बाहेरच्या चळवळ्यांनीं × × × संस्थानांत जाऊन नसते उपद्व्याप आरंभणें अत्यंत गैर होय. संस्थानी सरकारनें योग्य ते उपाय योजल्यास मग ओरड करतां यावयाची नाहीं. ” हा दिखाऊ सल्ला × × × संस्थानचा मिंधा असलेलाच देईल. “ सावकार सफाई बुडाला ” अशी ओरड करणारा शेतकऱ्यांचा शत्रूच असला पाहिजे. इत्यादि बाबी अजूनसुद्धा कोणा कोणाला समजल्या नाहींत आणि म्हणून एका विवक्षित दृष्टीनें त्याना बातमीपत्रेंही लिहितां येत नाहींत. अर्थात् हा दोष विचारानें व स्वयंशिक्षणानेंच घालवावा लागतो. असो.

पक्षाभिमानी लिखाणाचा मुख्य रोख, थोडक्यांत सांगावयाचें तर, दोष झांकण्याकडे आणि गुणांवर अधिक भर देण्याकडे असतो. ही बाब इतकी स्पष्ट आहे कीं तिच्या पुष्टयर्थ उदाहरणें देण्याची आवश्यकता दिसत नाहीं. पुणेंकरावर नेहमीं होत असलेला गहजब पहा किंवा अत्रे — वरेरकर वाद पहा, श्री. केळकरांवर वारंवार होणारी टीका पहा, त्यांत सर्वच गोष्टी खऱ्या आहेत किंवा सगळ्याच सर्वस्वी खोटया आहेत असें नव्हे. प्रत्येकाच्या विशिष्ट धोरणाप्रमाणें आपल्या चष्म्याची काच रंगीत करूनच जर जो तो बघूं लागला, तर त्यांचें एक मत व्हावें कसें आणि तें करावें कुणीं ? आपणांस त्या कोणत्याही

वादांत शिरावयाचें नसून पक्षाभिमानानें दोन्ही बाजू कशा रंगल्या – नव्हे कशा रंगावतां येतात – तेवढेंच पहावयाचें होतें. मात्र पक्षाभिमानी दृष्टीचा असा दुरुपयोग होऊं नये, विनाकारण आपसांतच अशी लाथाळी माजूं नये, मूळ ध्येय अशानें दूर ढकलूं नये, इतकी इच्छा प्रकट केल्यावाचून राहवत नाहीं.

पक्षाभिमानी लिखाण हें दुधारी शस्त्र आहे. त्याचा उपयोग विधायक व विध्वंसक अशा दोन्ही प्रकारें होतो. नुसती बातमीपत्रें लिहिण्यानेंच हें साधतें असें नव्हे. मुलाखती घेतां येतात, गांवांत ‘ बोलवा ’ आहे म्हणून लिहिलें तरी चालतें, मला विश्वसनीय माहिती मिळाली म्हटलें तर भागतें, अशा विविध प्रकारानें लोकांत नसेल ती चर्चा सुरू करतां येते किंवा मंदगतीनें चालत असल्यास तिला अधिक चालना देतां येते. लोकमतावर नकळत पगडा वर्तमानपत्रांचा बसतो तो असाच. रोज सकाळीं वर्तमानपत्रें भडक शब्दांत हिंदु-मुसलमानांच्या तंटयांचीं वर्णनें देऊं लागलीं, तर दोन्ही धर्मांच्या अनुयायांत अधिकच विरोध माजेल, हें उघड आहे. ‘ तीन ठकां ’ च्या गोष्टीसारखाच थोडा बहुत प्रकार हा वर्तमानपत्राचा होतो. चांगल्या हेतूनें सत्कार्य साधण्यासाठीं तें केलें तर उत्तम. त्याचा दुरुपयोग झाला तर तो दोष करणाराचाच. साधी व्यवहारातली गोष्ट पहा. “ अलीकडे तुझ्या अंगावर मास येऊं लागलं हाँ – प्रकृती छान दिसतें वाटतं, ” असें कांहीं मित्रमंडळींनीं एका स्नेह्याला वारंवार विचारलें ( आणि त्याला खरोखरच जालीम व्याधि जडली नसेल ) तर तो बाळसेदार बनत जाईल. पण याच्या उलट, “ काय रे, अलीकडे तूं रोडावत कां चाललास ? गालफडें किती बसलीं, पहा तर ! ” असें म्हटल्यास कांहीं होत नसतांही तो प्राणी सुकत जाईल. हा अनुभव लक्षात घेतल्यास वर्तमानपत्रांनीं ओरड चालविली असते तिची यथार्थ महति कळेल. आणि विशिष्ट पक्षाचीच पत्रें कां वाचावीं हें समजेल. पण तो आपला प्रस्तुतचा विषय नव्हे.

पक्षाभिमानी लिखाणाची आवश्यकता समजल्यावर त्याचा लोकमत बनविण्यास उपयोग कसा करावा तें सांगितलें पाहिजे. वर्तमानपत्रकर्ता कुठल्या तरी एका राजकीय पक्षाला सामील होतो म्हणा, किंवा त्याचे विचार त्या पक्षाच्या

तत्वांशीं जुळते असतील म्हणून म्हणा, तो एकाद्या पक्षाचा बनतो. आणि मग त्या पक्षातील लोकांना त्या पत्रांत आपलेपणाचा मान मिळतो. म्हणजे, समजा, सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या पत्रांत, त्या संस्थेच्या सभासदांचा किंवा हितचिंतकांचा गौरव अधिक विस्तारानें येईल. त्यांच्यावर कोणी टीका केली तर तिचा उल्लेख युक्तीनें टाळतील, त्यांच्या भाषणाला प्राधान्य मिळेल, निवडणुकींत त्यांनाच पाठिंबा मिळावा अशी खटपट चालेल,....वगैरे वगैरे. ह्याच प्रकार इतर सर्व पत्रांत चालणार यांत शंका नाहीं. पण बातमीदारानें या सर्व विवेचनापासून लक्षांत ठेवावयाचें तें हें कीं, आपल्या वर्तमानपत्राच्या पक्षांतले सभासद म्युनिसिपालिटींत, लोकलबोर्डांत किंवा अन्यत्र सभेंत कुठें आहेत, हें पाहिल्यावर ते काय बोलतात, त्याच्या भाषणाला थोडीशी अधिक जागा द्यावयाची, त्यांची कोणी चेष्टा केली, अथवा त्यांच्या अंगावर एखादी बाजू उलटली तर तिचा 'आपलेपणा' नें उल्लेख आटोपावयाचा. कांहीं कांहीं बातमीदार प्रतिपक्षीयांची टर उडविण्याची संधि हुडकीत असतात. पण कुचेष्टेनें प्रतिष्ठा वाढत नसते, हें लक्षांत ठेवल्यास अशा लिखाणाचा उपयोग लेखकाची दुष्किर्ती फैलावण्याकडेच होतो हें अनेक अनुभवांनीं सिद्ध करतां येईल. एखादे वेळीं प्रतिपक्षीयांवर विनोदी कोटीचा हल्ला चढवावा; पण त्याला कुचेष्टेचें स्वरूप येऊं देऊं नये.

आत्मीय भावनेनें स्वपक्षीयाकडे पहावयाचें, याचा विपर्यस्त अर्थ करून दर वेळीं त्यांचेंच समर्थन करणें मूर्खपणाचें ठरेल. आपल्या राजकीय अथवा सामाजिक वादापुरती त्यांची कड घ्यावयाची असा संपादकीय शिरस्ता असल्यानें स्वपक्षीयांची ओतप्रोत स्तुति करण्याकडे बातमीदारानें कधींच कल ठेवूं नये. वर्तमानपत्रांत अवास्तव स्तुति आली असतां, त्या व्यक्तीची वास्तविक किंमत कमीच होते, बातमीदारावर नाहीं तो आरोप येतो, संपादकांच्या बाण्यास त्यामुळें बट्टा लागतो. कसें तें उदाहरणानेंच सिद्ध होईल.

> "—डेक्कन मर्चेटस् असोसिएशनचे उत्साही सेक्रेटरी व वजनदार पुढारी श्री. माधवरावजी गोडबोले यांच्या-सारखा करारी गृहस्थ नियामक मंडळाचा अध्यक्ष आहे. श्री. ए. एच्. कुळकर्णी हे धिमे व शांत स्वभावाचे

गृहस्थ ऑफिसर - इन् - चार्जच्या जागीं आहेत. नियामक मंडळाच्या एक सेक्रेटरी कुमारी कमला भागवत यांना इंटर सायन्सच्या परीक्षेंत युनिव्हर्सिटीकडून शिष्य-वृत्या मिळाल्या असतांही त्या नाकारून राष्ट्रीय चळवळींत भाग घेऊन भरीव कार्य करण्याच्या उद्देशानें त्यांनीं स्वयंस्फूर्तीनें आपला विश्वविद्यालयीन अभ्यासक्रम सोडला आहे. कोणतीही चळवळ यशस्वी होण्यास त्यांतील कार्यकर्ते विनयशील, थंड स्वभावाचे व **प्रसिद्धीच्या पाठीमागें न लागणारे** असे असावे लागतात. आतांपर्यंतच्या अनु-भवावरून असें दिसतें कीं, कमला भागवत यांच्या आंगीं हे सर्व गुण आहेत. नियामक मंडळाच्या दुसऱ्या सेक्रेटरी कोयना सावे याची तडफदारपणाबद्दल ख्याति आहे.— ”

— हा सर्व मजकूर अवास्तव स्तुतीच्या सदरांत बसेल कीं नाहीं ? ‘ विन-यशील, थंड स्वभावाचे व प्रसिद्धीच्या पाठीमागें न लागणारे ’ असे हे कार्य-कर्ते ( पण कमला भागवत यांच्याच अंगीं हे सर्व गुण असल्याचें समजतें ) असतां, हा विचारवन्त बातमीदार त्यांना प्रसिद्धी कां देतो ? बातमीदाराच्या एकंदर रोखावरून तर असें दिसतें कीं कशाची तरी भरपाई करण्यासाठीं त्यानें हा स्तुतिपाठ रचिला असला पाहिजे. एरवीं अशी मुक्त कंठाची प्रशंसा वर्तमानपत्रांत सहसा येत नाहीं. बातमीदाराला वरील कार्यकर्त्यांनीं विकत तर घेऊन ठेवलें नाहीं ना ? अशी वारंवार शंका लिखाण वाचून येते. हा संभव शक्य ती खबरदारी घेऊन टाळावा.

पक्षाभिमानाच्या दृष्टीनें रंगविण्याचे प्रसंग म्हणजे म्युनिसिपल अथवा कौन्सिल — असेंब्लीच्या निवडणुकी. एका विशिष्ट उमेदवारांची तरफदारी करावयाची असली म्हणजे संपादक × × × च मतें द्या असा आग्रह संपादकीय लिखाणातून न करतां बातमींतून त्याचा उल्लेख वारंवार येईल असें करतात. म्हणजे वेगवेगळ्या स्वरूपाची बातमी देऊन वाचकाचें लक्ष त्या उमेदवाराकडे प्रथम वेधल्याचें व त्यालाच बहुजनसमाजाचा पाठिंबा आहे

असें भासवावयाचें. पण हें काम बेमालूमरीत्या करण्यांतच कौशल्य आहे. " मी तुमचें मत बदलूं इच्छित नाहीं. तुमच्या मनावर पगडा बसविण्याची माझी इच्छा नाहीं, " असें प्रतिपादन करीतच वाचकांच्या मनावर हुकमत चालविण्याची ही युक्ति वर्तमानपत्रांतील वाकब लेखकानांच साधते. कोणा एका उमेदवाराच्या सहीनिशीं " मला मतें द्या " अशी याचना करणारा जाहिरनामा ( manifesto ) न छापतां त्रयस्थाच्या नांवानें वेगळा लेख लिहून त्या उमेदवाराची कामगिरी जनतेपुढें मांडतां येते. अशानें लोकांच्या मनावर अनुकूल परिणाम होतो. केव्हां केव्हां वजनदार पुढाऱ्यांचें उमेदवाराला अनुकूल मतच नुसतें दिल्यानें काम भागतें. पण ही कामगिरी संपादकीय शाखेतून होत असल्यानें तिची अधिक चर्चा येथें नको.

## प्रकरण पंधरावें

# प्रतिपादन

पक्षाभिमानी दृष्टि कशी असते व तिचा उपयोग कसा करावयाचा हें सांगून झाल्यावर प्रतिपादनाकडे वळलें पाहिजे. वास्तविक पक्षाभिमान व प्रतिपादन हीं दोन्हीं प्रकरणें वर्तमानपत्रांतून विवक्षित "Propaganda" करावयाचा असतो, त्यासंबंधीं आहेत. इंग्रजींत एका शब्दानें भागणारें काम स्पष्ट करण्यासाठीं दोन प्रकरणें लिहिलीं. यांचें कारण असें कीं आधीं पत्रपांडित्यच मुळीं आमचेकडे नव्यानें सुरू झालें आहे. त्यांतल्या त्यांत विलायती अट्टल पत्रपटूंशीं सामना देऊन त्यांच्या तोडीला बसण्याइतकी राजकीय प्रगतीसुद्धां आम्हांला ह्या वर्तमानपत्रातूनच साध्य करावयाची असल्यानें आमच्याकडे ह्या विद्येचा अभ्यास अधिक व्हावयास हवा.

पक्षाभिमान हा केवळ दृष्टिभेदाचाच प्रकार मानतां येईल. पण प्रतिपादन म्हणजे विशिष्ट मत दुसऱ्यावर लादण्याचा प्रयत्न होय. 'शारदा बिला' विरुद्ध 'मूठभर' व सनातनी चळवळ करतात; किंवा 'बहुजन समाजाला तो कायदा नको आहे' हा दृष्टिकोनाचा प्रश्न होऊं शकेल. पण हिंदी जनता असल्या महत्त्वाच्या बाबींवर मत देऊं इच्छितच नाहीं – ही गोष्ट जिव्हाळ्याची आहे हें त्यांना पटलेंच नाहीं – असा डांगारा पिटत राहणें अगदीं निराळ्या वृत्तीचें निदर्शक आहे. मिस् मेयोची दृष्टि अशापैकींच. हिंदी राजकीय वाद निघाला म्हणजे कसला तरी जुना पुराणा सांस्कृतिक इतिहास दाखवून आर्योंची मनमोक्त स्तुति करणें, हिंदूंच्या प्राचीन श्रेष्ठत्वाबद्दल गौरवयुक्त उद्गार काढणें, त्यांच्या धार्मिक भावनेचे गोडवे गाणें, हे सर्व प्रकार विशिष्ट मत-प्रतिपादनाचेच होत. फक्त आमच्यापैकीं बहुतेकांना ते कळत नाहींत – कळलें तरी वळत नाहींत – हीच खेदाची गोष्ट आहे.

प्रत्यक्ष उदाहरणें दिल्याविना असल्या विधानाची सत्यता पटत नाहीं. हिंदुस्थानांत 'गडबड' माजली होती, 'अशांतता' नांदत होती ( किंवा हिंदी जनतेचा राजकीय हक्काबाबत सरकारशीं झगडा चालू होता ) तेव्हां

इंग्लंडमध्यें म्हणे चर्चमधून हिंदुस्थानच्या कल्याणार्थ प्रार्थना होत, आणि तत्संबंधींच्या ताराही इकडे येत. आतां या तारांचा खरा हेतू पहा. इंग्लंडमध्यें हिंदुस्थानाविषयीं अत्यंत कळकळ आहे असें भासविणें राज्यकर्त्यांना केव्हांही हितावह असतें. बरें, तेवढ्यावरच संतुष्ट राहणारे हरीचे लाल कांहीं कमी नसतात. आपणांसाठीं ही प्रेमळ माय ' नवस ' करते असेंच जणूं काय त्यांना वाटतें. पण ह्या मायावी प्रकारास भुलून कसें चालेल ?

दुसरेंही एक उदाहरण पहा :– चीनमध्यें कत्तली झाल्याच्या, पुरानें, तापानें, रोगानें माणसें दगावल्याच्या बातम्या येतात, त्यावरून पाहतां चीन आतापर्यंत ओस पडावयास पाहिजे होता ! पण तसें कांहीं झालें नाहीं. तीच बाब तुर्कस्थान स्वतंत्र होण्यापूर्वीची. त्यावेळीं ( महायुद्धा नंतर ) तुर्कांनीं केलेल्या अत्याचारांचें वर्णन खरें मानावयाचें, तर तुर्कस्तान किंवा त्यांतील आर्मिनियन प्रजा शिल्लक कशी राहिली याचेंच आश्चर्य वाटेल. इतक्या भरमसाट अतिशयोक्तींच्या व विशिष्ट प्रकारचा विपर्यास केलेल्या खोट्या बातम्या सर्वत्र पसरविण्यांत येत. * म्हणून कुठलीही जागतिक परिषद असो, मोठा समारंभ होवो, तत्संबंधींची बातमी देणारी वेगळी मंडळी खास नेमतात व त्यांना पाहिजे त्याच प्रकारचें मत लोकावर लादणाऱ्या बातम्या त्यांचे मार्फत जगाला कळतात. राष्ट्र संघाचीच ताजी गोष्ट पहा. इतके दिवस त्याचा उदो उदो किती झाला आणि प्रत्यक्ष उपयुक्ततेचा प्रश्न उपस्थित होताच, त्या संघाचें खरें दुबळें स्वरूप बाहेर आलेंच ना !

इतकें विषयान्तर झालें याचें कारण प्रतिपादन ही एक वर्तमानपत्राच्या धंद्यांतली मुख्य बाब आहे, ही गोष्टच आमचे पत्रपटु विसरतात. त्यांना निःपक्षपातीपणाचा मोह पडतो. कारण पाश्चिमात्य पत्र-पंडित, पुस्तकी, तोंडी, लेखी उपदेशाचा प्रसंग आला कीं, अगदीं सोंवळ्या कर्मठ ब्राह्मणाचा आव आणून सत्य प्रतिपादनाचें तुणतुणें वाजवितात. वर्तमानपत्रानें बातमी ' रंगवूं ' नये, असत्य प्रतिपादन करूं नये, सत्याचीच कास धरावी, असा पुष्कळ शालेय उपदेशपाठ त्यांचेकडून मिळतो. बातम्या रंगवून सत्पक्षाला

* पहा — *Asia at Cross-roads, by A. Powell.*

दडपणारे व तनुविक्रय करणारे यांत फरक कुठला ? अशीही पृच्छा ते करतात. पण हा सुद्धां स्वतःचें मत दुसऱ्यावर लादण्याचा – प्रतिपादनाचा – हटकून साधणारा मार्ग आहे ! वर्तमानपत्राकरवीं जपाननें आपली प्रगति झपाट्यानें केली, तशी कोरियानें करावी ही इच्छा जपानची असेल कशी ? आणि त्यासाठीं जपानकडून कोरियाला सवलती कशा मिळतील ? कोरिया ' यावच्चंद्रदिवाकरौ ' जपानच्या अंकित राहण्यांतच जपानचें ( कोरियाचें नव्हे ) हित आहे अशी तेथील अधिकारी वर्गाची समजूत असल्यानें, कोरियानें मुळींच प्रगति करूं नये अशी ' शास्त्रोक्त ' खटपट जपान साहजिकच करणार. जपाननें दुसऱ्यावर चढाई करावी, वाटेल त्यांना चिरडावें, न्याय्यान्याय्य पाहूं नये. आणि कोरियानें मात्र कशाचाही ' प्रतिकार ' करूं नये, तें ' पातक ' होईल, त्यानें ' राजनिष्ठेला कलंक लागेल. ' राजनिष्ठ राहण्यांतच कोरियनांचा फायदा आहे, असे वरचेवर मात्रेचे वळसे जपान देईल – अगदीं व्यवस्थितपणें दिवसांतून तीन वेळ, वर्तमानपत्रांतून, भाषणांमधून, रेडियोंतून – शक्य त्या मार्गांनीं ही खटपट होईल. पण खरें काय मानावें, याचा विचार केल्यास प्रतिपादनाचें यथार्थ महत्त्व समजेल. ' जीवो जीवस्य जीवनम् ' हें तत्त्व सर्वत्र लागू पडत असल्यानें लांडग्याचें हित तें मेंढराचें अहित, वाघाचा फायदा तो हरिणाचा प्राणघात, असे विरोधी संबंध पटतील. आणि प्रत्येकाचा दृष्टिकोन निरनिराळा असल्यानें प्रतिपादनही वेगवेगळें कसें होतें तें लक्षांत येईल.

ह्या प्रतिपादन प्रकरणांत तसें पाहूं गेलें असतां संपादकीय अधिकारांतल्याच बाबी येतील असें मुळींच वाटूं देऊं नये. बातमीदाराला त्यांतली मख्खी कळल्याखेरीज वर्तमानपत्राचा हेतु त्याला साधतां येणार नाहीं. सर्व धड्यांत कठिण भाग असेल तो हाच. तो शिकविण्यास स्वतःचा अभ्यासच उपयोगी पडेल. कोणा विवक्षित शाळेंत अथवा गुरूपाशीं ती विद्या शिकतां येणार नाहीं. समजा, एका पत्रांतून हिंदुमहासभेचें मत प्रतिपादन करावयाचें आहे. म्हणजे हिंदू व मुसलमान यांतील मूल भेद काय आहे हें सतत समजावून सांगण्यासारखेंच होय. अशा वारंवार प्रतिपादनानें हिंदूंच्या व मुसलमानांच्या दृष्टिकोनांतील तफावत स्पष्ट मांडतां येते. पक्षाभिमानाची चाळिशी डोळ्यावर असेल तर फक्त घडलेली बातमी देण्यांतच

काय तो थोडा बहुत फेरफार करता येईल. पण विशिष्ट प्रतिपादन करण्याचा चंग बांधलेला असतो तेव्हा जरा अधिक मेहनत घ्यावी लागते. स्वामी श्रद्धानंदाची पुण्यतिथी असली, तर त्या निमित्तानें त्या तारखेपर्यंत हिंदु समाजाविरुद्ध वैयक्तिक अत्याचार किती, कुठें, कसे केले, साधिक हल्ला करून हिंदूंच्या मिरवणुकी कोठें अडविल्या, किती जणाना जखमी केलें, वगैरे यादी तयार केली कीं, हिंदुसंघटनेची अवश्यकता आपोआप पटते. बंगाल्यांत हिंदूंवर घडणारे अत्याचार – विशेषतः हिंदु स्त्रिया पळवून नेण्याचे प्रकार – पुष्कळ घडतात. तेव्हा अशाची जिल्हानिहाय, तारीखवार यादी दिली, गुन्हेगार सांपडला कीं नाहीं, शिक्षा झाली किंवा तो सुटला, अशी माहिती त्या यादींत समाविष्ट केली, तर हिंदु समाजांत संघटनेची प्रबल इच्छा प्रकट झाल्यावाचून राहणार नाहीं. डॉ. मुंजे अथवा भाई परमानंद यांच्या भाषणानें – प्रत्यक्ष दौरा काढून – काम साधणार नाहीं तें अशा पत्रकानें, त्यांतील आंकडयांवरून होईल. मात्र नुसता आंकडेवारीचा तक्ता भरतात तसें करून मुळींच भागणार नाहीं. मजकूर कोणता दिला असतां मत–प्रतिपादन होऊं शकतें तें सांगण्यासाठीं हें उदाहरण घेतलें. आकडे कशा प्रकारें माडावे तें पुढें यथावकाश येईलच.

हिंदु सभेचें विशिष्ट मत हें केवळ उदाहरण म्हणून घेतलें. त्याच प्रमाणें मजूर पक्ष, समाजसत्तावादी, परदेशी व्यापारी, स्वदेशीचे पुरस्कर्ते – जसा पक्ष असेल तशी विषयाची निवडणूक करतां येते आणि तदनुसार आपणांस पाहिजे ती विचारसरणी वाचकांच्या मनावर, त्यांना न कळत लादतां येते. आणखी कांहीं उदाहरणें घेऊं. महात्मा गांधींची चळवळ थंडावली. लोकांना तिचा कंटाळा आला. पण आंतल्याआंत धुमसत राहणारा असंतोष ( गांधींच्या अनुयायांतलाच ) बाहेर पडला कसा ? अहमदाबाद – पुणें – सुरत येथील बातमीदारांनीं पत्र लिहितांना मध्येंच एक मेख ठोकली, " स्थानिक कार्यकर्त्यांना प्रचलित कार्यक्रमाचा कंटाळा आला आहे. पण स्पष्टपणें बोलून दाखविण्यास कोणीच तयार नसल्यानें जो तो आपल्याच जागीं तडफडत बसतो. लवकरच ही सर्व मंडळी गांधींना विरोध करणार असें दिसतें. कांहीं कांहीं तरुणांना तर हा विरोध तावडतोब करावा असें वाटतें व म्हणून त्यांची

आपसांत गुप्तपणें चर्चाही चालू आहे." एवढें वाचून तरुणांच्या मनांत नसलें तरी किंवा त्यानीं खरोखरच विचार केला नसेल तर ते आपल्या नवविचारांना चालना देतात. बातमीदाराला हें कसें कळलें याबद्दल जो तो आश्चर्य करीत राहतो. पण अशाच रोखानें आणखी २–४ आठवडे बातमीदारानें पत्रें लिहिलीं कीं, त्याचें उद्दिष्ट सफल होतें. तरुण गांधींना विरोध करण्याची तयारी करतात. लोकांत गांधींच्या कार्यक्रमाविरुद्ध मत बनत जातें. अशा प्रकारें जन-मनावर पगडा बसविण्याचें कार्य विलायती पत्रें ( म्हणजे विलायतेंतून येणारी व विलायती मंडळींनीं एतद्देशीय म्हणून चालविलेलीं देखील ) फार वस्ताद आहेत. जपान कोरियाचेंच मागें सांगितलेलें उदाहरण घेतलें, तर कोरियानें जपानच्याच ताब्यांत राहण्यांत त्याचा फायदा आहे असें कोरियन लोकांच्या मनावर वारंवार ठसविण्यासाठीं त्यांची धडपड चालू असते. जपानशीं संबंध जडल्यानें कोरियाची लोकसंख्या इतकी वाढली, रेल्वे, तारा, पोस्ट यांचें जाळें इतकें पसरलें, आयात–निर्यात व्यापार असा फुगला, शिक्षण प्रसार तितका झाला, वर्तमानपत्रें इतकीं निघालीं – एक ना हजार बाबींचा घंटानाद वारंवार कोरियनांच्या कानावर करीत राहिल्यानें त्यांना साहजिकच वाटावयास लागतें कीं, " होय बुवा, जपानचे आपणांवर अगणित उपकार झाले आहेत. आतां आपण त्यांच्याच तंत्रानें चालावें हें बरें, विनाकारण फुटून वेगळें होऊन तरी काय करावयाचें ! चांगला संरक्षक. पालक मिळाला आहे, त्याच्याशीं भांडा कशाला ! " एवढ्यावरच ही विचारसरणि थांबत नाहीं. जपानचें लष्करी, आरमारी, वैमानिक सामर्थ्य किती दांडगें आहे, त्यांच्या पोलिस खात्याची व्यवस्था कशी सर्वांगीण परिपूर्ण अशी आहे, तींतून कुणीही निसटणें मुळींच शक्य नाहीं, राज्ययंत्रांतील प्रत्येक घटक किती हुषार व कार्यमग्न आहे, इत्यादि प्रकार लोकांच्या मनावर कायमचे बिंबावे म्हणून असल्या उपायांचा – नाटकाचा – सिनेमाचा – वर्तमानपत्रांचा – रेडियोचा – अवलंब जपानी सरकार अवश्य करतें. सिनेमांत कोणत्याना कोणत्या तरी निमित्तानें फौजेची पहाणी, आरमारी हालचाली, वैमानिक पराक्रम अशांचीं चित्रें दाखविलीं कीं, प्रेक्षकांच्या मनावर त्या राष्ट्राच्या सामर्थ्याबद्दल भीति वाटल्यावाचून राहील कशी ? जपानी पोलिसांनीं असा असा गुन्हेगार मोठ्या खुबीनें पकडला, त्यासाठीं तसें तसें ढोंग केलें, त्याच्या पाळतीवर अशा प्रकारें राहिले, वगैरे वर्णन रोजच्या बातमींत येत राहतें त्याचा कोरियन

लोकांवर परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. आपणाकडेही लबाडीच्या, चोरीच्या किंवा जुवेबाजीच्या गुन्हेगाराना पकडतात तेव्हां पोलिसाची शिताफी थोडीशी वर्णन केल्यानें नवीन गुन्हेगाराना दहशत बसते. पोलिस फार हुषार आहेत, त्याना फसविता येणार नाहीं, अशीच त्यांची खात्री होते. तेव्हां ह्या सर्व बारीक सारीक गोष्टी लक्षात घेऊनच सगळें लिखाण लिहावें लागतें. असो.

पक्षाभिमानी दृष्टि ठेवावी असें सांगतांना मागें म्हटलेंच आहे कीं, विशिष्ट बातमींत थोडा ' रंग ' मिसळल्यानें पक्षाभिमानी लिखाण तयार होतें. प्रतिपादनाचें तसें नाहीं. एखादी बातमी बातमी नसेलच. म्हणजे त्यांत वर्णिलेली हकीकत मुळातच खरी नसेल. ती फक्त बातमीदाराच्या, संपादकांच्या कल्पक डोक्यांतून निघूं शकते. किंवा ' राईचा पर्वत ' करण्यातही ते पत्रपंडित वाकब असतील. सांगण्याचा मतितार्थ असा कीं, पक्षाभिमानाची वरची पायरी म्हणजे प्रतिपादन होय. आणि म्हणून पक्षाभिमानी बातमीदारच विशिष्ट प्रकारें प्रतिपादन करूं शकेल. पक्षाभिमान आगीं मुरला नसेल तर प्रतिपादन साधावयाचें नाहीं. पुनः उदाहरणं घ्यावीं लागतात. मुसलमानांच्या ' मोठमोठ्या ' सभा, मजलसी, भरल्याची बातमी व त्याचा सविस्तर रिपोर्ट फक्त अँग्लो-इंडियन पत्रातच आढळतो. इतर पत्राना त्याचा सुगावासुद्धां लागत नाहीं. कुठल्या तरी संस्थानच्या महाराजांनीं ' मेजवानी ' च्या प्रसंगीं भाषण केलें त्याचा विस्तृत सारांश फक्त विशिष्ट पत्रानाच मिळतो. ती बातमीसुद्धा — म्हणजे भाषण झालें एवढें देखील — दुसऱ्या पत्रांना समजत नाहीं. अशा प्रकारच्या घडामोडींतली मख्खी म्हणजे ' प्रतिपादनी कावा ' ही होय. तसें म्हटलें तर, आपल्या भाषणाची, सभेची, प्रसिद्धी व्हावी हीच ज्याची त्याची इच्छा असतां फक्त एकाच विवक्षित पत्राला ती सविस्तर बातमी मिळते व इतराना त्या प्रसंगाची दादही नसते, ह्या कोडयाचा उलगडा होत नाहीं, याचें कारणही तेंच. प्रतिपादनी दृष्टि असेल त्यालाच सर्व समजेल. ' जें न देखे रवि तें देखे कवि ' म्हणतात तें ह्याच अर्थी.

आतांपर्यंतच्या चर्चेवरून हा विषय संपादकीय विभागांत यावयास हवा अशी बातमीदारांची समजूत होईल व ती कांहीं अंशीं रास्तही आहे. परंतु

बातमीदारानें ह्या गोष्टींकडे लक्ष द्यावयास हवें. आपण लिहितों त्या मजकुराचा किती दूरवर परिणाम होत असतो हें त्याला कळावयास नको ? शिवाय, हा धंदाच असा आहे कीं, त्यांत प्रगति भराभर होत जाते. मात्र आपली ज्ञानग्रहण-शक्ति व पत्रपांडित्य केव्हांही तुंबवून ठेवतां कामा नये. म्हणून नवशिक्याला-सुद्धां सर्व अंगोपांगांची माहिती व्हावी याच हेतूनें हें प्रकरण थोडक्यांत आटोपलें पाहिजे. निवळ याच विषयावर खास ग्रंथ लिहिता येईल, हजारों बारीक सारीक उदाहरणें काढून दाखवितां येतील; पण तसें करणें हा प्रस्तु-तचा हेतु आहे कुठें ?

आपणांकडे प्रतिपादनी दृष्टीचा अलिकडे फारच अभाव दिसतो. कांहीं पत्रें प्रतिपादन करतात. पण तें कशाचें ? शुद्ध पंचांगाचें, गीता-धर्म मंडळाचें, गणेशोत्सवाचें, हिंदु सभेचें किंवा फार तर वर्णाश्रमधर्माचें. राजकीय दृष्टीनें एकाद्या राष्ट्रीय चळवळीचें किंवा प्रचलित वादाचें मधून मधून प्रतिपादन झालें आहे. नाहीं असें नाहीं. पण राजकारणाला – राजकीय प्रतिपादनाला – बहुतेकांनीं विशेष महत्त्व दिलेंच नाहीं असे म्हणावें लागते. शुद्ध पंचांगाप्रमाणेंच ठिकठिकाणीं ग्रहणाचा स्पर्श-मोक्ष काल होतो हें अनेक गांवच्या रिपोर्टांवरून लिहिल्यानें बहुजन समाजाला तें पंचांग ग्राह्य वाटतें. तीच गोष्ट इतर लहान सहान बाबींची आहे. पण मोठया जिव्हाळयाच्या प्रश्नाविषयीं मात्र सर्वत्र औदासिन्य पसरलेलें दिसतें. घडलेल्या गोष्टी फार तर पक्षाभिमानपूर्वक छाप-ण्यांत आमचीं पत्रें तत्पर म्हणता येतील. पण प्रतिपादन असें त्यानीं फारसें केलें नाहीं. म्हणून या महत्त्वाच्या अंगाचें महत्त्वच त्यांना पटलेलें दिसत नाहीं. परंतु ह्या तक्रारी येथें करून काय फायदा ? अस्तु.

प्रतिपादन करतांना आंकडयाचा उपयोग कसा खुबीनें करतां येतो तें सांगून हें प्रकरण आटोपतें घ्यावें. बहुधा पुष्कळांना आकडे–शास्त्र किचकट वाटतें. आंकडे पाहतांच त्याच्या डोक्यांत तिडिक उठते. पण ह्या आंकडयांच्या सहाय्यानेंच किती तरी उपयुक्त व महत्त्वाची माहिती वाचकांपुढें मांडतां येतें. व थोडी चलाखी केल्यानें आक्षेपकांनाही निरुत्तर करणें सोपें होतें. एखाद्या शाळेंतून समजा, मॅट्रिक्युलेशन परीक्षेला तीनच विद्यार्थी गेले व तिघेही पास झाले तर निकाल " शंभर टक्के " लागला म्हणून बढाई

मारतां येते. पण एकंदर वर्गात ३३ मुलें असतां त्यांतील फक्त तिघानांच परीक्षेस बसतां आलें ही गोष्ट मात्र, शाळेची बढाई मारतांना, नजरेआड ठेवतात. हा व्यवहार नीट लक्षांत घ्यावा. इष्ट असेल तेव्हा शेंकडा × × टक्के सांगून, किंवा " आणेवारींत " आकडे कल्पून, पट करून, अशा विविध प्रकारें आकडयांचा उपयोग करावा लागतो. नुसते तक्ते दिल्यानें, वाचक वाचीत नाहींत आणि आंकडेशास्त्र्याला त्यांवरून अनुमानें काढता येतात, तशी सर्व साधारण वाचकाला साधत नाहींत. म्हणून थोडा तरी खुलासा त्या आकडयाबरोबर हवाच. ब्रह्मदेशात १९२९ सालीं १२१ लक्ष एकर जमीन भाताच्या लागवडीकडे होती असें नुसतें म्हणण्याऐवजीं किंवा सालोसालचे नुसते आकडे टिपण्यापेक्षा " एकंदर जमिनीपैकीं, रुपयांत तेरा आणे भाताकडे गुंतली होती " हें अधिक लवकर समजतें कीं नाहीं ? आणि रुपये व आणेवारी ही रीत अगदीं खेडवळांनादेखील कळेल. पण लाखों – क्रोडो रुपयाचे आंकडे मात्र समजणार नाहीत.

जरूरीप्रमाणें आकडे देतांना सरासरीही सागावी लागते. केव्हा केव्हां वाढ अथवा घट होते ती प्रत्यक्षच न सागता शेकडेवारीनेंच सागणें इष्ट असते, तर कधीं कधीं नुसत्या आकडयाच्या निर्देशानेंच काम भागतें. समजा, सरकारच्या × × × खात्यात × × × × रुपयावर दरमहा पगार असणारे ५ हिंदी गृहस्थ आहेत त्याबद्दल फार तक्रार झाली तेव्हां सरकारनें पाचाचे प्रथम आठ व नंतर दहा केले. सरकारी रिपोर्टात त्यांची वाढ प्रथमतः **साठ टक्के** व नंतर १०० टक्के अशी सागतील. पण लोकपक्षीय पुढारी, " एकंदर १२० मंडळी आहेत, त्यात पूर्वी पाचच हिंदी होती, ती मध्यंतरीं आठ झाली व आतां फक्त **दहाच** आहेत, " ही गोष्ट वेगळ्या तऱ्हेनें माडतील. हिंदी अधिकाऱ्यांचें प्रमाण पूर्वी शेंकडा ४·२५ होते तें वाढविलें तरी आतां ८·३३ एवढेंच आहे असें त्याचें गाऱ्हाणें राहील. सरकार म्हणतें, " आम्ही शंभर टक्के वाढ केली." आणि लोकपक्षीयाची ओरड अशा प्रकारची. यात दोघाचीही बाजू खरी आहे. पण कोणत्या वेळीं कोणतें प्रमाण घेऊन पुढें माडावयाचें हें नीट समजलें म्हणजे प्रतिपादन उत्तम करतां येतें.

प्रतिपादनाचें महत्त्व पटविण्यासाठीं हें प्रकरण लिहिलें. एवढयानें ती कला

साध्य झाली नाहीं तरी हरकत नाहीं. परंतु निदान प्रतिपक्षीयांना उपयोगी पडेल असें प्रतिपादन आपल्या तरी हातून होऊं नये, हें समजण्यासाठीं या लिखाणाचा उपयोग झाला म्हणजे पुरे. मोठमोठया पत्राचे बातमीदारही असल्या बाबतीत कशा चुका करतात तें सांगितल्यास हसूं येईल — मराठींतील पत्रपाडित्य अगदींच बाल्यावस्थेंत असल्याची खात्री पटेल. हें उदाहरण पहाः—

सत्याग्रह चळवळ — दुसरा हंगाम — चालू असतां मुंबईंत सोलापूर-दिन स्वयंसेवकांनीं साजरा केला. त्याचें वर्णन तेथील "आमच्या प्रतिनिधीनें" एका पत्रास कळविलें. वर्णन चांगलें लाबलचक आहे. 'ट्रॅमपुढें सत्याग्रह' या शीर्षकाखालीं हे प्रतिनिधी काय म्हणतात तें वाचा.

> "गिरगांव भुलेश्वर...वगैरे भागांत व्हिक्टोरिया अगर अगर टॅक्सी गाडया फारशा चालू नव्हत्या. परंतु ट्रॅम गाडया मात्र चालू होत्या. **ट्रॅमगाडया बंद पाडण्या-करतां शहरांत कोठेंही लोकांनीं रुळावर दगड ठेवले नाहींत अगर इतर कोणताच अत्याचार केला नाहीं.**"

या विधानाचा अर्थ काय किंवा तें करण्यांत हेतु कोणता असावा? ट्रॅम बंद पाडण्यासाठीं लोकांनीं काय काय केलें **नाहीं** हें सांगण्याचीच मुळीं आधीं काय जरुरी? बरें, तें सांगावयाचें म्हटलें तर नुसते 'दगड' ठेवले नाहींत असें म्हणण्याइतकें दगडावरच प्रेम का? आडवे ओंडके ठेवले नाहींत, बॉंब आणले नाहींत, डायनामाईट लावले नाहींत, 'सुरुंग' खोदले नाहींत, सांखळ्या आणून टाकल्या नाहींत, रूळ उखडले नाहींत, अशी ही यादी विस्तृत करता आली असती. हें तर राहूंच द्या. पण अशा लिखाणाचा परिणाम काय होतो? विरोधी पक्षीयांना मुंबईची चळवळ अनत्याचारी ब्रीदापासून च्युत झाली, हें दाखविण्यास हा पुरावा भरपूर आहे. किंवा असाही आरोप त्या प्रतिनिधीवर यावयाचा कीं, त्यानें हें सर्व सूचित करून चळवळ्यांनीं ट्रॅमपुढें नुसता अनत्याचारी सत्याग्रहच केला, त्याऐवजीं त्यांनीं ट्रॅम्स बंद पाडण्यासाठीं कांहीं तरी जालीम उपाय योजावयास पाहिजे होते असें दर्शविलें. पण प्रतिनिधी इतके शहाणे दिसत नाहींत. त्यांच्या हातून चुकूनच

पडलेली ही घोडचूक आहे. म्हणजे त्यांना साधा व्यवहारसुद्धां समजत नाहीं. त्याच पत्रांतील दुसरा उतारा पहाः—

"लाल मैदानावर जो गोळीबार करण्यांत आला त्यापूर्वी **सर्व बाजूंनीं दगडांचा वर्षाव तर होत नव्हताच** पण लोक बहुशः शांतच होते. पोलिस म्हणतात त्याप्रमाणें एखाद दुसरा दगड आला असें मानलें तरी गोळीबार करण्यासारखी परिस्थिती उत्पन्न झाली होती कीं काय हा मोठा प्रश्नच आहे!"

ह्यावरून काय समजावें? पोलिस 'एखाद दुसरा दगड आला' असें म्हणतात तर हे प्रतिनिधी सर्व बाजूंनीं दगडांचा वर्षाव होत नव्हता असें प्रथम बजावतात. ट्रॅमच्या उदाहरणांतलीच घोडचूक या उताऱ्यांत पुनः आढळते! प्रतिनिधींना बातमीपत्रें लिहिण्याचें तरी खरेंखुरें ज्ञान आहे कीं नाहीं हाच मोठा प्रश्न पडतो. या दोन्ही उताऱ्यांतील सर्व दोष दिसत असूनही मला दाखवितां येत नाहींत. पण सूज्ञ वाचक ते सहज जाणतील. आणि आणि अत्यंत आश्चर्याची व खेदाची बाब ही कीं, हा मजकूर संपादकीय संस्कारानंतर छापण्यास दिला तरी त्यांतील हे मोठे व ढोबळ दोष तसेच राहून गेले!

अशा प्रकारें बातमीपत्रांचा दुरुपयोग होऊं नये इतकें प्रतिपादन प्रकरणावरून समजलें तरी बस्स! प्रस्तुत विवेचनाची मर्यादा लक्षांत घेतां, प्रतिपादन चर्चा थोडक्यांतच आटोपावी हें ठीक. प्रतिपादन साधण्याचे अनेक मार्ग मार्ग असतात, त्यांचा उल्लेखसुद्धां करतां आला नाहीं. तो भाग तूर्त तरी आपणांस नको.

## प्रकरण सोळावें

# बातमी पत्रें

संपादकीय नियंत्रणाखालीं बातमीदार प्रत्यक्ष काम करीत असतां त्याला कोणतीं कामें पडतात व तीं कशी पार पाडावीं यांबद्दल विवेचन झालें. आतां संपादकांच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं न राहतां बातमीदाराचें काम कसें करावें तें पहावयाचें आहे. नागपूरच्या पत्रांत जबलपूर, वर्धा, अकोला, यवतमाळ, उमरावती, वगैरे ठिकाणचीं बातमीपत्रें येतात, तीं पुरविणारांचें काम कसें करावें ? हा प्रश्न विशेष महत्त्वाचा वाटेल. कारण आपला नित्य व्यवसाय संभाळून सुद्धां हें काम करणारी बरीच मंडळी असतात. आणि त्यांना हा एक जोडधंदा मिळाल्यासारखें होतें. पण त्यांतील माहिती नसेल तर तो नीटपणें साधणार नाहीं.

जिल्हानिहाय अथवा मुख्य मुख्य ठिकाणीं नेमलेले हे बातमीदार दर आठवड्यास, आठवड्यातून दोनदां अथवा रोजींसुद्धां आपल्या पत्रास बातमीपत्रें पाठवितात. वेळप्रसंग पडल्यास तारा किंवा टेलिफोन करून जरूरीची खबर कळवितात. त्यांचें ठिकाण बातमी 'पैदा' करण्यास ज्या मानानें लायक असेल, किंवा त्यांच्या गांवाचें व पत्र निघतें त्या शहराचें 'नातें' जसें असेल, त्या प्रमाणांत बातमीपत्रें कधीं कधीं पाठवावीं हें ठरेल. मुंबई पुण्याचा संबंध अगदीं निकटचा. मुंबईचे गव्हर्नरच मुळीं चार महिने पुण्यास तळ देतात. अंतरही कमी. पुणें राजकीय चळवळीचें केंद्र एके काळीं होतें आणि महाराष्ट्राचें केंद्र आजही आहे, म्हणून तेथील बातमीस मुंबईत अधिक महत्त्व. परंतु पुण्याच्या बातमीपत्रास कराची किंवा तंजावर येथील मराठी वर्तमानपत्रांत जागा मिळेल, तशी इंग्रजी पत्रांत मिळणार नाहीं. तसेंच, मुंबईत कोंकणांतील लोकांची गर्दी अतिशय आहे. म्हणून कोंकणांतील बातमीपत्रांस मुंबईच्या मराठी पत्रांत प्राधान्य देतील. वाचक वर्गाची संख्या आणि बातमीच्या महत्त्वाचें मोजमाप यांवर बातमीपत्रांची लांबी ठरत असते.

प्रथमतः ' बातमीदारी ' कशी मिळवावी तें सांगतों. एखादें पत्र आपल्या गांवीं बरेंच खपतें, ४०–५० प्रती येतात, अधिकही वाढण्याचा संभव आहे, असें ठाऊक असल्यास संपादकांना पत्र लिहावें. गांवाचें महत्त्व, लोकसंख्या, मोठमोठ्या शहरापासूनचें अंतर, रहदारीचीं साधनें, टपालाची सोय, शिक्षितांचा भरणा, चळवळीची माहिती, व्यापारी, शेतीचें, किंवा दुसरें कसलेंही असल्यास महत्त्व, हें सांगून बातमीदाराचें काम करण्याची आपली तयारी दर्शवावी. माझ्या लेखनाचा नमुना म्हणून एक ' बातमीपत्र ' लिहून पाठवावें. मूळ पत्रावरून आणि बातमीपत्राच्या नमुन्यावरून संपादकाला बातमीदार होऊं पहाणारांची परीक्षा करतां येते. आणि मग बातमीदाराची नेमणूक होते. परंतु आपली आपण स्तुति त्यात करूं नये. एकादा बातमीदार पूर्वीपासूनच काम करीत असला, पण तो अयोग्य असल्याचें आपणास समजलें तर, त्याची नालायकी सिद्ध झाल्याशिवाय संपादक त्याला बदलीत नाहींत. त्याच्या व्यक्तिगत वागणुकीशी संपादकाला सहसा कांहीं करावयाचें नसतें. फक्त बातमीपत्रें पाठविण्यात त्याची अयोग्यता सिद्ध झाली म्हणजे पुरे. तेव्हां विनाकारण एकाद्याची नालस्ती करून त्याचे जागीं मला नेमा असा लकडा संपादकाकडे लावूं नये. बातमी देण्यात तो कुचराई अथवा दिरंगाई करीत असेल तर खरें बातमीपत्र कसें लिहावयास पाहिजे तें आपण लिहून संपादकांकडे पाठवावें. मग दोन्ही बातमीपत्राची तुलना आपोआपच होईल. बरें वाईट पारखून निवेल. असें तीनचार वेळ केल्यानंतर आपली ओळख संपादकांस करून द्यावी. पण स्वतःची बढाई मारूं नये. आपली गांवात ओळख किती आहे, किती वर्षें आपण तेथें रहात आहों, पक्षोपक्ष गावांत असले तरी आपण अलिप्त आहों कीं नाहीं, कोणत्या पक्षाचें प्राबल्य आहे, दोन्ही पक्षांकडील बातमी आपणच कां देऊं शकूं, वगैरे लिहावें. यापेक्षां सविस्तर सूचना देण्याचें कारण नाहीं. बाकीच्या ' अटी ' आपसांत ठरवून घ्याव्या. तो व्यवहार प्रस्तुत पुस्तकांत येत नाहीं. असो.

बातमीदाराची नेमणूक होतांच त्याचें पहिलें काम हें कीं त्यानें गांवातील चकाट्या पिटण्याचे अड्डे असतील त्यांची माहिती करून घ्यावी. कोर्ट कचेऱ्या, गांवांतील प्रतिष्ठित मंडळी, सार्वजनिक संस्था, सरकारी अधिकारी, या सर्वांची

माहिती हवी. मोठमोठया लोकाची ओळख सुद्धां पाहिजे. रस्ते, वाटा, बोळ यांच्याशीं परिचय करून ठेवावा. आजूबाजूचीं मोठीं गावें कोणतीं तीं नकाशावर खुणा केलेलीं असावीं. आपल्या जवळचा आपल्या पत्राचा (व दुसऱ्या पत्रांचाही) बातमीदार कोण, त्याचें कार्यक्षेत्र कोणतें व आपलें कोणतें हें निश्चित ठरविलेलें असावें. म्हणजे घोटाळा उडत नाहीं. खेडेगावीं दरबार किंवा शेतकी प्रदर्शन भरतें, किंवा शेतकऱ्यावर हल्ला होतो, दरोडा पडतो. तेव्हां तें खेडें कुणाच्या (वर्तमानपत्री) हद्दींत आहे हें नीट ठरलें असल्यास बरें. तेथील घडामोडींची बातमी कोणीं द्यावी याचा निर्णय निश्चितपणें लागलेला असला म्हणजे ठीक. नाहीं तर दोघांनीं तीच बातमी पाठवावी किंवा दोघानींही पाठवूं नये, असे अनिष्ट प्रकार व्हावयाचे.

बातमीदाराचें दुसरें महत्त्वाचें काम म्हणजे आपल्या गावाहून टपाल केव्हां केव्हां जातें, उशिरांत उशिरां केव्हां, कुठें टपाल टाकतां येतें, तारा कुठून केव्हां करावयाच्या असतात, टपाल किंवा तारा, आपल्या पत्राला केव्हां पोहोंचतील, इत्यादि माहितीचा तक्ता नेहमीं समोर ठेवला पाहिजे. वेळोवेळीं त्यांत बदल होतो, तोही त्यांत नमूद करावयास हवा. येणाजाणाऱ्या गाडयांची वेळसुद्धां ठाऊक असावी. कित्येक वेळां टपाल मार्गें मजकूर पाठविल्यास तो पोहोंचण्यास उशीर लागतो, तेव्हां जरूरीचा मजकूर कसा पाठवावा याची सर्व माहिती ठाऊक पाहिजे. वैमानिक टपालाची सोय आपणांस केव्हा उपयोगी होईल, express fee लावून पोस्टांतून धाडलेला मजकूर किती अवकाशांत पोहोंचेल, अथवा late fee देऊन रेल्वे स्टेशनवर टाकलेलें पत्र किती वाजतां पोहोंचेल या सर्व बाबींची खरीखुरी माहिती बातमीदारास असावी. कांहीं कांहीं वेळीं 'रेल्वे पार्सल' नें बातमीचा मजकूर पाठवितां येतो त्याही प्रकाराशीं आपली ओळख करून घ्यावी. केव्हां तरी पोस्टांत पाकीट टाकण्यास कुणाजवळ तरी द्यावयाचें, म्हणजे आपली जबाबदारी संपली असें बातमीदारानें कदापि समजूं नये. दुसऱ्यावर विसंबण्याचे बाबतींत तर हिंदुस्थानात अधिक कडक सल्ला द्यावा लागेल. आणि म्हणून होतां होईल तो स्वतःच पत्रें पोस्टांत टाकावी किंवा तारा करण्यास जावें; या कामासाठीं शक्य तो मोठया कचेरीकडे धांव ठोकावी असें सांगितलें पाहिजे. रस्तोरस्तीं असणाऱ्या पोस्ट पेटयांचा किंवा छोटया तार

ऑफिसांचा उपयोग होतां होईल तो करूं नये. त्यानें विलंब लागण्याचा संभव अधिक, म्हणून तो मार्ग टाळावा.

ही पूर्व तयारी एवढयानेंच संपत नाहीं. आपण राहतों त्या ठिकाणचे दरवर्षी होणारे प्रमुख समारंभ, वार्षिक उत्सव, सरकारी दरबार, स्थानिक स्वराज्य संस्थांचे कार्यक्रम, जत्रा, आसपासच्या ठिकाणीं होणारे उत्सव, वगैरेंची माहिती त्याचे जवळ असावी. आपल्या टापूंत राजमान्य मंडळी कोण कोण, लोकाग्रणी कोणती, खेळाडू कोणते, बडे व्यापारी कोण, वकिलातील अग्रेसर कोण...अशा सर्वांची यादी करावी. बातमीपत्रात त्याचाच उपयोग करावा. वादग्रस्त मुद्दयावर किंवा इतर कसल्याही कारणासाठीं मुलाखती घेण्याचा प्रसंग आला तर कुणाला कशा कशा संबंधीं भेटता येईल हें टिपण त्या बातमीदाराजवळ तयार असावें. संपादक त्याला असें असें कर म्हणून सांगेल कसा ! बातमीदारानेच ताडलें पाहिजे, कीं संघ्यांच्या बाजारांत मोठी उलाढाल होणार आहे तेव्हा, × × × चे शेट × × याची मुलाखत उचित होईल. वर्तमान पत्रात औचित्य आणि वक्तशीरपणा यालाच सर्वांत अधिक महत्त्व असतें. आर्थिक वाद निघाला तर कुणाची मुलाखत घ्यावी, सिनेमाच्या धंद्यांत खळबळ उडविणारा प्रश्न उपस्थित झाल्यास त्याविषयीं अधिकारयुक्त वाणीनें बोलणारे कोण, क्रिकेटचा सामना झाला तर त्यावर कुणाचें मत घ्यावें, अशा विविध भानगडी निघतात. तेव्हां त्या त्या विषयाचे अधिकारी कोण म्हणून आयत्या वेळीं डोकें खाजवीत बसण्यापेक्षा आधींच सर्व तयारी केलेली बरी.

त्याचप्रमाणें प्रमुख अधिकारी व बातमींत येऊन बसणाऱ्या व्यक्तींचीं संपूर्ण नांवें त्यांच्या हुद्दयासह – पदव्या-डिग्र्यां-सह – लिहिलेलीं असावींत. वर्तमानपत्रांत आपलें नांव आल्यानें प्रत्येक जण बहुधा खूष होतोच. पण त्यांत कांहीं चूक झाली, उपपदें गळलीं तर मात्र त्यांना राग येतो. गो. चिं. कुळकर्णी म्हणण्याऐवजीं उलटापालट करून कुणी चिं. गो. कुळकर्णी म्हणून लिहिलें तर कुलकर्णी महाशय खास रागावतील. बातमीदाराला पुष्कळ नावें लक्षात ठेवावीं लागतात तेव्हां ही चूक क्षम्य आहे, असें त्यांना मुळींच वाटावयाचें नाहीं. म्हणून अचुक नावें देण्यासाठीं सर्व

माहिती जवळ हवी. मात्र " तात्यासाहेब " " दादासाहेब " अशीं टोपण नांवें वर्तमानपत्रीं रिपोर्टांत सहसा लिहूं नयेत. यानें विनाकारण घोंटाळा माजतो आणि नसती सलगी दर्शविल्यासारखें होतें.

पोलिसठाणीं, इस्पितळें, फायर ब्रिग्रेड, कोर्टें, म्युनिसिपल कचेऱ्या, लोकलबोर्डाचीं ऑफिसें, शाळा, क्रीडामंडळें, क्लब व इतर सार्वजनिक संस्थांत बातमीदाराची ओळख हवी. ह्या ठिकाणीं रोज अथवा आठवड्यांतून एक दोन वेळां — जरूरीप्रमाणें चक्कर मारण्याचा परिपाठ ठेवावा. तेथून माहिती मिळते. मिळालेली सर्वच माहिती विस्तारानें सांगावयाची नाहीं. दैनिकाला तारेनें पाठवावयाची बातमी व टपालानें पाठवावयाचा मजकूर यांतही पुष्कळ फरक पडतो. समजा, एकादा मोटारचा अपघात महाबळेश्वर पुणें रस्त्यावर घडला. तारेनें त्यासंबंधीं बातमी जाईल तींत अपघाताचें स्वरूप, प्राणहानि, व्यक्ती महत्त्वाच्या असल्यास त्यांचीं नावें, कोठें केव्हां घडला तें ठिकाण आणि स्पष्टच असल्यास अपघाताचें कारण, एवढा मजकूर पुरे होईल. पण टपालानें रिपोर्ट जाईल त्यात मोटार कुणाची, नंबर, केव्हा, कुठून, कशी निघाली, आंत मंडळी कोण कोण होती, अपघात कसा घडला, कुणा कुणाला जखमा झाल्या, असा पुष्कळ विस्तार सांगतां येईल. आणि अपघात कोठेंही घडला असो, कोणत्याही समाजात, अज्ञात प्रदेशात असो, त्याची बातमी सर्वांनाच वाचनीय वाटते. म्हणून कुठल्याही अपघाताची बातमी **ताबडतोब** द्यावी. शिळी झाल्यानें तिचें वाचनीय महत्त्व कमी होतें. अपघातांची बातमी वाचावीशी कां वाटते तें येथें पुनः सांगण्याची जरूरी नाहीं.

अपघाताखेरीज इतर बहुतेक घडामोडींचा रिपोर्ट सावकाश दिला तरी चालतो. पण बातमीदारानें मजकूर लिहून तयार झाला कीं आपल्या कचेरीकडे पाठवून द्यावा. संपादकाला त्याचें महत्त्व वाटलें तर तेवढाच ताबडतोब प्रसिद्ध होईल. " उद्यां लिहून परवा पोस्टांत टाकूं " ही आज घडलेल्या प्रसंगाची तऱ्हा कुठल्याही दैनिकाच्या बातमीदाराला ' परवडणार ' नाहीं. ज्या दिवशींची बातमी त्या दिवशीं पोस्टांत पडलीच पाहिजे हा शिरस्ता समजून चालल्यानें तोटा मुळींच होणार नाहीं.

एखादी विशेष मोठी परिषद् आपल्या गांवीं भरणार असली तर ती किती

'अवकाशांत' बसवावयाची, तत्संबंधीं काय व्यवस्था करावयाची, वगैरे माहिती संपादकांकडून आधीच मिळवून ठेवावी. कोणी 'खास' बातमीदार आला असेल, तर त्याच्याच तंत्रानें चालावें. कारण अशा विशेष प्रसंगीं संपादक एक खासा प्रतिनिधी पाठवून देतात आणि स्थानिक बातमीदार त्याचा मदतनीस म्हणून काम करतो. वास्तविक अशा वेळीं उच्च नीच भाव प्रकट मुळींच करूं नये. वर्तमानपत्री वातावरणांत अशा भेदाला जागा नसते. पण आपल्या अडचणी काय आहेत, मुख्य कचेरींतले उत्तम पत्र-पंडित कोण, त्याच्यापासून कोणता गुण घ्यावा, या शाखेंत नवी प्रगति कशी होत आहे; इत्यादि विविध माहिती त्या खाशा स्वारींकडून मिळते. ती अवश्य मिळवावी. असे स्वतःला शिकवणूक देण्याचे प्रयत्न बातमीदारानें व्यर्थ दवडूं नयेत.

बातमीदाराला तारा कराव्या लागतात, तेव्हां त्या व्यवस्थितपणें लिहिण्याचेंही ज्ञान असावें. वर्तमानपत्री तारांना विशेष सवलती मिळतात. त्यांचे फॉर्म निराळे व आकारही वेगळा. तसेंच तारा लिहिण्याची पद्धति नेहमींच्या रितीपेक्षां थोडीशी निराळी आहे. घरगुती तारांमध्यें शब्दाची काटकसर पुष्कळ करतां येते. कारण १०—१२—१५ शब्दांतच सर्व मजकूर कळवावयाचा असतो. वर्तमानपत्रांचें तसें मुळींच नाहीं. घरगुती तारांना पत्ता धरून १२ शब्दांची मर्यादा असते तशी वर्तमानपत्रांना पत्ता वगळून ४८ शब्दांची असते. शिवाय वर्तमानपत्री तारांची लांबी हजार बाराशें शब्दांपर्यंत सुद्धां नेहमीं जाते. तेव्हां त्या लिहिण्याचा सराव असावा. इंग्रजी वर्तमानपत्रांतील तारांच्या बातम्या वाचून तारा कशा लिहाव्या, म्हणजे मजकुराची मांडणी कशी करावी हें लक्षांत येईल. पण वर्तमानपत्रांतही न दिसणाऱ्या अशा कित्येक गोष्टी तारा करणाराला माहिती असाव्या लागतात. उदाहरणार्थ, तारेंत इतर विरामचिन्हें सहसा नसून फक्त पूर्णविरामच उपयोजितात, पण तो शब्दांनीं लिहितात. नुसतें . असें लिहिलेलें तारेंतून दुसऱ्या ठिकाणीं पाठविणें त्या गडबडींत तार मास्तरना शक्य नससें. त्यांची अडचण लक्षांत घेऊन व विशेषतः वर्तमानपत्राच्या सोईकडे लक्ष देऊन "stop" असें पूर्णविरामाऐवजीं लिहिल्यानें काम भागतें. विनाकारण एक शब्द वाढला, नुकसान होणार, अशा क्षुद्र व चिकटंभटी विचारांत अशा प्रसंगीं पडतां येत नाहीं. कारण पूर्णविराम नसल्यानें वाक्यांचा

भलताच अर्थ होण्याचा संभव असतो. संभव नसेल तेव्हां stop असें न लिहितां म्हणजे अक्षरीं विराम न सांगताही काम चालवितां येतें. तसेंच कित्येक शब्द कंसात अथवा अवतरणात घातल्याविना त्यांचा अर्थ होत नाहीं. एतद्देशीय भाषांतील वृत्तपत्रांनाही तारा इंग्रजींतून पाठवाव्या लागतात, त्यामुळें कित्येक देशी शब्दांना इंग्रजी प्रतिशब्द नसल्यानें ते तसेच ठेवायचे असतात. असले शब्द इंग्रजींत लिहून मागें पुढें "quotes" ( म्हणजे अवतरण चिन्ह ) "brackets" ( म्हणजे कंस ) अशा अक्षरी लिपीचा उपयोग करावा. त्यानें बरीच सोय होते. एखादे वेळीं कांहीं मजकुराबद्दल चौकशी करावयाची असली, संपादकीय खात्याचें खास लक्ष त्याकडे वेधावयाचें असलें, तर तारेच्या मजकुरांतच "Editor" असें संबोधून काय असतील त्या सूचना कळवाव्या. कित्येक आधार पहावयाचे असतात, नांवात चूक झाली असें वाटतें, तेव्हां संपादकाला तशी जाणीव तारेच्या मजकुरांत करून देता येते. पण अशी टोचणी संपादकाला वारंवार दिल्यानें बातमीदाराची किंमत कमी होते हें विसरूं नये.

केव्हां केव्हा एका तारेंत बातमी संपविल्यानंतर आणखी मजकूर हातीं येतो. त्याची तार करतांना सुरवातीस " मागील तारेवरून पुढें चालू " अशी सूचना तारेच्या मजकुरांत द्यावी. विशिष्ट मजकुरापुढें आणखी मजकूर घाला असेंही कधीं कधीं तारेंतून कळवितां येतें. पण हें सर्व ठाऊक असलें पाहिजे. तारेच्या एका फॉर्मवर जास्तींत जास्त ७५ शब्द बातमीदारानें लिहावयाचे असतात. ह्या तारांत एका ओळींत पाचहून अधिक शब्द लिहून चालत नाहीं. अक्षर सुवाच्य काढावें, सुटें सुटें लिहावें, हें सांगण्याची सुद्धां आवश्यकता भासते. तारेचे फार्म फुकट मिळत असल्यानें विनाकारण अदूरदर्शी काटकसर करून पुष्कळ खोडाखोड केलेले फार्म वापरूं नयेत. म्हणजे तशा तारा लगेच वेगळ्या लिहून पाठवाव्या. मध्यंतरीं एखादा शब्द खोडला असल्यास तेथें ' छोटी सही ' करावी. प्रत्येक फॉर्मवर आपला व आपल्या पत्राचा ठराविक पत्ता देऊन पृ. १, २, ३, असें अनुक्रम घालावे. तार पुढील पानावर चालू असल्यास M. T. F. ( more to follow ) लिहून सही ठोकावी. शेवटच्या फॉर्मवर E. O. M. ( end of message ) अशा अक्षरां-

निशी सही करावी. ही सूचना केवळ तारखात्याच्या उपयोगासाठीं असते. संपादकीय मजकुरांत आपल्या तारेंतील अधुरेपणा दाखविण्याकरितां वेगळी सूचना लिहावी लागेल. कित्येक वेळा तासा तासाला तारा पाठवाव्या लागतात, – क्रिकेट मॅच परिषदा, कौंसिलें वगैरे प्रसंगीं – तेव्हां सर्व दिवसाच्या कामाचें समालोचन सर्वांत अखेरीस लिहिणें भाग पडतें, त्यावर “ प्रथम घेणें ” असा शेरा लिहावा. म्हणजे संपादकीय व्यवस्थेत कांहीं घोटाळा उडणार नाहीं.

अलीकडे टेलिफोन मार्फतही बातमी पाठविण्याचे प्रसंग बातमीदारावर वारंवार येतात. दिल्ली – मुंबई, मुंबई – कलकत्ता अशा दूरदूरच्या ठिकाणींसुद्धां टेलिफोनद्वारां बोलतात. फार काय, साता समुद्रापलीकडे राहणारांशींही ’फोननें संभाषण करण्याचा प्रघात सध्यां जारी होत असता, बातमीदारांस त्या नवीन दूरध्वनियंत्राचा उपयोग करतां आला पाहिजे. टेलिफोनमधून कळवावयाची बातमी, तारा लिहून ठेवतात तशी कागदावर लिहून काढावी व मगच ती पाहून टेलिफोनमधून बोलावे. विनाकारण स्वतःच्या स्मरणशक्तीवर भलताच विश्वास टाकल्यानें महत्त्वाचे मुद्दे गळतील. सांगितलेला संदेश लिहून घेणाराला वाचण्यास सांगून कांहीं चूक झाली आहे काय तें पहावें.

तारा लिहाव्या कशा किंवा टेलिफोनमधून संदेश कसे धाडावे हें सांगितल्यावर आलेल्या तारा वाचाव्या कशा किंवा टेलिफोननें येणारी बातमी घ्यावी कशी हें वेगळें सांगण्याची जरूरी उरत नाहीं. तेव्हां बातमीपत्राच्या लेखनाची तयारी करण्यास हरकत कसली ?

बातमीदाराला कळलेली माहिती, किंवा लिहिलेल्या तारा, बातमीपत्रें, हीं संपादकाखेरीज इतर कुणाला ही दाखवूं नयेत. “ उद्यां येईलच छापून, आज मग मी पाहिलें म्हणून काय बिघडतें ” अशी पृच्छा पुष्कळ जण करतात. आणि त्यांच्या मार्फत आपली कीर्ति फडकते अशा क्षुद्र अपेक्षेनें कित्येक बातमीदार तें लिखाण बऱ्याच जणांना दाखवितात सुद्धां. हा वृत्तपत्रीय शिस्तीचा अक्षम्य भंग होय. बातमीदारानें ठाऊक असलेली बातमी प्रत्यक्ष तोंडातोंडी सांगावयाची नाहीं. ती वर्तमानपत्रांतूनच कळली पाहिजे. म्हणून गौप्य राखण्याकडे विशेष लक्ष असावें.

बातमीपत्रांत प्रथम गांवाचें नांव व तारीख अवश्य हवी. पत्र कोठून व कधीं लिहिलें हें कळलें नाहीं, तर त्यांत वाचकांना अधिक गोडी लागणार नाहीं. कित्येक वेळीं ' हेडिंग ' वरूनच बातमीपत्र कुठलें हें समजतें. परंतु ' कर्नाटकचें बातमीपत्र ' लिहितात कुठून ? मध्यप्रांतीय बातमीपत्र काय मध्यप्रांत नांवाच्या ठिकाणाहून लिहितात ? बरें, तें कधीं लिहिलें हें सांगण्यास काय जातें ? वास्तविक पाहतां, आमच्याकडे अगदीं ताज्या बातम्या येतात ही बढाई मारण्यासाठीं, संपादकांनीं बातमीपत्रावर तारखा घालण्याचा आग्रह धरावयास पाहिजे. परंतु, अंदरकी बात सांगावयाची तर, हीं पत्रें बरींच शिळीं असतात – नव्हे कोणत्या ना कोणत्या तरी ( अनिवार्य ? ) कारणामुळें पडून राहतात. तीं उशिरा छापताना संपादकीय संस्कार म्हणून, तारखा गाळून टाकतात. तें कसेंही असो, बातमीदारानें आपणाकडून चूक होऊं देऊं नये. वर्तमानपत्राकडे पाठवावयाचा कागद शक्य तितका पातळ पण न फुटणारा असा वापरून, लिखाण एका बाजूस लिहावें, ' मार्जिन ' सोडावें, आणि सुरवातीच्या पानावर डाव्या हातच्या कोपऱ्यांत, समजा, ' पुण्याचें बातमीपत्र ' असें लिहावें. मथळे बातमीदारानें होतां होईल तों लिहूं नयेत. लिहिले तरी सर्वांत आधीं मथळेच लिहून ठेवण्याचा प्रघात आचरूं नये. प्रत्येक ' बातमी ' चा एक वेगळा छेदक करावा आणि दोन छेदकांत जागा अधिक सोडावी. लिहितांना अक्षर कोरून सूक्ष्मदर्शक यंत्रानें पाहण्यासारखें न काढतां, मोकळें, सुटें व मोठें लिहिण्याकडे प्रवृत्ति ठेवण्याचें कारण मुद्रकाचे हाल होऊं नयेत हें होय. तसें म्हटलें तर ' कंपॉझिटर ' कशाही प्रकारचें लिखाण लिहिलेलें असो, तें जुळवून दाखवितात ही त्यांच्या कौशल्याची बाब असली, तरी त्यांच्या शक्ति विनाकारण नेहमींच ताणण्यांत अर्थ नाहीं. म्हणून लिखाण ' सुवाच्य ' असावें.

कागदाचा आकारही कोणता घ्यावा ? यासंबंधीं सूचना दिल्या पाहिजेत. बातमीदारानें लेखासंबंधीं मुख्य काळजी बाळगावयाची ती ही कीं ठराविक शब्दांत लिखाण आटोपण्याची खूणगांठ आधींपासून ठरविलेली असावी. हिंदुस्थान सरकारचे फडणीस 'बजेट' सादर करतात तशाच प्रकारें किती शब्दांत कोणत्या बातमीचा समाचार घ्यावयाचा, एकंदर बातमीपत्राचा विस्तार किती

शब्दांत आटोपावयाचा, याचा अंदाज केलेला असावा. आणि हा अंदाज करण्यासाठीं ठराविक आकाराचाच कागद नेहमीं वापरला तर काम सोपें होतें. ओळी आंखल्या असतील तर इतक्या कागदांत आपल्या पत्राचा एक कॉलम भरतो — किंवा × × × शब्द होतात, हा हिशेब सरावानें आगवळणीं पडेल. शब्द मोजण्यास अंदाजें सरासरी काढल्यानें काम भागतें. कागद विशेष रुंद किंवा अधिक लांब घेऊं नये. कारण टाइप जुळवितांना लांब कागद असतील तर ते कापून तुकडे करून पुष्कळ मंडळींत वाटून देतात. नाहीं दिले, तर ठराविक मुदतींत मजकूर जुळून व्हावा कसा ? ह्या मुद्रणालयांतील सर्व व्यावहारिक अडचणींचा विचार बातमीदारानें करून आपलें लिखाण लिहावें म्हणजे सर्वांची सोय होते. असो.

'पुण्याचें बातमीपत्र' ही खूण पहिल्या पानावर डाव्या कोपऱ्यांत लिहा म्हणून म्हटलें. तशीच पुढील पानावरही — मात्र संक्षिप्त स्वरूपांत — लिहून मग त्यावर कागदांचा अनुक्रमही लिहावा. म्हणजे पु. बा. १, पु. बा. २, पु. बा. ३, असे खुणेचे शब्द त्या कागदावर राहतील. आणि प्रत्येक कागद वेगळा झाला तरी मग कांहीं त्रास न पडता ते जागच्या जागीं लावता येतील. पाहिजे असल्यास, उजव्या कोपऱ्यावरही अनुक्रमांक घालावा. इतक्या सविस्तर सूचना दिल्याबद्दल कोणी रागावण्याचें कारण नाहीं. कारण त्याप्रमाणें वागलें नाहीं, तर किती त्रास होतो याची कल्पना छापखान्यांत काम करणारालाच येईल. शिवाय वर्तमानपत्राच्या कचेरींत रोज अशीं ठिकाठिकाणचीं बातमीपत्रें पुष्कळ येणार. त्याची विल्हेवाट लावण्यांतसुद्धां कार्यसौकर्य व्हावें म्हणून बातमीदारानें कांहीं विचार करावयास नको ?

आतां बातमीपत्रांतील मजकुराकडे वळूं. शिरस्ता म्हणूनच नव्हे, तर मानवी हौस म्हणून, 'हवामाना'संबंधीं निर्देश बातमीपत्रांत शक्य असेल तेव्हां प्रथमारंभीं करावा. एक तर, तो प्रश्न आपण प्रत्यक्ष भेटींत एकमेकांना नेहमीं विचारतों. दुसरें असें कीं, त्यावर आपलें बहुतेक जीवित अवलंबून आहे. आणि तिसरें कारण म्हणजे तो विषय कधीं न संपणारा आहे. त्यावर लिहिलें असतां कंटाळा येत नाहीं. पावसाच्या, उन्हाच्या, थंडीच्या लहरीवर कितीही टीका केली तरी निसर्गदेवता कांहीं रागावत नाहीं. शिवाय कुठल्याही विषयाची

प्रस्तावना करण्यास हें फार उपयुक्त साधन असतें. वातावरणांतील घडामोडी-वरून कोणत्याही विषयाकडे वळण्यास फारशी अडचण पडत नाहीं. मात्र अत्यंत महत्त्वाचा विषय बातमीपत्रांत घालावयाचा असतो, तेव्हां हवामानास प्राधान्य देऊं नये.

घडलेल्या प्रसंगांची 'प्रतवारी' बातमीच्या कोष्टकावरून ठरवावी आणि मग प्रत्येकाचा वेगळा छेदक लिहावा. मृत्यूची बातमी मात्र अगदीं स्वतंत्र लिहावी. तिचा इतर भानगडीशीं संबंध ठेवूं नये. एकाच बातमीपत्रांत शोचनीय मृत्यू, अभिनंदनीय पुनर्विवाह, शाळेंतील बक्षिस समारंभ, × × × चा उत्सव, अशा मिश्र बातम्या लिहूं नयेत. मृत्यूचीच बातमी स्वातंत्र्यानें द्यावी. बाकीच्यांचें आपसांत जमेल. पण मरणाची बातमी नेहमींच वेगळी लिहिणें ठीक. बातमी-पत्रांत माणुसकीचा अंश अवश्य दिसला पाहिजे. चित्रगुप्ताप्रमाणें घडलेल्या गोष्टींची निर्विकार मनानें नोंद ठेवणें म्हणजे बातमीदाराचें काम नीट बजावणें नव्हे. पोस्टमनच्या थैलींत नानाप्रकारचीं पत्रें असतात व तीं वाचून हरतऱ्हेचे विकार उद्भवतात. पण पत्रें घरोघर वाटणारा पोस्टमन त्याविषयीं कसा बेफिकीर असतो ? तसें बातमीदारानें नसावें. पोस्टमनला पत्रांतील मजकूर कळत नाहीं म्हणून तो तसा 'बनतो,' तशी काहीं गोष्ट बातमीदाराची नसते. म्हणून मृत्यूची किंवा तसल्या भयंकर अपघाताची निराळी बातमी देऊन, मग बातमी-पत्रांत इतर सगळ्या बातम्यांची खिचडी करण्यास हरकत नसते.

आणखीही एक गोष्ट बातमीदारानें वारंवार लक्षांत ठेवली पाहिजे. बातमीदार जितका 'अनामिक' राहील तितकें उत्तम. "मी असें केलें"—"माझ्याशीं बोलतांना सर × × × असें म्हणाले" वगैरे प्रकारचे प्रथमपुरुषी उल्लेख तर टाळावेच, पण स्वतःचें नांव शक्य तोंवर बातमीपत्रात लिहूं नये. बातमी-पत्राची किंमत त्यानें कमी होते, आणि बातमीदाराचाही भाव संपादकीय दरबारीं उतरतो. बातमीदाराचें नांव संपादक सहसा कुणास सांगत नाहींत आणि कोणता मजकूर कोणीं लिहिला ह्या गौप्याचा स्फोटही उघडपणें वर्तमान-पत्र कचेरींत करीत नाहींत. हा शिरस्ता अशासाठींच कडकपणें पाळतात. अशा अनामिक लिखाणामुळेंच वर्तमानपत्राचें एकंदर महत्त्व कायम राहतें. आंपल्या हातींच लेखणी आहे, मग वाजवूं या आपलीच आपण टिमकी, अशी इच्छा

बातमीदारानें कधींही धरूं नये. श्री. न. चिं. केळकरांचें उदाहरण येथे दाखला म्हणून द्यावेंसें वाटतें. असेंब्लींत असतांना त्यांनीं लिहिलेलीं पत्रें दर आठवड्यास केसरींत येत. पण उल्लेख टाळतां येणें शक्यच नव्हतें, तेव्हां फक्त " केळकरांची उपसूचना अशी होती " – " केळकरांचें असें म्हणणें पडलें " एवढा निर्देश त्यांत आढळतो. स्वतःचें संपूर्ण नांव, पदव्या, * * * चे बातमीदार किंवा * * संपादक, अशा विभूषणांनीं स्वतःच्याच बातमीपत्रात गोवून घेणें याचा अर्थ सूज्ञ वाचक ताबडतोब ओळखतात. बातमीदाराला प्रसिद्धीची हाव मनस्वी दिसते आणि * * * चा बातमीदार म्हणूनच त्याची एवढी महति, हें समजण्यास उशीर लागत नाहीं. असल्या प्रसिद्धीच्या हावेस प्रथम बळी पडल्यानें होतकरू पत्र-पंडिताना नंतर मात्र वृत्त-व्यवसायांत कोणी विचारीत नाहीं. म्हणून नवशिक्यानीं हा सल्ला नीट लक्षात ठेवावा.

एका विवक्षित ठिकाणीं राहून बातमीदाराचें काम करणारास आतांपर्यंत सांगितलेलीं विविध कामे करावीं लागतात. याची माहिती देताना केलेल्या सूचनांची येथे पुनरुक्ति कशाला करूं ? पण हें प्रकरण संपविण्यापूर्वी अशा बातमीदाराने कांहीं कांहीं ' विद्या ' अवगत केल्या पाहिजेत, त्या विषयीं थोडक्यात लिहिलें पाहिजे. मित व मिठें भाषण, वक्तशीरपणा, टापटीप, स्वच्छता, इत्यादि गुणाची महति दुसऱ्या कोणत्याच धंद्यात नसेल इतकी बातमीदाराच्या कामात असते. मनुष्य स्वभावाचें ज्ञान, ' व्यवहार ' म्हणून म्हणतात तो जाणण्याची अक्कल, दुसऱ्याचा विश्वास आपणावर बसावा अशा प्रकारें वागणूक आणि मुख्य म्हणजे वचनाचा पक्कपणा, ह्या गुणावर बातमीदारानें अधिक भर द्यावा – वारंवार आत्मनिरीक्षण करून नसतील ते गुण संपादन करावे. इतर कोणत्याही व्यवसायांत इतक्या विविध प्रकृतीच्या मंडळींशी काम करावें लागत नाहीं. पण वृत्तव्यवसायात अनेक प्रकारच्या अनेक मंडळींशीं संबंध येतो. त्यांना एकदा दिलेला शब्द खालीं पडूं देऊं नये. आणि एकदां वचन गुंतल्यावर हरप्रयत्नें करून तें पाळावें.

शेवटची सूचना स्वत्व न विसरण्याची. बातमीदार तसें पाहिलें तर समाजांतील अत्यंत उपयुक्त घटक आहे. पण दृष्टि बदलली तर तो घातुक होऊं शकतो. म्हणून स्वतःस न विसरण्याचा सल्ला वारंवार द्यावा लागतो. गेल्या चळवळींत

डोळ्यासमोर घडघडीत घडलेलीं अशीं उदाहरणें आहेत कीं, बातमीदारांच्या मूर्खपणामुळें कांहीं कांहीं गुप्त गोष्टी उघडकीस येऊन चळवळीस धक्का बसला. हे बातमीदार शहाणे, नांवाजलेले व पदवीधर पडले. तेव्हां त्यांना मूर्ख म्हणावें कसें ? परंतु त्यांच्याही हातून अशा हानिकारक चुका घडल्या ही गोष्ट खरी. एतत्संबंधीं अधिक स्पष्ट खुलासा मला करतां येणार नाहीं. पण एवढें मी म्हणूं शकतों कीं गुप्त पोलिसांना उपयोगी अशी पुष्कळ कामगिरी, आपण काय करीत आहों याची कल्पना नसतां, लोकपक्षीय पत्रांच्या बातमीदारांनीं केली – पोलिसांच्या हुशारीस हे बातमीदार बळी पडले. असा प्रसंग आपणावर कधींच येऊं न देण्याची दक्षता बाळगावी. 'लोकतंत्रानें चाललेला' हा आरोप एक वेळ पत्करेल, पण लोकप्रिय पत्राच्या बातमीदारानें सरकारी तंत्रानें कधींच वागूं नये.

प्रकरण सतरावें

# तज्ञ बातमीदार

बातमीदारांच्या कामाची योग्य विभागणी आमचेकडे नसल्यानें तज्ञांना आम्हीं खाश्यांच्याच वर्गांत घालतों. व्यापारी किंवा आर्थिक उलाढालींची माहिती देणारा, रंगभूमीचा किंवा चित्रपटांचा 'रागरंग' कळविणारा, हे दोघेही खास बातमीदार म्हणूनच आम्ही ओळखतों. राजनैतिक किंवा राजकीय बाबींची माहिती देणाराही एक वेगळा बातमीदारांचा वर्ग कल्प-तात. पण या सर्वांहून खास बातमीदार निराळा असतो. वेळप्रसंग पडल्यास वरील भिन्न भिन्न क्षेत्रांतलीं कामें खास बातमीदार करूं शकेल. पण आर्थिक उलाढाली किंवा नाणें बाजारांतील उचापतींची खबर देणाराला, समजा, काशघर येथील बंडाळीची माहिती काढण्यास किंवा भूकंपामुळें झालेल्या नुक-सानीचें वर्णन करण्यास पाठविलें, तर तें काम त्याला साधणार नाहीं. फार काय, अशा ठिकाणीं जावें कीं नाहीं याचा विचार करण्यांतच तो आर्थिक व्यवहार-पटु महिना दीड महिना लावील! म्हणून खास व तज्ञ यांमधील भेद करणें आवश्यक आहे.

अशांच्या एका शाखेचा म्हणजे क्रीडांगणावरील बातमीदाराचा उल्लेख स्वतंत्र प्रकरणांत केला. आतां प्रथम आर्थिक व व्यापारी बातमीदाराचें काम काय असतें, तें त्यानें कसें करावें, हें पाहूं. आर्थिक घडामोडीचें आकलन होण्यास अर्थशास्त्राचें पुस्तकी व व्यवहारी ज्ञान अवश्य हवें. आणि व्यापारी जगांत वावरावयाचें म्हणजे हिंदी, गुजराथी व इंग्रजी या भाषा अवगत असल्या पाहिजेत. निदान दोन तर पाहिजेतच. कारण व्यापारांत पटाईत म्हणजे मारवाडी, भाटिया, बनिया हेच. त्यांच्यांशीं बोलतां चालतां यावयास हवें म्हणून हिंदी गुजराथीची आवश्यकता आणि जगांतल्या घडामोडींशीं ओळख व्हावी म्हणून इंग्रजीचें ज्ञान. त्यानंतर कोणा चांगल्या व्यापाऱ्यांची ओळख असणें अगत्याचें आहे. त्यांचा विश्वास संपादन केला नसेल तर ते मोकळेपणानें बोलणार नाहींत. आणि इतरांशीं बोलणें झालें नाहीं तर व्यापारी माहिती ती

काय मिळणार ? केवळ इंग्रजी पत्रातील मजकुराचें भाषान्तर करीत राहिल्यानें ' व्यापारी तज्ञ ' होता येत नाहीं हें लक्षात ठेवावें आणि तेवढ्याच भांडवलावर इतर नवशिक्यांना झुलवितां आलें तरी व्यापाऱ्यांना – म्हणजे ज्यांचेसाठीं ही माहिती असते त्यांना – मुळींच फसवितां येणार नाहीं. तसेंच नुसते बाजारभावाचे आंकडे टिपूनही चालत नाहीं. आकड्यांचा अभ्यास करून किंमतीचा चढउतार कसा झाला, त्याचीं कारणें कोणती, वगैरे लिहावयाचें झाल्यास बाजारांत फिरल्याशिवाय चालेल कसें ? बरें, नुसतें फिरल्यानें पुष्कळ गोष्टी दिसतात, त्यात आजची धारण, तेजी का मंदी, बाजार कडक केव्हां होईल, वगैरे बाबी नसतात. प्रत्यक्ष बोलाचाली झाल्याखेरीज व्यापाऱ्याचें अंतरंग कळणार नाही. त्याचप्रमाणें, व्यापारी मंडळींत मिसळण्याची मनोवृत्ती सर्वांनाच साधते असे नाहीं. आणि ती नसेल तर व्यापारी जगांत बोलणार कुणाशीं ? अशा सर्व दृष्टींनीं विचार करतां व्यापारी व आर्थिक उलाढालींची खबर वर्तमानपत्रांना पुरविणें, ही एक आवश्यक बाब असली तरी तज्ञाकडेच ती सोपविली पाहिजे. माझा अधिकार यांत सल्ला देण्याचाही नाहीं. फक्त हीं क्षेत्रें काबीज करण्यास ढोबळ मानानें काय तयारी लागते तेवढें मी सांगितलें.

व्यापाराशीं संबद्ध अशी शेतीची व पीकपाण्याची महत्त्वाची बाब असतां आमचीं सर्व पत्रें तिकडे दुर्लक्ष करतात. आमचा देश शेतीप्रधान. लोकसंख्येपैकीं शेंकडा ८० जण शेतीवर अवलंबून. असें असतां आमच्या वर्तमानपत्रात शेतीसंबंधीं मजकूर किती येतो याचा विचार करावा. खेडोपाडींही सध्यां वर्तमानपत्रांचा प्रसार होत आहे. तेव्हां त्यांच्या गरजांकडे लक्ष द्यावयास पाहिजे ही गोष्ट अजूनही आमच्या पत्रपंडितांना समजली नाहीं, याबद्दल राहून राहून खेद होतो. आणि मग सध्यांच्या सर्वच चळवळी मूठभर सुशिक्षितांनीं ( शिक्षितांनीं म्हणणें अधिक बरें ) स्वतःच्या करमणुकीखातर – फार तर मूठभर शिक्षितांच्या हितासाठींच – चालविल्या आहेत असे कोणी म्हटलें तर राग कां यावा ? शेतकरी परिषदेंत खऱ्या शेतकऱ्यांच्या हिताची चर्चा होते असें छातीठोकपणें कोण म्हणेल ? जाऊं द्या, त्या वादांत शिरण्याचें कारण नाहीं. कृषिप्रधान देशांतलीं वर्तमानपत्रें शेतीची इतकी उपेक्षा करतात हें पाहून आमच्या जागृतीचीच लाज वाटूं लागते. ' पावसाचें भविष्य ' वर्तविल्यानें

किंवा मोठमोठया गांवीं पडलेल्या पावसाचे आंकडे दिल्यानें शेतीला उपयुक्त माहिती दिली ह्या शपथेंतूनही मोकळे होता येत नाहीं. म्हणून ही एक कामाची रूपरेषा सागतों. प्रत्येक आठवडयास पीकपाण्याचे सरकारी रिपोर्ट सरकारी कचेरींतून मिळूं शकतील. पुण्यास शेतकी खात्याकडूनही वेळोवेळीं ही माहिती मिळते. सरकारी गॅझेटमध्यें येते, तेवढी जरी माहिती कुणी दिली तर पुष्कळ उपयोग होईल. पण केवळ सरकारी म्हणून ती वगळावयाची आणि आपण स्वतः मिळविण्याचा प्रयत्न करावयाचा नाहीं, अशा प्रकारानें काय साधतें? पिकाची वाढ कसकशी होत गेली, किंवा पिकाची नुकसानी कशी झाली, याचे आठवडयाचे — निदान महिन्या महिन्याचे — रिपोर्ट छापले तर शेतकऱ्यावर उपकार होतील. म्हणजे, समजा, एके ठिकाणीं आणेवारी चुकली असेल, उभें पीक न पाहताच ती आणेवारी केली असेल, तर झगडण्यास काहीं मुद्दा तर पाहिजे कीं नको ? वर्तमानपत्रें इतकीं, पण एकाचेंही या शेतकऱ्याना बाधणाऱ्या बाबींकडे लक्ष नाहीं, ही अवस्था हितावह मानावी काय ? " सरकारनें सूट द्यावी " — " गरीब रयतांना पिळून काढूं नये " अशा पत्रकर्त्यांच्या स्फुट सूचनांनीं शेतकऱ्याची खरी तरफदारी होत नाहीं. जागरूकतेनें वर्तमानपत्रानीं सरकारी आकडे जरी दिले, तरीही आणेवारीच्या बाबतींत होणारा अन्याय त्यांना कळून येईल. आणि ' प्राथमिक शिक्षक ' ' सावकार ' ' कोंकणातील खोत ' किंवा ' वतनदार कुलकर्णी ' यांचीच तरफदारी करण्यापेक्षां शेतकऱ्याच्या खऱ्याखुऱ्या अडचणींची दाद लावून दिल्यानें देशाचें अधिक होणार आहे. कारण नुसत्या संख्येच्या मानानें पाहिलें तरीही उपरिनिर्दिष्ट सर्व वर्गांच्या पेक्षा किती तरी अधिक असा शेतकरी वर्ग आहे. शिवाय शेतीवर इतर सर्वांचें जीवन प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष अवलंबून आहे, हा मुद्दाच सोडा.

ह्या सर्व टीकात्मक लिखाणाचा हेतु असा कीं, शेतकऱ्याला उपयुक्त अशी माहिती, आणि पीकपाण्याचा रिपोर्ट वेळोवेळीं देत गेल्यानें देशाचें हित साधेल, वर्तमानपत्रांना बहुजनसमाजाची तरफदारी योग्य रीत्या करता येईल, ती त्यांनीं करावी.

जिल्हानिहाय असणाऱ्या बातमीदारांच्या कार्यक्षेत्रांत ही एक बाब आलीच पाहिजे. गेल्या आठवड्यांत कुठें पाऊस किती झाला, नेहमीच्या सरासरीपेक्षां

तो किती कमी अधिक आहे; पेरे लांबले असल्यास ते कां, पिकांची वाढ कशी आहे गुराढोरांची अवस्था, चाऱ्याचें दुर्भिक्ष, पाण्याचा पुरवठा अशा किती तरी बाबींचा उल्लेख सरकारी रिपोर्टांत असतो. त्याच्याशीं इतर ठिकाणाहून मिळविलेली माहिती ताडून पाहून मगच बातमीपत्रांत तिचा समावेश करावा. बाजारचे दिवशीं आसपासच्या खेडयापाडयातून लोक येतात. त्यांचेकडून अंदाज कळतात, कारण पावसाचें मोजमाप त्यांना ठेवता येत नाहीं. परंतु अभ्यासाच्या बोजाबद्दल किंवा परीक्षा ' कठिण ' झाली म्हणून शाळेंत विद्यार्थी जसे नेहमींच कुरकुरत असतात, तशीच संवय बहुतेक शेतकऱ्याना असते. हा त्यांच्या जीवनाचा परिणाम होय. म्हणून ' कुरकुरे ' शेतकरी काय म्हणतात हेंच साधार न मानता गांवातील चार पाच वेगळया मंडळीना विचारून पहावें, म्हणजे खरा अंदाज कळतो.

हवामानाविषयींही असेंच. पावसाचें भविष्य नक्षत्रयोगावरून ठरविलेलें विश्वसनीय आणि ' हवाखात्या ' नें ( Meteorological department ) ठरविलेले शास्त्रशुद्ध आडाखे मात्र उपेक्षणीय, अशी आमच्या पत्रांची भावना दिसते. हवाखात्याचे सर्वच अंदाज बरोबर आले नाहींत तरी पुष्कळसे अचुक असतात, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. त्यांचेकडून शेतीला उपयुक्त अशी किती तरी माहिती वेळोवेळीं मिळू शकते. तिचा उपयोग करावयास हवा. म्हणजे हवामान-पीकपाणी यांची बातमी देणारा एक तज्ञ बातमीदारवर्ग व्हावयास कांहीं हरकत नाहीं.

नाटयसृष्टि व सिनेमा यासंबंधींही लिहिणारा एक वर्ग अस्तित्वांत येत आहे. परंतु त्यांतही निराशा व खेद उत्पन्न करणारे प्रकार पुष्कळ आहेत. कलोपासकाची दृष्टि अशी फार थोडयांना. लिहिण्याचा मूळ हेतू कोणावर तरी टीका किंवा कुणाला तरी खूष करण्याची हौस. अभ्यास असा कुणाला फारसा नाहींच. आणि ही मंडळी नाटय किंवा चित्रपटासारख्या कलाकृतींवर आपलें मत देणार ! खरें पाहिलें तर कला कळण्याची दृष्टिसुद्धां वाटेल त्याला नसते. नाटय किंवा सिनेमा यासारख्या कलाकृतींत बहुतेक सर्व कलांचा मिलाफ असतांना तत्संबंधीं टीकात्मक विवेचन मनास येईल त्यानें करणें किंवा बरें वाईट मत ठोकून देणें म्हणजे धाष्टर्याची पराकाष्ठाच म्हणावी लागेल. ह्या

विषयावर टीकात्मक परीक्षण करण्यास व्यापक दृष्टि व तितकीच व्यापक विचारशक्ति, व्यावहारिक जगांतील विविध माहिती ( व शक्य असल्यास अनुभव ) असावयास पाहिजे. कारण रंगभूमीवर साहित्य, संगीत, चित्र वगैरे सर्व ललितकलांचा मधुर मिलाफ होत असून सिनेमांत नृत्य, शिल्प, वास्तु या शास्त्राची भर पडते. त्यामुळें नाट्यप्रयोगाविषयीं किंवा चित्रपट–बोलपटा-बद्दल लिहावयाचें झाल्यास सर्व कलाचीं – कलाशास्त्रांचीं – नावें तरी ठाऊक असावयास हवींत. सौंदर्यसमीक्षण हाही ह्या सर्व प्रयोगातला महत्त्वाचा भाग असतो. शिवाय तुलना व्हावयाची ती काल्पनिकच. म्हणजे ताजवा, वजनें, ही काल्पनिक असतात. म्हणून बरें वाईट मत केवळ विचारलें म्हणून देणें वेडे-पणाचें होईल. अभिनयाबद्दल पुनः तशीच तक्रार. कुणी कसा अभिनय करावा, हें सांगण्याचा अधिकार लेखकाला, हातीं लेखणी धरता येते, म्हणूनच कसा येईल ? नाटयासंबंधीं टीका करणारानें फार तर अभिनयामुळें आपणास काय काय वाटतें, तेवढें सांगावें. " हा अभिनय चूक " " तसा विक्षेप करावयास पाहिजे " असें सांगण्याचा अधिकार नाटयांत मुरलेल्यानाच असतो. इतरांनीं तो घेतल्यास हास्यास्पद प्रकार होईल.

आपणाकडे टीका व्हावयास पाहिजे तशी होत नाहीं याचा दोष पुनः संपादकाकडेच जाईल. पात्रांची स्तुती करण्याची इच्छा त्यांना होते व कलेची – कलोपासकाची – दृष्टीच नसल्यानें, किंवा कित्येक बाबतींत नाट्य ही कमी दर्जाची बाब आहे असा दुराग्रह असतो म्हणून, स्पष्ट टीका करणारास वाव मिळत नाहीं. अशी टीका दोन प्रकारें करता येते. एक पूर्वी सांगितलेल्या शास्त्रांच्या आधारें. म्हणजे श्री. कृ. कोल्हटकर यांनीं ' तोतयाच्या बंडा 'वर केली तशी. तिला महत्त्व साहित्यिक कामगिरी म्हणूनच. वर्तमानपत्री जगांत अशी टीका चालेल. नाहीं असें नाहीं. पण ती थोडक्यांत हवी. दुसरा प्रकार म्हणजे सर्व नाटयकृति पाहून आपणांस काय वाटलें, आपलें काय ' इंप्रेशन ' झालें हें सांगण्याची. लिखाण मनोरंजक व वाचनीय करावयाचें असेल तर ही दुसरी पद्धत अधिक श्रेयस्कर. कारण जुन्या पुराण्या मोजमापांना आतां चिकटून बसणें आवडतें कुणाला ? प्रेक्षकांना तो खेळ, तो चित्रपट पाहून काय वाटलें तें थोडक्यांत सांगितलें म्हणजे बस्स. साहित्यिकांच्या दरबारांत मान्यता

पावण्यासाठीं लिहिलेली टीका व वर्तमानपत्रांत प्रसंगोपात्त वाचकाना घडा-मोडीची माहिती करून देण्यासाठीं लिहिलेली टीका यांत फरक हाच असावयाचा. आणि म्हणून असल्या विषयाची थोडी माहिती असल्याशिवाय लिहिण्याचें धाडस करूं नये.

सिनेमासंबंधींही वरील विधानें अक्षरशः खरी ठरतील. किंबहुना सर्व कलांचा परिपोष सिनेमात अधिक असल्यानें तत्संबंधीं टीका करणारा विशेष अधिकृत असावा. आणि अभ्यास केल्यानें काय साध्य होत नाहीं? इंग्रजी पत्रांत उच्च दर्जाची टीका नाटक व सिनेमा ( वाङ्मयीन भागासंबंधीं नव्हे ) येते तशी आपणाकडे मुळींच नसते. म्हणून हेंही नवें दालन तज्ञ बातमीदारींत तज्ञ होणारास आहे. मोंगल बादशहाच्या मुदपाकखान्यात ( स्वयंपाक घरात ) ‘ चासनीदार ’ म्हणून एक अधिकारी असे. त्याचें काम बादशहासाठीं तयार केलेले सर्व पदार्थ ‘ चाखून ’ त्यांत काहीं कमी जास्त करावयाचें असल्यास सांगण्याचें. वर्तमानपत्रांतून नाट्य-सिनेमाचें परीक्षण करणाराचें काम साधारण-पणें त्याच वर्गांतलें. चासनीदारास स्वयंपाक कसा करावा हें माहीत असेलच असें नव्हे. चव बरोबर आहे कीं नाहीं एवढें सांगण्यापुरता तो जबाबदार. ती कशी सुधारावी अथवा तो पदार्थ कसा तयार करावा हें सांगणारा वेगळाच इसम असावयाचा. तशीच भूमिका असली तरी कांहीं बिघडत नाहीं.

बातमीदारीच्या व्यवसायात तज्ञांचा वर्ग वेगळा केला, त्यांतच ‘ फोटोग्राफर ’ येऊं शकेल. वर्तमानपत्राना पाहिजे असलेले फोटो तो पुरवितो. म्हणजे ‘सचित्र बातमीदार’ असें त्याचें वर्णन करायला हरकत नाहीं. इतर बातमीदार आपला मजकूर लेखी आणतात आणि हा फक्त फोटो घेऊन येतो. तेव्हा त्याचाही उल्लेख जातां जाता केलेला बरा. चित्रांचें महत्त्व सध्याच्या वर्तमानपत्रात विशेष आहे. आणि चित्राचा परिणाम इतका होतो कीं सरकारला सुद्धा कित्येक व्यक्तींचीं चित्रें वर्तमानपत्रांनीं छापूं नये अशी बंदी घालावी लागली. असो. चित्रांची महति पटवून देण्याचें किंवा फोटोग्राफीचें ज्ञान देण्याचें हें स्थळ नव्हे. वर्तमानपत्रांत घालण्यासाठीं कोणते फोटो लागतात व ते कसे मिळवावे ह्याचाच थोडक्यांत विचार आपणांस करावयाचा आहे.

आपलें सगळेंच जीवित सध्यां व्यक्तिप्रधान आहे. विभूति-पूजा हा आपणांत प्रामुख्यानें असणारा गुण. म्हणून बातमींत आलेल्या व्यक्तींचीं चित्रें ( फोटो ) नेहमीं हवींत. सर चंद्रशेखर व्यंकटरमण यांस नोबेल प्राइझ मिळालें, त्यांचा फोटो द्या. तर्कतीर्थ लक्ष्मण शास्त्री यांनीं लक्ष्मीबाई – देविदास विवाह लावला, त्यांचें चित्र छापा. कुमारी * * * मॅट्रिकच्या परीक्षेंत पहिल्या आल्या, सौ. * * * बाई यांनीं × × × परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारलें ... अशा अनेक कारणांमुळें कोणतीही व्यक्ति बातमींत आली कीं तिचा फोटो वर्तमान-पत्रांत देण्यास हरकत नसते. लेखकांना खूष करण्यासाठीं त्यांचे फोटोही त्यांच्या लेखाबरोबर छापतात. मुलाखत घेतली असल्यास सुद्धां ह्या व्यक्तीचा फोटो वर्तमानपत्रात झळकतो.

पण हें व्यक्तिमय जीवन सोडल्यास आणखीही पुष्कळ प्रकारचे फोटो वर्तमानपत्रात येऊं शकतात. सर्व प्रकारचे विचित्र अपघात, दैवी प्रकोपामुळें झालेलें नुकसान, नाविन्य असलेल्या इमारती, बातमींत आलेलीं ठिकाणें, या सर्वांचे फोटो आपण वर्तमानपत्रांत पहात नाहीं का ? मुलांचे शालेय खेळ, साधिक सामने, हे सुद्धां आपल्या पहाण्यात येतातच. म्हणून फोटोग्राफर बातमीदारानें औचित्य साधावयाचें असतें. त्याला अमुक ठिकाणीं ‘ बातमी ’ आहे, तेथें फोटो घेता येईल, हें आधी समजलें पाहिजे. बातमी आणण्यासाठीं पत्रपटु आपल्या डायरींत घडणाऱ्या समारंभाची किंवा प्रसंगांची नोंद ठेवतो तशीच, चित्रपटूने ठेवावयाची असते. त्यावेळीं हजर रहाणाऱ्या व्यक्ती, एकंदर लोकांचें त्यांविषयीं औत्सुक्य, इतक्या सर्व गोष्टींकडे लक्ष ठेवूनच कोणत्या प्रसंगीं आपणांस फोटो घ्यावयाचा, हें त्यानें आधींपासून ठरविलेलें असावें. तसेंच, फोटो कोठून घ्यावयाचा व केव्हां घ्यावयाचा यांवर फोटोचा दर्जा पुष्कळ अवलंबून असतो. म्हणजे, उद्घाटन समारंभाचे वेळीं × × × चे महाराज × × × कॉलेज उघडीत असतांच ‘ क्लिक् ’ व्हावयास हवें. त्याच-प्रमाणें, होतां होईल तो मुख्य व्यक्तीचें तोंड त्या चित्रांत दिसलें पाहिजे. त्या चित्रांत स्त्रिया आणि मुलें आल्यास त्याला वर्तमानपत्री बाजारांत अधिक किंमत मिळते. बातमींत वर्णिलेली क्रिया, – अपघात – घडतांना घेतलेल्या फोटोस महत्त्व अधिक असतें.

फोटोखालीं लिहावा लागणारा मजकूर ज्या मानानें कमी, त्या मानानें तो फोटो जास्त किंमतीचा किंवा वर्तमानपत्रांत जाऊन बसण्यास अधिक लायक समजावा.

बातमीदारीचें अंग फोटोग्राफरला अशासाठीं हवें कीं लोकांना कोणती ‘ घडामोड ’ बातमी आहे असें वाटेल, हें त्याला कळलें पाहिजे. पत्रपटु बातमी वाचनीय स्वरूपांत लिहितो, त्या ऐवजीं फोटोग्राफर आपल्या कॅमेरानें चित्रें काढतो, इतकाच काय तो दोघांच्या कार्यांतला फरक.

फोटो घेतांनासुद्धां तो अधिक प्रभावी कसा करावा ही कला आहे. तिज-संबंधीं सूचना अशा धावत्या स्वरूपांत देतां येणार नाहींत. पण त्या कलेचाही अभ्यास करणारास वर्तमानपत्रांत कार्यक्षेत्र आहे.

तज्ञ बातमीदारांचे हे वर्ग सोईसाठीं कल्पिले. इंग्रजींत त्यांना नांवें आहेत तशीं मराठींत बनवावीं लागतील. पण आपला धंदा संभाळूनही फावल्या वेळांत वर्तमानपत्रांना बातमी पुरविणारांना हीं कामें करतां येतील. आणि वर्तमान-पत्राशीं असलेला तज्ञ बातमीदारीचा संबंध योग्य प्रकारें वाढविला तर ‘ तज्ञ ’ बातमीदार खरोखरच अधिकारी तज्ञ होऊन त्या त्या कार्यक्षेत्रांत त्याची बढति होते. नुसता अंगुलीनिर्देश करण्यापलीकडे मला त्यांत अधिक सांगतां येत नाहीं.

प्रकरण अठरावें

# कौन्सिलें – परिषदा

सर्वसाधारण बातमीदाराला कराव्या लागणाऱ्या कामाचें विवेचन येथपर्यंत झालें. अतःपर खाशा बातमीदारांच्या कार्याची माहिती द्यावयाची आहे. ह्या खाशा स्वारीस एखादा डोळा अधिक असतो अशांतला प्रकार नसतांही त्यांना इतरांचे मानानें अधिक दिसतें, अधिक ऐकू येतें आणि मुख्य म्हणजे त्यांच्या लिखाणांत संपादकाला फारसा बदल करावा लागत नाहीं. एवढेंच नव्हे तर, त्या लिखाणावर त्या पत्राचें वजन अवलंबून असतें. इतका उच्च दर्जा खास बातमीदारांचा मानतात. अर्थातच त्या बातमीदारांतही कांहीं तरी वैशिष्ट्य असल्याशिवाय त्याची इतकी बढाई माजेल कशी ? खास बातमीदारांच्या करामतीसाठीं एक वेगळें प्रकरण पुढें यावयाचें आहे. तेव्हां त्यांच्या कामगिरींतली पहिली पायरी कोणती हें पाहूं.

प्रांतिक कौंसिलें, मध्यवर्ती असेंब्ली, प्रांतिक राजकीय परिषदा, ( अखिल भारतीय ) राष्ट्रीय सभा, अशांच्या अधिवेशनाची बातमी मिळविण्यास खास बातमीदारच पाठवावा लागतो. बहुधा असलीं महत्त्वाचीं कामें एकाच बातमीदारानें भागत नाहींत म्हणून मोठमोठीं पत्रें त्यांच्याकडे ‘ खासें ’ काम नेमून देतात व विस्तृत रिपोर्टासाठीं असोशिएटेड प्रेसवर अवलंबून राहतात. तें एका दृष्टीनें सोईचें होतें. पत्राच्या धोरणाला धरून टीका करण्यासाठीं खास अशी कांहीं बातमी मिळाली तर पहावी, एवढ्याच कामासाठीं ही खाशी स्वारी जाते.

प्रांतिक कौंसिलांचें काम चालतें तेव्हा रिपोर्ट घ्यावयास जाणाराला आंतील सभासदाची व तेथील शिस्तीच्या नियमांची नीट माहिती असली पाहिजे. सभासद ओळखीचे असणेंही फायदेशीर असतें. त्यांचेकडून पुष्कळ बातमी कळते. पण एका ठिकाणाहून सर्व सभासदांकडे पाहतांच ते ओळखतां आले पाहिजेत. अध्यक्ष सभासदांना बोलण्याची परवानगी देतात तेव्हां नांव पुकारतात. तें ऐकून, किंवा सरकारी रिपोर्टर लघुलिपींत लिहीत असतात त्यांचेकडून

आपली माहिती, नांव, भाषणाचा सारांश, बरोबर आहे कीं नाहीं तें अजमावतां येतें. प्रत्येक सभासद कुठला, कोणत्या पक्षाचा, त्याचा थोडा पूर्वेतिहास, वगैरे माहिती आधींच जमाविलेली असावी. त्यांची राहण्याचीं ठिकाणें माहिती पाहिजेत. वेळ प्रसंगीं त्यांना जाऊन भेटावें लागेल. त्यांचीं संपूर्ण नावें, कोणत्या जिल्ह्यातर्फे निवडले, कुठल्या समाजाचे प्रतिनिधी म्हणून सरकारनें नेमले, वगैरे अधिकृत माहिती मिळते, ती नेहमीं जवळ ठेवावी. आणि प्रत्येक बैठकींत मिळणारे महत्त्वाचे कागद जवळ बाळगावे. गेल्या बैठकींतील कामाचा सारांश काढलेला असावा. चर्चा चालू होईल तसतशी लिहून घ्यावयाची असेल तर घ्यावी. नाहीं तर आपणांस खास काम नेमून दिलें असल्यास फक्त महत्त्वाच्या चर्चेकडेच लक्ष देऊन बाकीच्या वेळांत कागदपत्र चाळीत रहावें. त्यातून पुष्कळ मजकूर मिळतो. प्रश्नोत्तरें व पोटप्रश्न होतात तेव्हां विशेष बारकाईनें ऐकावें. प्रश्नोत्तराच्या याद्या छापील मिळतात, त्या वाचून निवडक उत्तरेंच बातमींत द्यावीं. त्यांवर मिळालेल्या उत्तरांवर टीका करावी. कारण खासा बातमीदार नुसतें न लिहीत जातां टीकात्मक लिहितो व ती टीकासुद्धा विवक्षित पक्षाभिमानानें प्रेरित होऊन आणि विशिष्ट मत प्रतिपादनाच्या हेतूनेंच केलेली असते. अशा लिखाणांत टीका नसेल तर खाशा बातमीदाराचें महत्त्व कमी झालेंच असें समजावें. सरकारतर्फे कांहीं माहिती देतांना उडवाउडवी कशी झाली, पण लोकपक्षीय सभासदांनीं चिकाटी दाखविल्यामुळें शेवटीं माहिती सांगणें भाग पडलें किंवा कायदेशीर अडचणी पुढें आल्या, असले प्रकार विस्तारानें सांगावे लागतात. याद्या चाळून प्रथम प्रश्नांचीं भाषांतरें, मग उत्तरांचीं भाषान्तरें करीत बसण्यांत मुळींच अर्थ नसतो. 'प्रश्नोत्तरें' या सदरात प्रश्नोत्तरांची यादी देण्यापेक्षां सर्व यादी चाळून महत्त्वाचीं, आपल्या प्रतिपादनास उपयुक्त अशीं नुसतीं उत्तरेंच दिलीं तर वास्तविक परिणाम अधिक घडून येतो. विचारणाराचें नांव पाहिजे तर सांगावें. पण नुसती माहितीच बातमीच्या सदरांत बसते, तेव्हां सभासदांचें नांव नाहीं सांगितलें तरी चालतें. मात्र एक बाब धूर्ततेनें लक्षांत ठेवावयाची ती ही कीं, आपल्या ( वर्तमानपत्राच्या ) पक्षाचे सभासद असतील ( त्यांची कामगिरी जनतेच्या डोळ्यांत भरावी म्हणून ) त्यांनीं विचारलेल्या प्रश्नास उत्तरें मिळालीं, तीं वेगळींच द्यावीं. किंवा सर्वांत मिसळून दिलीं असतील तर त्यांचें नांव लिहिण्यास विसरावयाचें नाहीं.

जिल्हावार माहितीसुद्धां ह्या प्रश्नोत्तरांच्या यादींतून काढतां येते. जिल्हा-निहाय असलेल्या पत्राना आपल्या जिल्ह्यातील 'मेंबरांनीं' कोणते प्रश्न विचारले, त्याला उत्तरें काय आलीं, किंवा आपल्या जिल्ह्याविषयीं कौन्सिलांत काय चर्चा झाली, इत्यादि मजकूर साहजिकच आपलेपणाचा वाटेल. त्या जिल्ह्याची बातमीपत्रें आपल्या वर्तमानपत्रांत येतात. तेव्हां असा निवडक मजकूर काढून खास बातमीदारानें पाठवावा. किंवा खुणाकरून कचेरींत तें काम करवून घेण्यास सुचवावें. यासाठीं अधिवेशन चालू असतां हीं असलीं कामें साधावयाचीं असतात. म्युनिसिपल सभाच्या वेळीं ध्यानांत बाळगावयाच्या सूचना थोडयाअधिक प्रमाणात कौन्सिलांतील कामकाजासंबंधीं अमलांत आणाव्या लागतील.

कौन्सिलच्या कामात आंकडयांचा उपयोग पुष्कळ वेळां येईल. एकंदर कर × × लक्ष रुपये वाढला असें, समजा, सांगावयाचें आहे तर बातमीदारानें एवढा आंकडा देऊनच संतुष्ट राहूं नये. कर देणारे सरासरीनें × × × × हजार लोक आहेत. त्यावरून अंदाज बांधतां दर माणशी × × रुपये अधिक आकारणी होईल, असा खुलासा केल्यानें बातमीदाराचें कौशिल्य दिसून येईल व लोकांना त्या कराचे दूरवर पोहोचणारे परिणाम आकलन करण्यास मदत होईल. अशा पुष्कळ बाबी आहेत. असेंब्लीची बैठक, समजा, चालू असतांना मिठावरील कर दर मणामागें फक्त ' चार ' आणे वाढविण्याची चर्चा सुरू झाली तर बातमीदार नुसत्या चार आण्यांवरच थांबणार नाहीं. एकंदर मिठाचा खप काढून त्यावरील वाढलेली जकात किती लक्ष रुपये होते हें तो आंकडयांनीं सिद्ध करील. किंवा गरीब मजुराचें मासिक उत्पन्न काढून त्याच्या खिशाला मिठापायींच इतकी चाट बसते म्हणून तो दर्शवील. अशा अनेक प्रकारें मिळालेल्या आंकडयांचा विवक्षित हेतूसाठीं उपयोग करतां येतो. तो बातमीदारानें करावा. पण आंकडयाबद्दल अचुकपणा नेहमीं बाळगावा.

असल्या रिपोर्टामध्यें एक सोय असते. ती म्हणजे कौन्सिलच्या ( किंवा असेंब्लीच्या ) आंत बैठक चालू असतांना जेवढें म्हणून बोलणें घडतें त्याचीं शब्दशः टिपणें सरकारतर्फे ठेवतात. तीं बातमीदारास, त्याला गोड बोलतां येत असेल तर, लगेच पहावयास मिळतात. म्हणून कुठल्याही प्रकारची शंका

आली कीं सरकारी रिपोर्टाशीं आपलीं टांचणें ताडून पहावीं. म्हणजे समजुतींत फरक होणार नाहीं किंवा विनाकारण वाद माजणार नाहीं.

पण कौंसिलच्या कामांत अंतस्थ बातम्या फोडण्याचें एक जबाबदारीचें कार्य बातमीदारांना करावें लागतें. खाशा बातमीदाराला सविस्तर रिपोर्ट लिहावयाचा नसल्यास त्याजवर हें काम पडतें. ( किंवा एवढयाच कामासाठीं असेंब्लींत एक वेगळा खास इसम नेमतात ). प्रत्यक्ष सभागृहांत न जातां आजूबाजूस हिंडून खास बातमीदार तें बजावतो. पक्षोपक्षाचे पुढारी, प्रतोद, ( व्हिप ) असतात त्यांना भेटून, त्यांच्याशीं थोडया गप्पा मारून, त्यांना ठाऊक असलेली माहिती त्याचेकडून काढून घेणें ही कला सोपी नाहीं. बहुतेक वेळां असें होतें, कीं आपणाला ठाऊक असलेल्या माहितीमुळें वर्तमानपत्रातून खळबळ उडवितां येईल ही कल्पनाच मुळीं त्या सभासदाना नसते. शिवाय बातमीदाराला पाहून त्यांना बुजण्याची संवय असते म्हणून कुठल्याही प्रकारचा संकोच त्यांना वाटूं नये, बातमीदाराबद्दल पूर्ण विश्वास त्यांचे मनांत असावा, अशा धोरणानें कौंसिलें – असेंब्लींत वावरणारा बातमीदार असला पाहिजे. आणखीही एक जंगी जबाबदारी त्याजवर असते. आपणांस माहिती कुठून मिळाली याचा थाग त्यानें कुणाला म्हणजे कुणालाच लागूं देतां कामा नये. कांहीं सभासद पान्हा सोडण्यास आतुर झालेल्या गाईप्रमाणें धावत येऊन बातमीदारास महत्त्वाची बातमी कळवितील. पण ती आपणास कशी, कुणाकडून कळली हें बाहेर मुळींच फुटून चालणार नाहीं. बातमीदाराचा आब बसावा लागतो तो अशासाठींच. आणि एकदा कमावलेलें नाव कायम राखण्याकडे – गमावण्याकडे नव्हे – अधिक लक्ष दिलें पाहिजे.

असेंब्लींत हें बातम्या फोडण्याचें काम अधिक चालतें. शिवाय प्रांतिक कौन्सिलाची बैठक, दैनिक निघतें त्या ठिकाणीं असल्यास, तेथेंही ही चलाखी होते. पण आमच्या पत्रांचें वैराग्य जेथें तेथें आड येतें. कांहींची तत्वनिष्ठा म्हणून, कांहींची काटकसरीवरची अढळ श्रद्धा म्हणून, तर बाकीच्यांची फक्त मनांतलीच इच्छा म्हणून, बहुतेक सर्व मराठी दैनिकें व पत्रें या क्षेत्रांत लक्ष घालीत नाहींत. सरकारी बिलाला विरोध कोण करणार, त्याला पाठिंबा कितपत मिळेल, तो कां, चर्चा कोणत्या रोखानें चालणार वगैरे पुष्कळ गोष्टी उत्तम

प्रकारें रंगवितां येतात. मतमोजणी होईल किंवा नाही, आपापल्या बाजूस सभासद गोळा करण्याची खटपट 'प्रतोद' कशी करीत आहेत, अशा बातम्याही त्यात येऊं शकतात.

दिवाणांची निवड होते तेव्हां तर तर्कवितर्कांचें पीक माजतें. निरनिराळ्या अधिकाऱ्यांना व सभासदांना भेटून खुबीनें त्यांचेकडून माहिती मिळवावी लागते. लोकपक्षीय बिलाला मतें मिळविण्याची कोणाची खटपट कशी चालू आहे, त्याला यश कितपत येईल, आल्यास काय फरक घडतील, वगैरे मनोराज्य तर वाचकांना फार आवडतें. तें मधून मधून द्यावें. पक्षोपक्षांच्या बैठकी भरतात, कांहीं निर्णय होतात, ते सभेस हजर न राहतांही बातमीदारास मिळवितां येतील. तत्संबंधीं तर खबर अवश्य धाडली पाहिजे. अशा नैकविध कार्यांत कौंसिल-असेंब्लीचा खासा बातमीदार तें अधिवेशन चालू असे तोंपर्यंत रात्रंदिवस — एक दिवस सुटी न घेतां – सदैव गर्क असतो. बैठकीच्या वेळीं बैठकीचें काम म्हणून आणि बैठक नसत तेव्हां सभासदाच्या गांठीभेटी पडावयाच्या असतात म्हणून, तो आपला सारखा कामात दंग. सभासदाना घरीं भेटावयाचें, तर कुणाचें आन्हिक केव्हा संपतें, कोण अमक्या वेळीं × × × ठिकाणी हटकून असतील, कुणाला शिळोप्याच्या गप्पा मारण्याची केव्हां लहर येते, इत्यादि सविस्तर माहिती काढून तिचा योग्य उपयोग करील तोच खरा खासा बातमीदार. कारण सध्यांच्या युगांत तरी, कौंसिलचे काय किंवा असेंब्लीचे काय, सभासद बातमीदारास मुळींच कमी लेखत नाहींत. जुन्या भाषेंत बोलावयाचें तर कुणाच्याही माडीला माडी लावून त्याला बसता येतें. परंतु ज्यानें त्यानें आपला आब राखावा. सत्तेचा दुरुपयोग करून तावडींत सांपडेल त्यावर लेखणी-सौख्य घेऊं नये. आणि **अध्यक्षावर तर कधींच लेखणी उगारूं नये.** बातमीदाराला कौंसिलचें कामकाज ऐकावयास मिळतें तें केवळ अध्यक्षांच्या मेहेरबानीनें. म्हणून कुठल्याही प्रकारानें अध्यक्षीय आचरणावर शिंतोडे उडविण्याचा अप्रत्यक्ष प्रयत्न झाला, तरी त्या बातमीदारास नाकदुऱ्या काढावयास लावणें अध्यक्षांच्या अधिकारात असतें. असेंब्लीचे अध्यक्ष प्रे. पटेल यानीं असेंब्लींत मुंबईचा टाइम्स व कलकत्त्याचा स्टेट्स्मन् अशांसारख्या जहांबाज पत्राच्या बातमीदारास बंदी केली होती व शेवटीं माफी मागितल्यावरच हें प्रकरण मिटलें ही गोष्ट विसरूं नये.

कौंसिलें, असेंब्ली किंवा अशाच ठिकाणीं बातमीदाराला पुष्कळ व्यवहारी अनुभव येतात. त्यापैकीं मुख्य म्हणजे आपल्या सम–व्यवसायी बंधूशीं वागण्याचा. ' याचको याचकं दृष्ट्वा ' करतात तशी वागणूक पत्रपटूंची केव्हांही नसावी. एकादा पत्रपंडित × × × सभासदाशीं बोलत आहे तर दुसऱ्यानें तेथें जाऊन ते चोरून ऐकूं नये किंवा आपल्या उपस्थितीनें त्यांच्या संभाषणात विघ्न आणूं नये. त्याची मुलाखत पूर्ण झाल्यावरच आपण तिकडे जावें. एकमेकांच्या नाकांत काड्या घालीत राहणें तर फार वाईट. आपण आपलें काम करावें — त्यालाही त्याचें करूं द्यावें, अशा प्रकारची खेळीमेळीची भावना परस्पराबद्दल असावी. पक्ष भिन्न झाले, दृष्टिकोन वेगळा असला, म्हणून कांहीं बातमीदारांनीं एकमेकांत भाडावें असें अनुमान निघत नाहीं. तसेंच आपल्या व्यवसायी बंधूंविषयीं केव्हांही अनुदार उद्गार काढूं नयेत. त्यानें आपलीच किंमत कमी होते. परस्परांचें मीलन होऊं शकतें, बातमीदार आपलें काम मिळून मिसळून करतात, त्यांच्यात सहकार्य अनुकरणीय आहे, असेंच सर्वांना वाटलें पाहिजे.

कौंसिल किंवा असेंब्लीचीं अधिवेशनें असतात, तेव्हा पुष्कळ उपहारप्रसंगीं बातमीदारास हजर रहावें लागतें. फुकट मिळालें, म्हणून झोड उठवा अशी वृत्ती कदापि प्रकट करूं नये. ह्या संमेलनाचा फायदा बातमी मिळविण्याकडे, कुणाचीं बोलणीं काय चाललीं आहेत तें ऐकण्याकडे करावा, आणि खाद्यपेयांकडे जातां जातां दिलें तर लक्ष द्यावें, अशाच प्रकारची बातमीदाराची वर्तणूक असावी.

सभासदाशीं बोलतांनाही थोडी खबरदारी बाळगावी लागते. सही कुठें करावी हें हाताला धरून दाखवावें लागतें अशा योग्यतेचे काहीं सभासद असले, तरी त्याचें म्हणणें ऐकून घ्यावें. त्यांचा अपमान कधीं करूं नये. कोणाही सभासदाला दुखवूं नये. आपणांस पाहिजे तेव्हा चिठ्ठी आत पाठवून आपण त्यांना बोलावूं शकतो व ते येतात या सवलतीचा विशेष फायदा घेणें बरें नव्हे. थोडक्यांत बोलावयाचें, आपणाला कळलेल्या हकीकतीचा सुगावा तर लागूं द्यावयाचा नाहीं, आणि त्यांच्या मनातलें मात्र काढून घ्यावयाचें अशासाठीं हुषारी, दक्षता व व्यवधान राखावें लागतें. बरेच वेळा लागोपाठ विरोधी पक्षाच्या पुढाऱ्यांना भेटण्याचा प्रसंग येतो. तेव्हांही अशीच दक्षता

बाळगावी. बातमीदार खरोखरच उद्योगी दिसतो, विनाकारण वेळ फुकट दवडत नाहीं, अशी भावना सभासदांची व्हावयास पाहिजे.

इतका सूक्ष्म विचार व्यवहारी वागणुकीसंबंधीं झाला. आतां प्रत्यक्ष लिखाणाबद्दल थोडीशी सूचना द्यावयाची राहिली आहे. " होणार " म्हणून बैठकीचा गाजावाजा प्रथम वर्तमानपत्रांतून होतो, तेव्हां अधिवेशनाची मुदत, कामाची वाटणी, गव्हर्नरांचें भाषण, वगैरे सर्व कार्यक्रम आधीं मिळतांच तो सारांशानें द्यावा. कोणतें बिल महत्त्वाचें आहे, कां, मागील शिल्लक राहिलेलीं कामें कोणतीं, खडाजंगी होईल ती कशामुळ, लोकपक्षीयांचीं बिलें कोणतीं, प्रश्नाच्या यादींत प्रस्तुत असे प्रश्न कोणते, कोणीं विचारले, वगैरे माहिती देतां येते. नंतर प्रत्यक्ष बैठकीस सुरवात होते तेव्हा, कामें महत्त्वाचीं लागोपाठ लागलीं असल्यास ' तारीखवार ' कामाचा अहवाल द्यावा. पण त्यांतही प्रथम साकल्यानें केलेलें समालोचन असावें. * * * प्रथम सभासद बोलले, ते बसल्यावर हे उठले, त्यानीं भाषण केलें. अशा प्रकारचा एरंडी गुऱ्हाळक्रम कधीं देऊं नये. आजच्या सबंध बैठकींत वादग्रस्त मुद्दा कोणता होता, अगदीं कंटाळवाणा कोणता निघाला, मतें कशावर घ्यावीं लागलीं, सर्वांत उत्तम भाषण कुणाचें झालें, कोणत्या विषयावर बोलतांना, तें सर्व सागावें. प्रत्येक बिलाचें स्वरूप थोडक्यांत लिहून तें पुढें आणण्याची जरूरी कां भासली, त्यामुळें फायदा होईल कां नुकसान, कसें, वगैरे माहिती लोकांना दिली पाहिजे. काल रोजीं तहकूब राहिलेलें काम आज पुढें सुरू झालें, अशा प्रकारें सुरवात बातमीदारानें कधींही करूं नये. प्रथमतः कौंसिलच्या कामकाजाकडे, तेथील राजकीय वातावरणाविषयीं, लोकात कसली चर्चा चालू आहे, तत्संबंधीं अशीच महत्त्वाची माहिती पहिल्या छेदकांत यावी. " कौंसिलला सुटी होती म्हणून काल बैठक झाली नाही. आज १ वाजतां सुरू झाली " अशापैकीं नीरस प्रारंभ करून चालणार नाहीं. कारण, कौंसिलच्या कामास प्रारंभ १२ वाजतां होवो, एक, दोन वाजता केव्हांही होवो, काम काय झालें इकडेच नाहीं का सगळ्यांचें लक्ष लागत ?

असेंब्लीच्या कामाची वेगळी विभागणी केली नाहीं. हा वेळ पावेतों आलेल्या विवेचनावरून सर्व कामाची मोडणी लक्षात आली असेलच. म्युनिसिपल

कमेटींत जाण्यास कसलीच अडचण बातमीदाराला पडत नाहीं; प्रांतिक कौंसिलांत जाण्यासाठीं परवानगीचें कार्ड दारावर दाखवावें लागतें. आणि असेम्ब्लींत शिरतांना पोलिसाच्या पहाऱ्यातूनच जावयाचें असतें. एवढ्यावरून तेथील महत्त्वाची कल्पना येईल. प्रांतिक कौंसिलांतील सभासदांशीं मोकळेपणा अधिक वाटेल. तसा असेम्ब्लींतील सभासदांशीं वाटत नाहीं. कारण उघडच आहे. महत्त्वाचें व व्यापाचें माप जसजसें वाढत जातें तसतसें तेथील कामकाजास एक प्रकारचें गंभीर स्वरूप येतें. आणि बातमीदारालाही त्यामुळें गांभीर्याचा ' झटका ' आला, तर मात्र वाचकांची पुरी निराशाच म्हणावयाची. सभासदाना सर्व देशाचा राज्यशकट चालवायचा असतो. तेव्हां तेथें बसून त्यानीं गंभीर झालेलें एक वेळ चालेल. पण केवळ ' रम्या कथा ' समजण्याच्या इच्छेनें वर्तमानपत्रें वाचणारांना इतकें गंभीर होऊन चालेल कसें ? बातमीदाराचें कौशल्य कसोटीला लागतें तें अशाच प्रसंगीं. कौंसिल – असेम्ब्लीची बैठक एकादे दिवशीं कुणाही सभासदाच्या गालावर सुरकुतीसुद्धां न येता पार पडेल. तेव्हा बातमीदार आपल्या वर्णनानें वाचकाना मात्र हंसवील. आणि खरे म्हटलें तर तसेंच हवे.

सभासदांचीं नावें देतांना चूक मुळींच करूं नये. तारा पाठवितांना अशी जबाबदारी अर्थात संपादकीय कचेरीत अधिक राहील. कारण तारांत कांहीं चूक झाली असल्यास ती दुरुस्त होऊं शकते. पण टपालानें रिपोर्ट पाठवावयाचा असतो तेव्हां कुठल्याही सभासदाचें नांव प्रथम लिहितांना तो कोणत्या पक्षाचा, कुठून निवडला, हें कंसात द्यावे. म्हणजे वाचकांना मध्यंतरींच डोकें खाजवावें लागत नाहीं. साधारणपणे स्वप्रान्तीय – आपल्या जिल्ह्याचे – सभासद वाचकाना कळतात, तसे इतर ठिकाणचे चटकन लक्षांत रहात नाहींत. म्हणून ही सोय आहे. वास्तविक हे सर्व संस्कार संपादकीय कचेरींत होणें सोईचें. पण.......जाऊं द्या.

वैयक्तिक टीका होईल तो टाळावी. फार काय, ती कधींच करूं नये, असा कौंसिल – परिषदाविषयीं लिहितांना उपयुक्त म्हणून मी सल्ला देईन. परंतु एकादा सभासद कांहीं विचित्र विचारसरणी लढवूं लागला, भलत्याच चुकीचें समर्थन करण्याची त्याची वृत्ति असेल, तर त्या विचारांचे व त्याच्या

समर्थनाचे वाभाडे खुशाल काढावे. त्याच्या विचारांत चूक कोठें होती हें अवश्य दाखवावें. असें करतांना आपल्या पत्राचें धोरण मुळींच डोळ्यांआड करून भागणार नाहीं. तसें म्हटलें तर, अशा खाशा बातमीदाराचें काम टीकात्मकच अधिक असतें. ती टीका तो प्रत्यक्ष करील अथवा साधारण वाचकालाही सुचेल इतक्या स्पष्टपणें ती बाजू पुढें मांडील. नुसत्या विषय-प्रतिपादनानेंही वाचकाचीं मनें वळवितां येतात. म्हणजे सभागृहात सभासद आपली बाजू रंगविण्यासाठीं वक्तृत्वाचा आधार घेतात किंवा आपला युक्ति-वाद समर्पक करतात. पण त्यांचे म्हणणें ऐकून घेऊन तें आपल्या पक्षाच्या चौकटींत बसत असलें तर त्याचें समर्थन, किंवा विरोधी असल्यास त्याचें थोडक्यांत खुबीनें मंडन, करीतच आपला रिपोर्ट लिहावयाचा असतो. वक्त्यानें अर्धा पाऊण तास भाषण केले असल्यास त्याचे दोन चार ओळींत – फार तर आठ दहा ओळींत – समर्थन किंवा खंडन करणें ही साधी व सोपी गोष्ट नव्हे. खास बातमीदाराचें महत्त्व अशाच साठीं. त्याला भाराभर भाषणाचें सार थोडक्यांत, ताबडतोब, सांगता येतें व तें सांगण्याच्या पद्धतींतच खंडन अथवा मंडन समाविष्ट असतें. म्हणून खास बातमीदाराला प्रत्यक्ष प्रकार पहात असतां-नाच तो आपल्या वाचकाना कसा समजावून सांगावयाचा आहे, हें सुचले पाहिजे. सभासद भाषणाचा ओघ पुढें नेत असतो, तसाच हा बातमीदार आपल्या लेखणींतून आपल्या लिखाणाचा प्रवाह पुढे ढकलीत राहतो. दैनि-काच्या बातमीदाराची ही तऱ्हा. साप्ताहिकाला किंवा अर्ध साप्ताहिकाला रिपोर्ट पाठवावयाचा असतो तेव्हां मात्र लिहिण्यास थोडी फुरसत मिळते. पण त्यांत जागा कमी असल्यानें रिपोर्ट थोडक्यांत लिहावा लागतो.

प्रातिक परिषदा किंवा अखिल भारतीय स्वरूपाच्या सभा यांचाही समा-वेश खास बातमीदाराच्या कार्यक्षेत्रांत होतो. जिल्हा परिषदांचा उल्लेख वेगळा करीत नाहीं. त्या ठिकाणीं स्थानिक बातमीदाराची पुष्कळ मदत खाशांना मिळते व तें काम म्हणून सोपें होतें. पण प्रांतिक परिषदा अथवा राष्ट्रीय सभेच्या बैठकी होतात तेव्हां, साहित्य संमेलन भरतें तेव्हां, सायन्स कॉंग्रेस, मेडिकल कॉन्फरन्स होते तेव्हां, – अनेक प्रसंगीं बातमीदाराला हजर राहून बातमी लिहावी लागते. आणि अशा वेळीं खास बातमीदाराची, खरोखर

बोलायचें तर, ' लगीनघाई ' असते. मात्र फरक इतकाच कीं अशा लगीनघाईत काम करण्याचे प्रसंग सालोसाल येत रहातात. घाई म्हटली ती अशासाठीं कीं थोडक्या अवधींत तेथे सर्व काम आटोपतें. पुष्कळ प्रकारचे कार्यक्रम असतात. त्या सर्वांचा परामर्श थोडक्या वेळात, चांगल्या प्रकारें घेतला तर पाहिजेच, पण तो कसा घेतला हें ताबडतोब लिहून कळविलें पाहिजे. पाहणें, ऐकणें, लक्षांत ठेवणे हें सर्व एक वेळ जमेल. परंतु तें सर्व करीत असतांच तत्संबंधीं यथार्थ वर्णन लिहून पाठविण्यांतच सर्व धांदल उडते. सरावानें व कामाचा उरक असेल तर अशा धादलींतच अधिक काम करण्यास स्फुरण चढतें.

अधिवेशन भरतें तें ठिकाण आपल्या पत्राच्या गावापासून फार दूर असल्यास त्या ठिकाणाबद्दल ऐतिहासिक माहिती व दंतकथा पुष्कळ लिहितां येतात. संशोधनीय तर्क लढविण्यास अशा प्रसंगीं उत्तम संधि असते. गौहत्तीला कॉंग्रेस भरली, तर तिकडले किती तरी वर्णन लिहितां येते. परप्रांतस्थाचे आचार-विचार, चालीरिती, या संबंधीं माहिती मिळवून वाचकांना पुरविली तर आपण प्रत्यक्ष तिकडे जाऊन आल्यासारखें त्यांना वाटतें. फार काय सागावें, पुष्कळ प्रतिनिधींना प्रत्यक्ष हजर राहून कळल्या नाहींत त्या बाबी बातमीदाराकडून पत्रें छापून आल्यानंतर समजतात. म्हणून बातमीदाराची दृष्टि अधिक शोधक असते असें म्हणतात. ह्या वर्णनांत दळणवळणाचे मार्ग, आपल्या ठिकाणाहून अंतर, प्रवासाला लागणारा वेळ, खर्च, वगैरेचा निर्देश अवश्य हवा. बाकीची माहिती कोणती व ती कशी मिळवावी हें सागण्याची आवश्यकता नाहीं.

प्रत्यक्ष अधिवेशन सुरू होण्यापूर्वीची तयारी मात्र बरीच मोठी करावी लागते. मागील अधिवेशनांची माहिती, प्रत्येक अधिवेशनाचें वैशिष्ट्य, ते वेळच्या अध्यक्षांची कर्तबगारी, हा इतिहास तुलनात्मक लिखाण लिहिण्यास उपयोगी पडतो. मनुष्यप्राणी सदैव तुलनात्मक दृष्टीनेंच निर्णय करीत असतो. तो करण्यास अशा मागील ज्ञानाची मदत होते. पण ' जुने तेवढें चांगलें ' हा दुराग्रह कधींही धरूं नये. आणि व्यवहार म्हणून लक्षांत ठेवावयाची बाब ही, कीं गेल्या अधिवेशनाला नावें ठेवल्यास एक वेळ हरकत कुणाची येणार नाहीं. पण चालू अधिवेशनाची, अध्यक्षांची, एकदम किंमत कमी करूं नये.

एकंदर अधिवेशन खलास झाल्यानंतर संकलित समालोचन करतांना, भरपूर कारणें देऊन काय टीका करावयाची असेल ती लिहावी. केवळ मला वाटतें, माझें असें मत आहे, अशा प्रथम पुरुषी टीकेला लोक मुळींच किंमत देत नाहीत. आतां, हा खास बातमीदार आधींपासूनच नामांकित असेल, त्याचा अधिकार लोकाना ठाऊक असेल, तर मात्र गोष्ट निराळी. मग त्याच्या मताला मान मिळेल. परंतु प्रथम पुरुषी टीकेनें तो बातमीदार आपलें स्वतःचें म्हणणें वाचकांवर लादूं पहातो असें वाटतें. म्हणून ती रीत सदासर्वदा परिणामकारक होईल असें नाहीं. असो.

असल्या अधिवेशनांचा कार्यक्रम मूलतः एकाच वळणाचा असतो. भाषणें, विषय नियामक मंडळ, त्यातील ( वरपांगीं ) गुप्त वादविवाद, ठराव, त्यावरील भाषणें, समारोप, पुढील बैठक, सामान्य विवेचन, हा आराखडा अगदीं सर्व ठिकाणीं एकच समजावा. बातमीदार एकदां या कामांत थोडासा रुळला म्हणजे त्याला हे ठरावही एकाच भट्टींतले असल्यासारखे वाटतील. किती तरी वर्षांनीं एखाद दुसरा नवीन प्रकारचा ठराव येतो. कित्येक परिषदात तर मागील वर्षांचेच ठराव पुनः पुनः पास होत असतात. पण ह्या सर्व अनुभवांचा फायदा घेण्यांतच बातमीदाराचें व्यक्तिमत्व प्रकट होतें. त्याला असल्या कामाचा अनुभव जितका अधिक, तितकी त्याची टीका अधिकृत व विधायक असल्यास, महत्त्वाची वाटेल. पण आधीं सर्व माहिती द्यावयाची, तींत कमतरता राखावयाची नाहीं. मात्र प्रथमपासून दृष्टी शेवटीं करावयाच्या प्रतिपादनाकडे राखून लिखाणास त्यास अनुकूल अशा तलम विचारांचें ‘ अस्तर ’ जोडावयाचें असतें हें विसरूं नये.

परिषदा किंवा प्रांतिक सम्मेलन प्रसंगीं एक शिष्टाचार पाळावा लागतो. तो हा कीं, विषय नियामक मंडळातील वादविवाद म्हणे बाहेर कुणाला कळवावयाचा नाहीं. कॉंग्रेसच्या विषय नियामक मंडळाची चर्चा चालते तेव्हां वर्तमानपत्रांच्या खास प्रतिनिधींना आंत घेतात आणि मग ह्या शिष्टाचाराचा अर्थ काय ? असा प्रश्न पडेल. परंतु आपल्याकडे अशा पुष्कळच बाबी आहेत, अशीं कित्येक बंधनें आहेत कीं, जीं आपण विनाकारण पाळतों, किंवा पाळण्याचा बहाणा करतों. त्यापैकींच हें समजावें. म्हणून तारा करतांना “ असें

समजतें " " असें समजतें " ह्या आशयाच्या आधारावर भिस्त ठेवावी लागते.

प्रत्यक्ष कामाखेरीज इतर कोणत्या गोष्टींचा निर्देश करावा ही पंचाईत पडेल, तेव्हां असा निर्णय करण्याची एक कसोटी लक्षांत ठेवावी. एखादी लहानशीच बाब, पण तिजवरून एका मोठ्या पुरुषांच्या मनांतील उदारपणा, क्षुद्रवृत्ति, व्यापक दृष्टि, समयसूचकता – कसलाही असाधारण भाव व्यक्त होत असेल, प्रेक्षकापैकीं कुणाच्या कृतीनें तेथील सर्व जमावाची मनें आश्चर्यानें, कारुण्यानें, तिरस्कारानें – कशानें तरी ' भारलीं ', तर अशापैकीं प्रसंग बातमीदारानें अवश्य लक्षांत ठेऊन आपल्या बातमींत द्यावा. कधीं कधीं असेंही होतें कीं असले प्रसंग सर्वांच्या नजरेसच पडत नाहींत. तेव्हां तर बातमीदारानें अधिक कौशल्यानें ते लोकापुढें मांडावे लागतात. एकच उदाहरण पहा. अजमेरला हिंदुमहासभेचें अधिवेशन भरलें. तेव्हां अध्यक्षांनीं बॅ. सेनगुप्त यांचें नांव शोकप्रदर्शनपर ठरावाच्या यादींत घालण्याचें नाकारलें. त्यांची सबब – म्हणजे कारण पाहिजे तर म्हणा – सबळ असो किंवा नसो, अध्यक्षाला इतका व्यापक अधिकार असतांसुद्धां, केवळ जुजबी सबबीवर तें नांव वगळणें – मृतांबद्दल शोक व्यक्त करण्याचे वेळीं – व घालणार नाहीं असा अट्टाहास दाखविणें ही पराकाष्ठेची क्षुद्र वृत्ती होय. तिचा निषेध करण्यासाठीं योग्य शब्दच सापडावयाचे नाहींत. असली गोष्ट बातमीदाराच्या नजरेंतून निसटूं नये – नुसती सांगण्यापेक्षां तिजवर खरमरीत टीका केल्याविना त्यानें राहूं नये. कारण पक्ष कोणताही असो, असल्या हीन भावनेस त्यांत थारा मुळींच असतां कामा नये.

अशा बाबींचा निर्देश किती म्हणून करावा? केवळ मार्गदर्शक म्हणून ढोबळ खाणाखुणा तेवढ्या सांगितल्या आहेत. बाकी सर्व ज्याचें त्याला समजेलच.

प्रकरण एकोणिसावें

# खास बातमीदार

बातमीदारांना 'देवाचे लाडके पुत्र' कोणत्या अर्थानें म्हटलें तें मागें सांगितलेंच आहे. अशा लाडक्या मुलांतलाही 'लाडका' असा खास बातमीदार समजावा. प्रत्यक्ष आईच्या प्रेमांतही असा तर-तम भाव आपण पहातों. तेव्हां काल्पनिक देवानें हा भेदभाव मानल्यास कांहीं वावगें नाहीं. ह्या प्रकरणांत खास बातमीदाराची महति गावयाची नसून त्याचे आंगीं कोणते गुण असावे लागतात, त्याचा उपयोग कसा होतो आणि ह्या खाशा स्वारीचें काम तरी काय असतें, याची थोडक्यांत ओळख करून द्यावयाची आहे. खास बातमीदाराच्या पराक्रमाचें किंवा त्याच्या अनुभवाचें वर्णन लिहावयाचें म्हणजे अशा प्रत्येक बातमीदारागणीक एक एक पुस्तक लिहावें लागेल. परंतु आपल्या प्रस्तुतच्या विवेचनापुरतें पहावयाचें तर अधिक चर्चा करण्यास आपणांस सवड नाहीं हें कळून येईल.

खास बातमीदाराचें काम करावयास मिळणें हा मोठा मान समजतात. 'बातमीदार' म्हणजे कमी प्रतीचा, संपादकीय शाखा काय ती मानाची, अशी भ्रामक समजूत मराठी वृत्तव्यवसायांत प्रचलित दिसते. परंतु सर व्हॅलेंटाइन चिरोल, नेव्हिल चेंबर्लेन, विन्स्टन चर्चिल यासारखीं बडीं बडीं धेंडेंसुद्धां खास बातमीदार म्हणूनच प्रथम योग्यतेस चढलीं, आणि तसें म्हणवून घेण्यांत त्यांना कसलाही कमीपणा वाटला नाहीं, ही गोष्ट त्यांना ठाऊक नसावीसें वाटतें.

साध्या बातमीदाराला करावीं लागणारीं सर्व कामें खाशालाही करावीं लागतात. परंतु संपादकाचें सहाय्य किंवा सूचना इतर बातमीदारांस मिळतात तशा मात्र खास बातमीदाराला मिळत नाहींत. किंबहुना संपादकीय व बातमीदारीच्या अशा दोन्हीं कार्यांचें मीलन खाशा स्वारींत व्हावें लागतें. म्हणून खास बातमीदाराच्या लिखाणास संपादकीय मजकुराइतका मान मिळतो. आणि त्या मजकुरावर संपादकीय संस्कार असे फारसे घडत नाहींत.

एवढयानें खास बातमीदाराचें कार्यक्षेत्र नीट लक्षांत येत नाहीं. त्याच्या कामाचें स्वरूपही समजत नाहीं. पण थोडासा खुलासा म्हणून मी इतकें सुचवीन कीं, ‘ तज्ञ ’ बातमीदाराच्या शेलक्या बाबी वगळल्या तर बाकी सर्व प्रश्नाची चर्चा खास बातमीदाराला करता आली पाहिजे. पृथ्वीच्या पाठीवर कोठेंही त्याचें कार्यक्षेत्र असतें. संपादकीय कार्यालयाच्या चार भिंती किंवा जिल्ह्याचें मर्यादित क्षेत्र, अशी परिमिती खास बातमीदाराच्या कार्याला — कार्यक्षेत्राला — नसते. अलीकडे आकाशांत उंच भराऱ्या मारूनही आकाशस्थ ‘ बातमी ’ देणारे वीर उदयास येत आहेत. आणि न जाणो कदाचित् ‘ मंगळा ’ वरील लोकवस्तीशीं संबंध जडला तर प्रथम तेथें जाणारा मानवी-प्राणी खास बातमीदारच असेल, ही खात्री ठेवावी.

कार्यक्षेत्र व कार्यमर्यादा इतकी व्यापक असल्यामुळें खास बातमीदाराच्या आंगचे गुण ही तसेच असावे लागतात. प्रवासाची हौस प्रथम हवी. देश तसा वेष करण्याचा त्रास वाटूं नये. पर प्रांतांत नव्हे — परदेशांतही — प्राप्त परिस्थितींत आपलें व्यक्तिमत्व राखण्याची खंबीर मनोवृत्ति नसेल तर खासा बातमीदार उपयोगाचा नाहीं. इतकी मुशाफरी करावयाची म्हणजे स्वभाव बोलका असावा. निरीक्षण सूक्ष्म पाहिजे आणि काय पाहिलें अथवा ऐकलें, तें इतरांना समजावून देण्याची हातोटीही पण साध्य हवी. नाहीं तर कांहींच फायदा नाहीं. आणखी काय पहावयाचें व कसें पहावयाचें याची माहिती नसेल तरीही चालणार नाहीं. सिमला ही राजनगरी श्री. न. चिं. केळकरांनीं पाहण्यापूर्वी बऱ्याच महाराष्ट्रीय लेखकांनीं पाहिली असेल. पण तिचें वर्णन केळकराच्या वर्णनाइतकें सरस कुणी केलें आहे ? विलायतच्या प्रवासाचीं डझनभर पुस्तकें आपणाकडे असतील. पण केळकराच्या बातमीपत्राची — प्रवासातील वर्णनाची — सर कुणाच्या लेखांना आली आहे ? सर्वच साक्षर मंडळी लेखक नसतात; आणि सगळेच लेखक बातमीदार होऊं शकत नाहींत. तद्वत मुशाफरी करतां आली किंवा देशपर्यटणाची हौस असली, म्हणून कांहीं खास बातमीदाराचें काम करतां येईल असें नव्हे.

अवलोकन करतां येणें किंवा त्याचें यथातथ्य शब्दचित्र काढतां येणें एवढयानें खासा बातमीदाराचें काम मुळींच संपत नाहीं. कळलेल्या माहितीवर

साधक बाधक टीका, ती माहिती कळवितांनाच करतां आली पाहिजे. वाचकांपुढें सर्व माहिती किंवा बातमीदार प्रत्यक्ष पाहतो ती परिस्थिती जशीच्या तशी उभी करणें, 'टेलिव्हिजन' च्या काळातही शक्य होणार नाहीं कारण पुष्कळच बाबी अदृश्य अशा असून त्या ज्ञानचक्षूंनाच दिसतात. असल्या परिस्थितीचा परिणाम बातमीदाराच्या मनावर घडतो आणि त्याचें लिखाण लिहिण्यास मदत होते. तो परिणाम वाचकांचे मनावर तें लिखाण वाचून व्हावयास हवा. तसा झाला तर बातमीदाराची वाहवा होईल. नाहीं झाला, तर त्याची मेहनत व्यर्थ !

निरीक्षण केलेल्या बाबी लक्षांत ठेवून त्या वाचनीय भाषेंत स्वतःचें मत देऊन वाचकांपुढें मांडणे, इतकें खास बातमीदाराचें काम ठोकळ मानानें म्हटलें तरी त्याची कल्पना यथार्थतेनें यावयाची नाहीं. खास बातमीदाराची जबाबदारी आणखी किती तरी प्रकारची आहे. हिंदुस्थानात तर अधिकच. परतंत्र राष्ट्रांतील वृत्तपत्रांच्या बातमीदाराना राजकीय विचाराशीं फारकत करून कधींच आपलें काम योग्य रीत्या बजावता येणार नाहीं. त्याच्या प्रत्येक हालचालीच्या बुडाशीं राजकारणी कावा असल्यानें राजकारणी दृष्टीची आवश्यकता हिंदुस्थानांतल्या बातमीदारांस अधिक आहे. "मला राजकारण कळत नाहीं" ही सबब त्या बातमीदाराच्या तोंडीं मुळींच शोभणार नाहीं. राजकारणी मुत्सद्दयाचे डाव ओळखणें व त्याची आपल्या देशहिताच्या दृष्टीनें छाननी करणें हें खास बातमीदाराला नेहमीं करावें लागणारें काम आहे. आणि तें टाळून चालणार नाहीं. बातमीदार कुठल्याही कामगिरीवर जावो, असल्या सर्वव्यापी राजकारणी जाळ्यांतून तो सुटूं शकत नाहीं. सुटलों असें वाटलें तरी तें खरें नसतें, ही गोष्ट लक्षात ठेवूनच सर्व निरीक्षण करावयाचें असतें. कारण आपण बोलून चालून "ब्रिटिश साम्राज्यांतील दैदीप्यमान हिरे" पडलों. आमची काळजी इतर कुणी वाहिली नसती तर एक बरें होतें. पण इंग्लंडला हिंदुस्थानची काळजी विशेष, म्हणूनच आम्हास डोळ्यांत तेल घालून जपलें पाहिजे. राजकीय मनोभूमीची आवश्यकता पटविण्यासाठीं हा विचारौघ भलतीकडेच वाहवला — इलाज नाहीं.

खास बातमीदाराला विविध प्रकारचे अनुभव येतात. अनेक लोकांशीं मिसळावें लागतें. त्यामुळें मानव स्वभावाचें चांगलें ज्ञान त्याला मिळतें.

प्रवासानें त्याची दृष्टी व्यापक होते. नाना कल्पना त्याला सुचतात. माणसांची परीक्षा तो सहजासहजीं करतो. औचित्याची महति त्याला पटते. समयज्ञता त्याचे आगीं बाणते. त्याची विचारशक्ति चौफेर धावूं लागते. नीर-क्षीर विवेक तर त्याला हंसापेक्षा अधिक चांगल्या रीतीनें व अधिक त्वरेनें करतां येतो. त्याच्या आगातील सुस्ती जाते. व्यावहारिक ज्ञानात व समर्पकतेंत त्याची बरोबरी इतराना सहसा करता येत नाहीं. तारतम्य त्याला कळतें.....अशा अनेक गुणांची कमाई त्याला खाशा बातमीदारीमुळें होते.

खासा बातमीदार समाजाची सेवा कशी करूं शकतो हें एक दोन काल्पनिक उदाहरणावरून दाखविणें अप्रस्तुत होणार नाहीं. समजा, पुण्याला गेलेल्या एका खास बातमीदारानें पुण्यातील राहणी विषयीं, लोकांसंबंधीं आपलें मत एका पंजाबी पत्रांत प्रसिद्ध केलें. त्यात त्यानें पुणेकराना जातां जातां एक सूचना दिली. ‘ कीं पुण्यांत सायकली इतक्या आहेत पण ‘ सायकल स्वारांचा संघ ’ असा कांहीं अद्याप अस्तित्वात आला नाहीं. अजून तरी त्यासाठीं प्रयत्न करावा. ’

एवढेंच लिहून तो थांबला नाहीं. तर कशा प्रकारें संघ जमवावा, कामें कोणतीं करावीं, आसपासच्या प्रेक्षणीय ठिकाणीं ‘ सायकल ट्रिप्स ’ काढण्यास मदत कशी द्यावी, सायकलचे अपघात टाळण्यासाठीं ‘ स्वारां ’ नीं कोणती खबरदारी बाळगावी, वगैरे पुष्कळ बाबींची त्यानें नुसती सूचना ‘ फेकली, ’ तरी पुण्यांत लगेच या दृष्टीनें खटपट सुरू होईल.

दुसरीही एक बाब पहा. नागपूरचें साहित्य संमेलन झालें. त्या निमित्तानें एका खाशा स्वारीनें जमलेल्या मंडळींत खासगी अशी कांहीं चर्चा केली. ‘ वंग साहित्य सभा ’ किंवा ‘ हिंदी अकॅडमी ’ ह्याच्या कामाची त्यानें माहिती जमलेल्या मंडळीस करून दिली. आणि “ हे विचार तेथील मंडळीस फार आवडले. आतां त्यावर चर्चा सुरू होऊन पुढील वर्षीच्या कार्यक्रमांत कांहीं तरी बदल होईल ” अशी आशा त्यानें प्रदर्शित केली. वंग साहित्य सभेच्या कामाची नुसती त्रोटक माहिती दिली तरी मराठी साहित्य भक्तांना ‘ आपण तसें कां करू नये ? ’ असा मोह होईल. त्या मोहाला वरचेवर पाणी घालून वाढविलें पाहिजे. “ × × × ठिकाणच्या साहित्य सेवकांची सभा भरली होती,

संमेलनाच्या कार्यक्रमांत आमूलाग्र फरक झाला पाहिजे ह्या रोखानें तीन साडेतीन तास चर्चा चालली व तीही अपुरी राहिली. पुनः पुढील रविवारीं ही चर्चा चालेल. '' अशी बातमीपत्रें देऊन " ह्यांचें म्हणणें असें, × × चें तसें " अशा सारांशांत अनुकूल असलेल्याचीं नांवें द्यावीं. प्रतिकूल भाषण करणारांच्या युक्ति वादाचे तुकडे उडवावे. ह्या प्रकारे इष्ट ती अवस्था – संमेलनाच्या स्वरूपांत बदल – घडवून आणतां येते. परंतु ह्या कामगिरीस संपादकाचें पूर्ण अनुमोदन हवें. नाहीं तर बातमीदारानें अशी खटपट करावी, व संपादकानें विरुद्ध लिहावें असा हास्यास्पद प्रकार होऊं नये.

एका दृष्टीनें संपादकापेक्षाही हा खास बातमीदार वरचढ म्हणावा लागतो. कल्पनाशक्तीनें संपादक आपली दृष्टी व्यापक करतो. म्हणजे व्यापक दृष्टी आणण्यास त्याला थोडा ताण पडतो. तसें खास बातमीदाराचें नाहीं. त्याच्या स्वभावांतच ती दृष्टि येते. विनायासें त्याचा दृष्टिकोन विस्तृत होतो. आकाशांत उंच भरारी मारणाऱ्या घारीला सहजासहजीं जें दिसतें तें खालीं पृथ्वीवर चालणाऱ्यास कसें दिसेल ? म्हणून खास बातमीदारांचा दर्जा अत्यंत श्रेष्ठ मानतात. त्यांच्या म्हणण्याला सर्वजण मान तुकवितात. आपल्याकडे अद्याप परराष्ट्रांत जाऊन आपल्या दृष्टीनें त्यांच्या राजकारणाचा अभ्यास करण्याची इच्छाच उत्पन्न झाली नसल्यानें, खाशा बातमीदारांचा वर्गही यावा तितका अस्तित्वात आला नाहीं. परंतु हळु हळू तो येणार यांत बिलकूल संदेह नाहीं.

राजकारणाचा विचार हिंदुस्थानांतील बातमीदारास विसरतां यावयाचा नाहीं म्हणून म्हटलेंच आहे. वरपांगीं राजकारणाचा वासपुद्धां येणार नाहीं अशा बाबींतही सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास राजकीय धागेदोरे स्पष्ट दिसतील. ते हुडकण्याची भेदक नजर बातमीदाराची असावी. त्याचप्रमाणें राष्ट्रीय वृत्तीही त्यांचे अंगीं असेल तर तो बातमीदार लोकप्रिय होतो. भावना किंवा विकार यांचें प्राबल्य मानवी आयुःक्रमांत किती आहे हें एकदां कळल्यानंतर तो त्यांचेकडे दुर्लक्ष मुळींच करणार नाही. त्याला स्वतः विकारवश व्हावें तर लागतेंच; पण एका क्षणांत त्या विकारांचा, त्या भावनांचा, आवेग आवरून धरणें भाग पडतें. समजा, नुकत्याच घडलेल्या धरणीकंपामुळें झालेल्या अनर्थांची माहिती आणण्यासाठीं एकादा खास बातमीदार मोंगीर,

मुझफ्फरपूर या ठिकाणीं गेला आणि शेकडों प्रेतें, हजारों जखमी व निराश्रित मंडळी, घरादारांची उध्वस्त अवस्था......पिकांची नासाडी, गुराढोरांचा नाश...हे सर्व प्रकार पाहून तो सहृदय बातमीदार विरघळला! गौतम बुद्धानें तीनच दृश्यें पाहिलीं तर त्याला पराकाष्ठेचें वैराग्य आलें. मग या बातमीदारानें काय करावें? शोकाकुल होऊन रडत बसावें, का मानवी जीवित क्षणभंगुर आहे,

" धिगियं देहभृतामसारताम् "

म्हणून हिमालयांतील गिरिकुहरें गांठावीं, का रामनाम जप करीत रहावें?

खासा बातमीदार यापैकीं कांहीं करीत नाहीं. ताबडतोब कागद पेन्सिल घेऊन आपल्या भावनांवरील परिणाम ताजा आहे तोंच त्या निर्जीव चिठोऱ्यावर त्याला तो शब्दांनीं प्रतिबिंबित करावा लागतो. प्रत्यक्ष वस्तुस्थितीच्या अवलोकनानें इतरांवर न घडलेला प्रभावी परिणाम त्याचेवर होतो. मोजक्याच शब्दात तो अशी कांही शक्ति भरतो कीं, तेणेंकरून भौगोलिक बंधनें विसरून सर्व राष्ट्रें सहानुभूतीनें शोकाकुल होतात व शक्य ती मदत पाठवूं लागतात. हें सामर्थ्य कमी कसें लेखावें? शोकाकुल करणारे कारुण्यपूर्ण विकार पाहून तो विकारवश होतो. परंतु लगेच विकारांवर ताबा चालवून आपल्या कर्तव्याची जाणीव स्वतःस व इतरांसही करून देतो आणि आपलें कार्य उत्कृष्ट प्रकारें पार पाडतो. भावनेचा ओलावा नसता, बातमीदार इतर माणसाप्रमाणें विकारवश झाले नसते, तर त्यांना लो. टिळक, ज( य )तीन्द्रदास, पंडित मोतीलाल नेहरू, प्रे. पटेल अशासारख्याच्या स्मशानयात्रेचें शोकरसपूर्ण वर्णन करतां तरी आलें असतें काय? स्मशानयात्रा निघाली मुंबईत, कलकत्त्यांत नाहीं तर प्रयागक्षेत्रीं! तिची माहिती एवढ्याशा कागदी चिठोऱ्यावर काळ्या शाईनें निरनिराळ्या भाषेंत छापली काय, आणि कलकत्ता कुठें आहे किंवा यतींद्रदास काळा कीं गोरा, हें ठाऊक नसणारीं खेडवळ माणसेंसुद्धां तें वर्णन वाचून रडूं लागलीं काय, हें सर्व अगदीं विलक्षण वाटतें. पण हा प्रभाव बातमीदाराच्या लेखणीचा नव्हे तर कशाचा? लोकमान्य टिळकांच्या स्वराज्यांतील दौऱ्याचें वर्णन – फक्त कै. अच्युतराव कोल्हटकरांच्या संदेशांतील – आजही आपल्या डोळ्यासमोर उभें राहतें, याचें श्रेय बातमी-

दाराला नाहीं तर कुणाला देणार ? ज्याची स्मशानयात्रा निघाली ते राष्ट्रवीर इहलोकांतून निघून गेले. कदाचित् ज्या पत्रांत हीं वर्णनें आलीं तीं आज चालू नसतील. बातमीपत्रें कोणीं लिहिलीं हेंही बहुतेकांना माहीत नसावें. परंतु त्यावेळचीं तीं चित्रें – निर्जीव कागदावर काळ्या शाईनें ५२ अक्षराच्या सरमिसळीनें बनविलेल्या शब्दांनीं काढलेलीं चित्रें – आजही वाचकांच्या स्मरणांत आहेत, ही शक्ति बातमीदाराची नव्हे काय ? देशांतील लोकाना शोक कां करावा हें सांगून, लगेच त्या शोकाला मर्यादा घालून, त्या त्या प्रसंगीं योग्य असें आचरण करण्यास उद्युक्त करणारा बातमीदारच म्हटला पाहिजे. अशा किती तरी गोष्टींवरून खाशा बातमीदाराचें वर्णन करतां येईल. जसा कांहीं सर्व बाबतींत वडीलकीचा मान त्याजकडे असतो. लोकांना शोक आवरण्यास सागून कार्यरत करणें, थोर पुरुषाच्या माहात्म्याची ओळख पटवून देणें, हीं कामें खाशा बातमीदाराकडेच असतात.

ही जशी सामान्य भावनांची बाब झाली तशीच युद्धकालीं राष्ट्रांतील राजकीय आकांक्षांची असते. आणि ती सारखी तेवत रहावी म्हणून प्रत्येक राष्ट्र जिवापाड मेहनत करीत राहतें. त्यावेळीं War Correspondent म्हणजे रणांगणावरील बातमीदारांवर सर्व भिस्त ठेवतात. युद्धक्षेत्रावर स्वतःचे प्राण धोक्यात घालून जावयाचें आणि "रम्या कथा" लोकांना सुनवावयाच्या, हें विकतचें श्राद्ध सागितलें तरी कोणीं, असें कित्येकांना वाटेल. पण त्यांना खास बातमीदाराची मनोभूमिकाच समजली नाहीं असें म्हणावें लागेल. धाडसी कामें करण्यांत, संकटांत उडी घेण्यांत, फार काय, जिथें अद्याप कुणी बातमीदार गेला नाहीं तिथें आधीं जाऊन पोहोंचण्यांत, धन्यता मानणारा हा खास बातमीदारांचा पत्रपंडितातील खासा वर्गच होय. लढाई, रोगराई, शातिकलह, बंडाळी, वगैरे अडचणींना तो दाद देत नाहीं. म्हणजे अडचणी आहेत एवढयाने तो डरत नाहीं. उलट अडचणी नसल्या म्हणजे मात्र त्याला चुकल्या चुकल्यासारखें होतें. अशा रणांगणावरील बातमीदारीचा अनुभव अद्याप आपणांकडे फारसा आलेला नाहीं. महात्मा गांधींनीं शांतताप्रिय मार्गांनीं चालविलेल्या चळवळीस हिंसामय युद्धाची परिभाषा लागू केल्यास त्यावेळच्या खास बातमीदारांस 'वॉर कॉरेस्पॉंडंट' म्हणतां येईल खरें.

पण हा शब्दांचा शुद्ध विपर्यास होय. सरहद्दीवर वारंवार चकमकी उडतात तेव्हां किंवा बऱ्याच वेळां बंडखोराविरुद्ध मोहिमा निघतात. त्यावेळीं शेलक्या बातमीदारांना काम करण्यास क्षेत्र मिळेल. परंतु आमचीं पत्रें त्या बाबतींत अगदीं उदासीन आहेत. असो.

खाशा बातमीदारानें काम कसें करावें याविषयीं थोडें लिहिलें पाहिजे. या कार्यांत पहिली पायरी म्हणजे परप्रांतीय राहणीची, सणावारांची, उत्सवांची, चालीरितींची माहिती मिळविण्यासाठीं जाणें ही होय. अशी माहिती खटपट केल्याविना मिळत नाहीं व काय खटपट करावी लागते हें समजलें कीं खास बातमीदाराच्या धंद्यांतली प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाली असें समजावें. अर्थात लेखनाची आवड ही आवश्यक आहेच. पण त्यांतल्यात्यांत वर्णनात्मक, विवेचनात्मक लेखनशैली असल्यास खाशा स्वारीचें लिखाण वाचतांना मौज वाटते. लहरी स्वभाव, आळस, कंटाळा या सर्व अडचणी खास बातमीदार कधीं पुढें करीत नाहींत. त्यांच्याशीं गप्पा मारण्यास — किंवा त्याच्या गोष्टी ऐकण्यास जो तो उत्सुक असतो. आणि सर्वांना मनोरंजक वाटतील अशा किती तरी कहाण्यांचा संग्रह त्या बातमीदाराजवळ असतो. समाजांतील हा प्राणी खरोखर अत्यंत उपयुक्त म्हटला पाहिजे.

प्रकरण विसावें

# समालोचन

पृथ्वीवर प्रभावशाली सत्ता अशी संपादकच चालवूं शकतो व त्याचें साधन म्हणजे वर्तमानपत्र हें किती विविध प्रकारें उपयुक्त करतां येतें हें पाहिल्यावर, वर्तमानपत्रांच्या 'कारखान्यात' बातमीदाराचें स्थान कोणतें तें आपण प्रथम समजावून घेतलें. बातमीदारीचें काम करण्यास कोणत्या गुणांची आवश्यकता आहे किंवा अनेक प्रकारें निर्भेळ लोकसेवा बातमीदारालाच कशी करता येईल याची चर्चा नंतर झाली. बातमीची व्यवहारी व्याख्या ठरविल्यावर मग बातमी मिळवावी कशी ह्याचा विचार केला. मिळविलेली बातमी विवक्षित प्रकारें कशी लिहावी लागते तेंसुद्धां सांगितलें. टाळावयाच्या चुका, घ्यावयाची खबरदारी, राखावयाचें धोरण याविषयींही थोडें विवेचन करून, भाषणें व व्याख्यानें रिपोर्ट करतांना कोणत्या बाबी घ्यावयाच्या असतात याची शहानिशा केली. समारंभ – उत्सव यांचा समाचार घेऊन कोर्टांतील खटल्याकडे आपण दृष्टी वळविली. लोकलबोर्ड व म्युनिसिपल सभा आणि त्यांच्या निवडणुकी याविषयींची बातमी कशी मिळवावी व लिहावी, हें विस्तारानें सांगून मग कचेरींत बसून बातमीदारास कराव्या लागणाऱ्या कार्यांची छाननी केली. क्रीडांगणावरील खेळखेळाडूंच्या बातमीचें वृत्तपत्रीय महत्त्व पटवून दिल्यावर मुलाखतीसंबंधीं विस्तृत विवेचन केलें. आणि नंतर पक्षाभिमानी दृष्टीनें प्रत्येक लिखाणांत कसा फरक करतां येतो तें उदाहरणें देऊन दाखविलें. पक्षाभिमानाच्या पुढली पायरी म्हणून एका विशिष्ट मताचें प्रतिपादन कोणत्या स्वरूपात करावयाचें, याचें केवळ दिग्दर्शन करण्यापलीकडे जास्त सांगता येत नव्हतें. जिल्हानिहाय राहून बातमीपत्रें कशीं लिहावींत याचीही थोडक्यांत शिकवण दिल्यावर मग बातमीदाराचे वर्ग कल्पून त्या प्रत्येक शाखेंत तज्ज्ञ होणारास किती मोठें कार्यक्षेत्र आहे हें दर्शविलें. त्यानंतर कौंसिलें व परिषदा वगैरे खास बातमीदाराच्या कार्यक्षेत्रांतील कामाचें स्वरूप समजावून दिलें आणि खास बातमीदाराच्या माहात्म्याची ओळख करून घेतली.

१६

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे बातमीदाराच्या विविध कामगिरीची माहिती मिळविल्यावर तें काम कसें पार पाडावें या संबंधीं वेळोवेळीं धडेही दिले. वर्तमानपत्रांतील कित्येक चुकांची छाननी करून त्यांतील दोष टाळावे कसे हेंही बातमीदाराच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला. तेव्हा आता सांगावयाचें फारसें कांहीं राहिलें आहे असें नव्हे. तरीही दोन तीन महत्त्वाच्या बाबींची चर्चा केल्याविना हें ‘ शास्त्रोक्त शिक्षण ’ पुरें होणार नाहीं. त्यांतील पहिली बाब लेखनशैलीसंबंधींची आहे. बातमीदाराला रोजच भाराभर लिखाण भराभर लिहावें लागतें. आणि वर्तमानपत्रें हीं रोजच्या रोज – धावत्या गाडींत बसल्या-बसल्या – वाचावयाचीं असल्यानें त्यांतील मजकूर सहजासहजीं सर्वांना कळणारा असावा. दुर्बोधता अगर क्लिष्टता त्यांत राहूं नये. सोपी व बालबोध अशी लिहिण्याची तऱ्हा तर बातमीदाराची हवीच. पण तींत मनोवेधकता, चटकदारपणा नसेल, तर सर्व व्यर्थ होईल. कारण वर्तमानपत्रें ही यद्यपि लोक-शिक्षणाचें साधन असलीं, तरी त्यांच्याकडे करमणुकीच्या दृष्टीनेंच सर्व जण पहात आहेत. करमणूक म्हणून लोकांना वाटतें आणि करमणूक करतां करतां विशिष्ट मत वाचकावर लादण्यास मिळतें. यासाठींच वर्तमानपत्राचें ( तसेंच रेडियोचें ) महत्त्व अधिक. तेव्हां समजण्यास सुलभ अशी भाषारचना असावी. मग इतरांनीं तिला ‘ वर्तमानपत्री ’ शैली म्हणून हिणविलें तरी परवा नाहीं. कारण जनतेंत वाचनाचा अधिक फैलाव होईल तितका करण्याचें ध्येय साध्य करावयाचें, तर भाषा अधिकात अधिक इसमास कळेल, कळताच अर्थबोध होईल, अशी असावी. पण त्याहीपेक्षां दुसऱ्या कांहीं सूचना लिखाण वाचनीय करण्यासाठीं द्याव्याशा वाटतात. अर्थातच निबंधलेखन किंवा तसल्या प्रकारच्या पुस्तकातून शिकवितात तसें करण्याचा माझा मुळींच हेतु नाहीं. मला तें साधणार सुद्धा नाहीं. परंतु लेखनशैली म्हणतात ती बनवितां येते. मात्र तींत प्रत्येकाचें वैशिष्ट्य हें रहाणारच. लिखाण वाचनीय करण्यासाठीं खालील सूचना उपयोगी पडतील.

१. आहे, नाहीं, असतो, करतो, होतो, रहातात अशा नित्योपयोगांतलीं क्रियापदें शक्य तो कमी वापरावीं. आणि त्यांची पुनरुक्ति किंवा सांनिध्य होऊं देऊं नये. लागोपाठ कोणतेंही एकच क्रियापद येऊं लागलें कीं वाचकाला जांभई

आलीच म्हणून समजावें. मात्र केव्हा केव्हा विशिष्ट मुद्द्यावर भर देण्यासाठीं लागोपाठ तेंच क्रियापद उपयोजितात. एकच नमुना पहा — केसरींत २०-१-१९३१ रोजीं मुंबईचें बातमीपत्र प्रसिद्ध झालें आहे त्यांतील पहिल्या छेदकांत पूर्ण वाक्यें आठ असलीं, तरी ' होते ' हें क्रियापद १० वेळां आलें आहे. पुढील तीन छेदकही असेंच 'होते'मय दिसतात. एकंदर तीस वाक्यांत २७ क्रियापदें होता, होती, होतें — अशाच स्वरूपाचीं आलीं, तर वाचतांना मोठी मौज वाटेल नाहीं ? हें सबंध पत्रच त्या दृष्टीनें गमतीचें म्हणावें. असो.

२. वाक्यारंभीं जर, जो, जेव्हां इत्यादिकांचा उपयोग करूं नये. हे 'ज'कार नसताही संकेतार्थी वाक्यें बनवितां येतात. वाक्यांत 'जर' आलें तर, 'तर' आलेच पाहिजे. परंतु 'जर' वगळून नुसत्या 'तर'नें सुद्धां तोच अर्थ आणतां येतो. 'तर'च्या पूर्वी 'जर' असलेच पाहिजे असा कांहीं नियम नाहीं.

३. वाक्यात कर्ता, कर्म, क्रियापद अवश्य असावें हा व्याकरणांतला नियम खरा; पण मधून मधून विन क्रियापदाचीं वाक्यें लिहिलीं तर बिघडेल ? मात्र त्याची गर्दी करूं नये. त्याचप्रमाणें आपण बोलतों तसलें अगदीं साधें पण प्रश्नार्थक वाक्य एखादें घालण्यास हरकत कसली ?

४. इंग्रजी वाक्य-रचनेप्रमाणे कर्मणि प्रयोग मराठींत ' केले गेले ' तर, अर्थ 'समजला जाण्यास' कठिण पडतें. हेंच वाक्य पहा, मध्यंतरीचे ' गेले ' व ' जाण्यास ' हे शब्द काढून टाकून सरळ प्रयोग करणें अवघड नाहीं. पण इंग्रजी वाक्प्रचारानें दडपण मनस्वी पडलेलें. आणि मराठी भाषेचा विसर पडत चालला. म्हणून असें होतें. ' पुस्तक लिहिलें गेलें ' म्हणण्यापेक्षां पुस्तक लिहिलें — किंवा लिहविलें असें म्हणतां येतें. तेव्हां इंग्रजी कर्मणि ( Passive ) प्रयोग मराठींत तसाच उतरविण्याचा प्रयत्न करूं नये.

५. मराठी ' इडियम ' वेगळी असून इंग्रजीची ही निराळी आहे. इंग्रजी प्रचारानुसार व्यायाम ' घेणें, ' जेवण ' घेणे, ' धोतर ' घालणें ' हे प्रयोग शुद्ध असले तरी मराठी बोलतांना, व्यायाम करणें, जेवणें व धोतर नेसणें, असेच शब्द वापरले पाहिजेत.

६. भाषा होता होईल तों घरगुती असावी. कृत्रिमपणा आणल्यानें लिखाण वाचतांना कंटाळा येतो. बोलताना घरगुती व लिहितांना मात्र भाडोत्री नटवे-

गिरीनें सजलेली, असा भाषेंत फरक का व्हावा हें समजत नाहीं. वाङ्मयांतील इतर दालनात कृत्रिम भाषेची आवश्यकता असते कीं काय, तें सांगण्याचा अधिकार माझा नाहीं. पण वर्तमानपत्रांचा हेतु, त्याचें कार्य व प्रसार ह्या सर्व गोष्टी लक्षात घेता, त्यातील भाषा शक्य तेवढी साधी व नेहमींच्या प्रचारातली असणें श्रेयस्कर.

७. दोन वाक्यांचा परस्परसंबंध दाखविणारीं अव्ययें आपल्या भाषेंत भरपूर असताही त्याचा उपयोग इतक्या चिक्कूपणानें होतो खरा. तो मार्ग सोडून देऊन, किंबहुना, मात्र, तथापि, आणखी हीं व देखील, सुद्धा, शिवाय, म्हणून, म्हणजे, ही अव्ययें वापरीत जावीं. म्हणजे विचारसरणींत खंड न पडता किंवा लेखणीच्या ओघात अडथळे न येता, प्रवाह नीट चालतो असें वाटते.

८. ' चा ', ' ला ', ' ईल ' ह्या तीन प्रत्ययांनी विशेषणें बनवितां येतात ही गोष्ट पुष्कळांच्या लक्षात नसावी. व्याकरणांतील नियम कडक रीत्या पाळण्याच्या संवईमुळें सामान्यरूप केल्याविना शब्दांचा उपयोगच त्याच्यानें करवत नाहीं. पण तशा पद्धतीनें लेखन थोडें बोजड वाटते. कांहीं ठिकाणीं तर सामान्यरूप केल्यानें कर्णपटु प्रयोग होतो. विशेषतः विशेष नामें – नवीं रूढ झालीं असतील तर – तशीच ठेवून त्याचें सामान्यरूप न करता भागेल तेवढें काम भागवावें. ' हिंदुस्थानचा कारभार ' हे बरें, कां हिदुस्थानाचा कारभार हें चांगले ?

आणखीही पुष्कळ बारीक सारीक बाबी आहेत. पण त्या सांगण्यापेक्षां ज्याच्या त्याने हुडकल्या पाहिजेत. पुष्कळशा म्हणी, वाक्प्रचार, जोडशब्द, कांहीं निवडक सुभाषितें, याचा खराखुरा अर्थ व प्रचलित उपयोग ठाऊक असेल, तर त्यामुळें आपले लिखाण ठाकठिकीचें व डौलदार बनविता येतें. मात्र अशा वेळीं कृत्रिमता मुळींच आणूं नये. हा वाक्प्रचार चुकूनमाकून लिहिला नसून जाणूनबुजूनच लेखकानें तो योजला आहे असें वाटलें पाहिजे. नाहीं तर, कित्येकाच्या वटवटीला " मुखमस्तीति वक्तव्यम् " असा शेरा आपण मारतों, तशीच गत लिखाणाची व्हावयाची.

खाणाखुणा, पैपाहुणा, जमीनजुमला, शेजारीपाजारी, नमस्कारचमत्कार, हे व अशाच प्रकारचे शब्द ठाऊक तर असले पाहिजेतच. पण योग्य वेळीं ते

सुचावयास हवेत. प्रत्येक प्रसंगीं "पैपाहुणा" किंवा "मळाटळा" म्हणून मुळींच चालणार नाहीं. सुभाषितें संस्कृत किंवा मराठीच असावींत असें नव्हे. गुजराथी, हिंदी, पंजाबी, बंगाली, कानडी, इंग्रजी, फार्सी, कोणत्याही भाषेंतील चालतील. पण मुख्य अट ही, कीं तीं औचित्यपूर्ण असलीं पाहिजेत. आणि दुसरी म्हणजे त्यांचा अर्थ सहज समजावा. अर्थ सांगण्यासाठींच दोन पॅरेग्राफ खर्च घालण्याची – नमनालाच घडाभर तेल जाळण्याची – पाळी येऊं नये.

लांबलचक वाक्यें, कीं ज्याची रचना इंग्रजी वाक्यरचनेच्या धर्तीवर केली गेली आहे, टाळून त्यांचेऐवजीं छोटीं, तोटकीं पण चुरचुरीत वाक्यें बनविली गेलीं तर, मला असें दिसतें, लेखनाकडे वाचकाचें लक्ष खेचलें गेल्याशिवाय रहाणार नाहीं. हेंच वाक्य पहा ना ? किती बोजड वाटतें ? लिहिणारास कल्पनातीत 'वेदना' झाल्या असाव्या असें एवढें वाचूनच वाचकाना समजतें. उलट, मासा पाण्यात लीलया पोहत जातो किंवा रेशमी किडा आपल्या शरिरातून सहजगत्याच धागा काढीत राहतो, तद्वत लेखकाच्या लेखणींतून शब्द उतरले आहेत असें वाटलें, तरच तें लिखाण वाचकांना आवडतें. आणि सुलभप्रसूतीचे पत्रपंडितच वृत्तव्यवसायात उच्च पदवीप्रत पोहोंचतील. "येरा गबाळाचें काम नोहे."

नंतरची बाब स्वतःच्या ज्ञानाची. वर्तमानपत्राना जगाच्या डोळयांची उपमा दिली तर बातमीदार, संपादकीय मंडळी वगैरे सर्वांवर तेंच काम येऊन पडतें. म्हणून तें बजावतांना त्यांनीं अत्यंत दक्ष व जागरूक राहिलें पाहिजे. "आम्हींही माणसेंच आहोंत – इतराच्या होतात तशा आमच्याही चुका झाल्या म्हणून काय झालें?" ही समर्थन वृत्ति म्हणजे अहंमन्यतेचा व विचारा-भावाचा भरपूर पुरावाच होय, बातमीदारानें कुठलीही शंका आली कीं, निरसन करून घ्यावी. निरसन करून घेण्याचे अनेक मार्ग असतात. संदर्भ ग्रंथ, तज्ञ, अधिकारी अशाच्या सहाय्यानें आपल्याला नसेल ती माहिती मिळवावी आणि वर्तमानपत्रांत तरी वाचकापुढें आपल्या अज्ञानाचें प्रदर्शन होऊं देऊं नय. परवांच एका दैनिकांत "रियोडी जेनिरो म्हणतात" अशा सुरवातीची तार होती. भाषांतरात बैठया बातमीदाराची चूक नाहीं खरी. कारण लंडनहून आलेल्या तारेंत Rio de Janeiro says अशी सुरवात होती. रिओ डी जेनिरो काय 'प्राणी' आहे याची यत्किंचितही कल्पना बातमीदारास नाहीं.

नकाशे, गॅझेटियर्स, पत्रपंडिताना उपयुक्त अशीं पुस्तकें, त्यानें चाळली असतीं, तर असा मूर्खपणाचा प्रकार त्याच्या हातून घडला नसता. फार काय, रोजचीं वर्तमानपत्रें नीट चाळण्याची संवय असती तर रियो डि जेनिरो काय व कोठें आहे तें कळलें असतें. अशाच चुका मराठी वृत्तपत्रांत बेसुमार होत आहेत. त्यावरून संपादकीय वर्गाचें हसें होतें. वास्तविक इतरेजनाच्या मानानें पत्रपंडित हे खरोखरच पंडित आहेत, इतराना समजावून सांगणें हेंच त्याचें काम, अशी भावना सामान्य लोकांची असते. आणि बोध अधिक होईल अशा टीपा जोडून, वाचकांची सोय करून देऊन, आपलें विशेष ज्ञान प्रकट करण्यास पत्रपटूंना वारंवार संधि मिळते. "यंग प्लॅन," "बॉक्सर बंड," "तातमेडा," "खुरासान," "जिरगा" अशीं विचित्र नांवें बातमीत आलीं कीं, त्याचा अर्थ स्पष्ट करण्यासाठीं टीपा जोडण्यास हरकत कसली ? एखादें लहानसें खेडें बातमीत आलें किंवा वर सांगितल्याप्रमाणें रिओ डि जेनिरोचा उल्लेख केला, तर त्याची भौगोलिक जागा सांगितल्यान वाचकाची सोय होईल. पण नकाशाकडे पहातेंच कोण ? अशी वृत्ती जेथे तेथें खेचून भरलेली. पण त्यामुळें कसा अनर्थ ओढवतो पहा:—

## पंजाब मधील जलप्रलय

...."वरील प्रमाणें सिंधमध्यें सिन्धू नदीचें तांडव नृत्य सुरू आहे. **सिंधूचा उगम पंजाबांत** व तिला पाण्याचा पुरवठा काबूल, **अटक**, झेलम व चिनाब या नद्या करीत असल्यानें त्यांनी व त्याजबरोबर सिंधूनेंही पंजाबात धुमाकूळ घातला आहे....चिनाब नदीला कल्पनेबाहेर पूर आल्यानें मुझफरगड शहर धोक्यांत आहे.....( मुलतान येथें ) पुराचा लोंढा येण्याची क्षणोक्षणीं भीति असल्यानें तेथें रात्रंदिवस जागरूकता ठेवण्यांत येत आहे. ता. ३१ रोजीं **पेशावर येथला पूर** किंचित् ओसरूं लागला. तथापि नवा लोंढा अद्यापि सिंधमध्यें पोहोंचावयाचा आहे व तो उद्यां कोट्री पर्यंत जाऊन थडकेल असा अंदाज आहे. **पेशावर येथें नदी तटावरील** इमारती नामशेष

झाल्या. पण नुकताच अटक कँबेलपूर रस्ता सुरू झाला. झेलमनें काश्मीर भागांत फार नासधूस केली. **तारायंत्रें वाहून गेलीं.** रस्ते बंद पडले. ”

वरील लिखाणातील दोष किती म्हणून दाखवावे ? पहिलीच बाब घ्या. सिंधूला मराठींत ‘ नद ’ म्हणतात, नदी नव्हे. त्याचा उगम पंजाबांत आहे हा नवीनच भौगोलिक शोध म्हटला पाहिजे व तो लावणारास रॉयल जिआग्रॅफिकल सोसायटीच्या अध्यक्षपदाचा मान देणेंच रास्त होईल. सिंधूला कोणत्या नद्या मिळतात हें सांगता येणें कठीण का आहे ? पण पंजाबातील नद्यात ‘ अटक ’ नदी आली कुठून ? ‘ अटक ’ गांवचा विसर मराठ्यांना तरी पडावयाचा नाहीं. ते सिंधूतीरीं आहे. तेव्हा ‘ अटक ’ नदी कोणती ? पुढें पहा. पेशावर येथला पूर म्हटलें आहे तो कशाचा ? पेशावर येथें मुळीं नदी — ओढा सुद्धां — नाहीं, मग पूर येणार कसा व नदी तटावरील इमारती ‘नामशेष’ होणार कशा ? बरें, पेशावरची बातमी सांगतांना मध्येंच सिंध प्रान्तात उड्डाण का केलें ? आज, उद्या, म्हणजे केव्हा ? शेवटची बहार तर औरच आहे. झेलमनें काश्मीर ‘ भागात ’ म्हणे ‘ नासधूस ’ केली. फक्त तारायंत्रेंच वाहून गेलीं, याचा अर्थ मला तरी समजत नाहीं. म्हणजे तारायंत्रें, हा नदी प्रवाहावर वाढणारा काहीं वनस्पतीचा प्रकार आहे काय ? नुसतीं ‘ तारायंत्रे ’ च वाहून जातात, तीं जेथें आहेत त्या घरादारांना काही धक्का पोंचत नाही, ही अजब जादू नव्हे ?

याचा अर्थ एवढाच कीं सिंध व पंजाबमध्यें जलप्रलयानें उडविला नाहीं इतका कहर व अनर्थ त्या बातमीनें त्या पत्रपंडिताच्या डोक्यात उडविला. आणि त्या अनर्थाचे वास्तविक शब्दचित्र कागदावर उठलें. असो.

वरील प्रकार ही भाषांतराची चूक नव्हे. तर साध्या ज्ञानाचा, व्यवहारज्ञानाचा पूर्ण अभाव होय. वर सांगितलेल्या चुका घडल्या याचें कारण वर्तमानपत्रें नीट वाचता येत नाहींत हें आहे. इंग्रजी पत्रातून पुष्कळच मजकूर मराठी पत्रें घेतात आणि तो भाषान्तरण्याचें काम कोणावरही सोंपविलें असतें. त्यामुळें “ ‘इविड’ नामक ग्रंथकार पृ. × × × वर म्हणतो,” असे किंवा “सेनापति ‘गॉसिप’ म्हणतात,” अशा तऱ्हेचे अत्यंत हास्यास्पद प्रयोग निर्माण होतात. “तुम्ही आपले घाणेरडें कापड सार्वजनिक ठिकाणीं कां धुतां ? ”

असलेही विचित्र नमुने आपणांस पहावयास मिळतात. हीं कांहीं काल्पनिक चित्रें नव्हत. पण यात भाषातराच्या चुकीबरोबरच व्यवहारज्ञानाचा अभाव नाहीं दिसत ? 'इबिड', 'गॉसिप', 'डर्टी लिनन्' या शब्दांचे अर्थ कसे विपरीत झाले पहा. अशा चुका क्षम्य ठरत नाहींत. वर्तमानपत्रकर्ता म्हणजे सदैव तारेवरचीच कसरत करीत असतो असें म्हणतात. त्याचा एका दृष्टीनें हा अर्थ, कीं त्यात कोठें चुका होऊं नयेत म्हणून कचेरींतील सर्वांना धडपडावें लागतें. प्रत्येक वाचक आपल्या दोन्ही डोळ्यांनीं त्या पत्राकडे पहाणार आणि चूक असली कीं पत्रकर्त्याला दोष मिळणार. म्हणून अशा दिव्यातून 'अचुक'पणें पार पडण्याकडेच पत्रपंडिताचें लक्ष असावयास पाहिजे. असो.

बातमी नसल तेव्हां सुद्धां एखाद्या प्रसंगाला बातमीचें स्वरूप देतां येतें. आणि असे प्रसंग इस्पितळें, अनाथाश्रम, प्राणिसंग्रहालयें अशा ठिकाणींच बातमीदाराच्या हातीं लागतात. निरीक्षण सूक्ष्म असल्यास भर रस्त्यावरदेखील केव्हा केव्हां असलीं दृश्यें पहावयास मिळतील. वर्तमानपत्रांत विशेष खळबळ उडविणारी बातमी बरेच दिवस आली नाहीं म्हणजे बातमीदाराना असली बातमी बनविण्याच्या मोहिमेवर जावें लागतें. मूक प्राण्याचें मानवी वर्तन, समाजांतील क्रूरपणाच्या रूढी, बालकांचें निष्पाप मन, असल्याच बाबी या बनविलेल्या बातमींत येतात. समजा एका इस्पितळात गेल्यावर एखादा सहा सात वर्षांचा मुलगा – जखमी झालेला – खाटेवर पडल्या पडल्याच भेटावयास आलेल्या आईशीं बोलत होता. " आई ग, मला लागलेलं धुतांना, त्याला पट्टी बांधतांना, जरा धक्का लागला कीं मी 'आई ग' म्हणूनच का ओरडतों ? ठणका लागला, तरी आपली मी तुलाच हांक मारतों ! बाबांचें नांव नाहीं तोंडातून येत ! म्हणूनच मी तुला फार आवडतो होय ? "

हें चित्र पाहून, त्याचें वर्णन ऐकून वाचकांना मुलाचें कौतुक नाहीं वाटणार ? मातृप्रेमाची आठवण त्यांना होईल. '**म्हणोनि म्हणती भले न ऋण जन्मदेचें फिटे**' असें ते गुणगुणतील – म्हणजे हा प्रसंग वर्तमानपत्रांत खास बसण्यासारखा आहे.

पोरक्या मुलांचा आपसांत चाललेला आईबापांसंबंधींचा निर्देश, मृत्यूविषयीं त्यांनीं बनविलेली कल्पना, मानवी कृत्रिम बंधनांचें त्यांना असलेलें गाढ

अज्ञान, इत्यादि बालवयांतील किती तरी बाबी मनुष्याच्या जीवितांत अक्षय्य आनंदाच्या व कौतुकाच्या होऊन बसतात. त्या वर्तमानपत्रात अधून मधून आणण्यास कुणाचीच हरकत नाहीं.

असलींच आणखी एक दोन उदाहरणें पहा. हिंगण्यास असलेल्या एका बालविधवेनें – पाच वर्षांच्या ( शेवट्या ? ) पोरीनें – डोक्यात फूल घालण्याचें नाकारलें. आईने मला घालायचें नाहीं म्हणून बजावलें असल्याचें तिनें सांगितलें आणि सर्वांनीं मिळून आग्रह केला तरी तिनें हट्ट धरून आईची आज्ञा पाळली ! फूल डोक्यात म्हणून घातलें नाहीं. ह्या प्रसंगानुरोधानें किती तरी लिखाण बातमीदारास लिहितां येईल. आणि प्रत्येक वाचकास तें वाचनीय वाटेल. रूढीवर कोरडे उडविता येतील; फुलाप्रमाणें नाजुक असलेल्या मुलीच्या कोमल भावना इतक्या बालपणींच करपवून टाकल्याबद्दल टीका करतां येईल.........लोकाना शिकविता येईल – दुर्लक्ष केलेल्या प्रश्नाकडे त्यांचे लक्ष खेचता येईल. पण असले प्रसंग हुडकण्यातच सर्व कौशल्य असतें.

प्राणिसंग्रहातील, समजा, एक माहूत मेला, तर हत्तीनें दोन दिवस अन्न सोडलें. किंवा आपला सहचर स्वर्गवासी झाल्यामुळें एका हरिणीनें मूक राहूनच पण आपल्या सर्व भावना व्यक्त केल्या. म्हणजे बसल्या जागचें उठावयाचें नाहीं – चारापाण्याकडे पहावयाचें सुद्धा नाहीं – कुणी जवळपास आलें तरी लक्ष द्यावयाचें नाहीं. ह्या सर्व बाबी योग्य रीतीनें रंगविल्या – त्यांचें वर्णन नीट केलें, तर तो मजकूर खात्रीनें वाचनीय होईल – वाचकांत त्या संबंधीं चर्चा चालेल – प्राणिसंग्रहालयात ती हरिणी पाहण्यास गर्दी लोटेल... अशाच बारीक गोष्टी वर्तमानपत्रात येऊन बसतात.

बातमीदारानें आपलें वर्तमानपत्र नित्यनेमानें वाचण्याचा सराव ठेवावा. आपण लिहिलेला मजकूर पुनः पुनः – अपत्यस्नेहानें नव्हे तर – टीकात्मक दृष्टीनें वाचावा. इतर पत्रानीं तीच बातमी कशी लिहिली याची तुलना करावी. आणि तसले प्रसंग, तसले अपघात, त्या घडामोडी, वेगवेगळीं पत्रें – विविध भाषेंतील, निरनिराळ्या पक्षोपपक्षाचीं, ठिकठिकाणचीं – कशा प्रकारें रंगवितात हें अभ्यासण्याचा त्याचा परिपाठ असावा. अशा सरावानें वारंवार आपल्या लिखाणांत सुधारणा करतां येते व ती झाल्याबद्दल स्वतःस समाधान झालें पाहिजे.

“ इतर पत्रें चालण्यास वेळ आहे कुणाला ? ” ही पत्रपंडितानें सबब मागितली कीं, त्याच्या नालायकीचें तें सर्टिफिकिट समजावें. कारण आपला पोषाख नीट झाला आहे कीं नाहीं हें कळण्यास आरशाची आवश्यकता असते, तद्वतच आपल्या करामतीचें प्रतिबिंब पहाण्यासाठीं विविध वर्तमानपत्रात थोडें तरी डोकें खुपसलें पाहिजे.

शेवटची बाब औचित्यासंबंधींची. वर्तमानपत्र म्हटलें कीं, त्यात औचित्य प्रत्येक लेखांत दिसलें पाहिजे. भूकंपामुळे बिहार – ओरिसा प्रातातील पुष्कळ शहरांची नासधूस झाली, कीं लगेच भूकंपासंबधींची शास्त्रीय कारणमीमासा, बिहारप्रांतांत प्राचीन व अर्वाचीन काळांत भूकंप झाले असल्यास त्याचा धावता इतिहास, उध्वस्त झालेल्या शहराची पूर्वीपासूनची माहिती, त्याचें पौराणिक, आधुनिक, व्यापारी–औद्योगिक महत्त्व, अशा किती तरी माहितीचे लेख त्या निमित्तानें देतां येतात. आणि ही माहिती मिळविण्यास काहीं त्या प्रातात जावेंच लागतें असें नाहीं.

तसाच प्रकार मोठमोठया खटल्यासंबंधीं असतो. ‘ मीरत ’ खटला किंवा लाहोरमधील क्रातिकारकावर झालेले खटले, याची बातमी वर्षानुवर्षे द्यावी लागते. पण एकदां अखेर गांठली म्हणजे मूळपासूनची पूर्वपीठिका थोडक्यात द्यावी. किती साक्षीदार आणले, किती वेळ त्या खटल्यानें खाल्ला, खर्च केवढा झाला,......अशा अनेक संबद्ध गोष्टींचा उल्लेख करून तें लिखाण वाचनीय करतां येतें. तें करण्यास विसरूं नये. परंतु ह्या सर्व बाबी वास्तविक संपादकीय सूचनेवरून करावयाच्या असतात. जिल्हानिहाय असणाऱ्या बातमीदाराना समजावें म्हणून नुसता उल्लेख तेवढा येथे केला.

झालें ! होतकरू बातमीदाराला सागण्यासारखें मजजवळ थोडें बहुत सांचलेलें ज्ञान होतें तें संपलें ! बाधलेल्या शिदोरीला परिमिती ही असावयाचीच. बातमीदारी ही एक शिकण्यासारखी विद्या आहे, लिहिता येणाऱ्या सर्वच जणांना विनायासें ती साधते असें नव्हे, इतकें समजलें तरी पुष्कळच कार्य झालें असें मी समजेन.

# स्फुट सूचना

[ माझें लिखाण अपुरें असल्याची जाणीव पदोपदीं होत असल्यानें त्याला अनुभवी अधिकाराची जोड मिळावी म्हणून नामांकित पत्र-पंडितांना त्यांच्या आवडीच्या शाखांविषयीं माहिती लिहिण्याची विनंती केली. त्यांनीं ती मानिली व मला, तसेंच मराठी वाचकांना, उपकृत केलें. कित्येकांकडून वेळेवर लिखाण आलें नाहीं म्हणून माझी ( व त्यांचीही ) निराशा झाली खरी. पण त्याला इलाज नव्हता. पुढील लिखाणांतील मतें अर्थातच ज्या त्या लेखकांची होत. माझा अनुभव कित्येक बाबतींत अगदीं उलटा आहे. आतांपर्यंत सांगितलेल्या माहितींत व या सूचनांत फरक कांहीं ठिकाणीं आढळला तर तो केवळ मत-भेदाचा प्रश्न समजावा. आणि तो कुठेंही राहणारच.

—श्री. रा. टि. ]

— १ —

ले. **दत्तात्रय वासुदेव केळकर**

[ नागपूरच्या 'महाराष्ट्र' चे मुंबईतील बातमीदार. आर्थिक तज्ञ म्हणून यांनीं ८ वर्षें काम केलें असून 'स्टेटस्मन्' चेही ते कापूस बाजारांतील घडामोडी कळविणारे तज्ञ बातमीदार होते. ]

## शहर-संपादक ऊर्फ बाजारांतील बातमीदार

'शहर–संपादक' हा मथळा पाहून कित्येकांस असें वाटेल कीं सभा, मिरवणुकी, प्रवचनें, चित्रपट, सुविख्यात व्यक्तींचें आगमन, स्वागत, प्रयाण वगैरे स्थानिक हकीगती जो उपसंपादक देतो तोच 'शहर–संपादक'. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. लंडन, पॅरिस, बर्लिन, न्यूयॉर्क, टोकिओ, ओसाका, शांघाय वगैरे व्यापारी दृष्ट्या महत्त्वाच्या अशा केंद्रांतील वृत्तपत्रांचा जो संपादक हुंड्या, कापूस, शेअर्स, चांदीसोनें, मध्यवर्ति बँकांचें धोरण, सरकारचें आर्थिक धोरण व प्रत्यक्ष कृति इत्यादि गोष्टींचा दैनंदिन मेळ बसवून देतो, त्यालाच 'शहर-संपादक' ही उच्च पदवी देण्याचा तिकडे प्रघात आहे. ही शहर-संपादकांची जात हिंदुस्थानांत उपलब्ध नाहीं. टाइम्स्, स्टेट्स्मन्

वगैरे भारदस्त व सुखवस्तु हिंदी पण अराष्ट्रीय दैनिकांनींसुद्धा ही संस्था अद्यापि अस्तित्वात आणिली नाहीं. याचें मुख्य कारण लायख माणसांचा अभाव हें असलें, तरी वरील दोन पत्रांचीं व्यापारी माहितीनें भरलेलीं पृष्ठें व आठवडयाच्या अखेरीस त्यांत प्रसिद्ध होणारीं नाणेबाजार, सराफकट्टा, हुंडीबाजार, शेअर बाजार वगैरे संबंधीचीं साप्ताहिक समालोचनें पाहिलीं, कीं मनाला पूर्ण समाधान वाटतें व आज ना उद्यां हीं पत्रें नक्की ' शहर-संपादक ' उत्पन्न करणार, अशी खात्री वाटूं लागते. क्रॉनिकल, फ्री प्रेस वगैरे हिंदी मालकीच्या इंग्रजी दैनिकानीं सर्व बाजाराचे दैनंदिन व साप्ताहिक अहवाल देण्याचा स्तुत्य उपक्रम गेलीं काहीं वर्षें अव्याहत केला असून, त्याच्या व्यवस्थापकास ही गोष्ट भूषणावह आहे. देशांतील अँग्लोइंडियन वृत्तपत्रें व क्रॉनिकल – फ्री प्रेस वगैरेसारखी राष्ट्रीय वृत्तपत्रें याजमध्यें प्रचलित आर्थिक प्रश्नावर जे अधिकृत लेख येतात त्यावरून सुद्धां आंतरराष्ट्रीय दृष्ट्या हीं पत्रें किती पुढें गेलीं आहेत त्याची कल्पना येते.

आश्चर्याची गोष्ट अशी कीं, मुंबई-समाचार, हिंदुस्थान व नवभारत या गुजराथी दैनिकांतहि आर्थिक प्रश्नाचा व बाजाराचा उत्कृष्ट परामर्ष घेण्यांत येतो. आणि त्याहूनहि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, मुंबईचे व इलाख्यांत अन्यत्र पसरलेले गुजराथी, पारशी व मुसलमान लखपति अगर कोटयाधीश व्यापारी, व बँकर सुद्धा ' टाइम्स ' च्या आधीं ' मुंबई-समाचार ' वाचतात व व्यापारासंबंधीं आपलें मत बनवितात. वरील सर्व वृत्तपत्राचा खप हजारानीं होतो व तीं यशस्वीपणें चालतात, याचें कारण माझ्या अल्पमतीप्रमाणें त्याची व्यापारी माहितीचीं पृष्ठ व त्यामधील आर्थिक महत्त्वाचे लेख हेंच आहे.

विद्यमान मराठी दैनिकात अगर साप्ताहिकांत असें एकहि वृत्तपत्र नाहीं कीं ज्यांत निदान हिंदुस्थानातील बाजाराचा तरी पूर्णपणें अगर अंशतः अधिकृत व स्वसंपादित अहवाल येतो. मग सबंध जगांतील बाजाराचा व अर्थशास्त्रीय सृष्टींतील विषयांचा उहापोह तर बाजूलाच राहिला. सध्यां एकदोन मराठी वृत्तपत्रानीं ' टाइम्स ' मधील अहवालाचे भाषांतर देण्याचा उपक्रम आरंभिला आहे; परंतु कित्येक प्रसंगीं विहिरींतच पाणी नसल्यामुळें तें पोहोच्यांत उतरणें फार जड जातें. कित्येक मराठी वृत्तपत्रातील आर्थिक प्रश्नांवरील लेख तर निव्वळ हास्यापद असतात.

उदाहरणार्थ, पुण्याच्या एका सुप्रसिद्ध वृत्तपत्रानें देशी गिरणीधंद्यास संरक्षण द्यावें कीं नाहीं, या प्रश्नाचा उहापोह आपल्या अग्रलेखांत आरंभिला. सुरुवातीला संपादक महाशयांनीं हिंदुस्थानांत गिरणीधंदा सुरू केव्हां झाला व मुंबईत पहिली गिरणी केव्हां प्रस्थापित झाली या संबंधींची ऐतिहासिक माहिती तपशीलवार दिली व अखेरच्या परिच्छेदकांत ‘ गिरणीधंद्यास संरक्षण द्यावें कीं नाहीं, द्यावयाचें असल्यास किती द्यावें याचा विचार टॅरिफ-बोर्ड करीलच ! ’ असा निर्वाळा देऊन आपला अग्रलेख आटोपला ! संरक्षणाच्या विषयावर आपणास काहीं तरी उत्कृष्ट विवरण वाचावयास मिळणार व देशापुढें पडलेलें कोडें नक्की उकललें जाणार, अशा भरंवशानें सदर लेख वाचणाऱ्या अभ्यासूंनीं तो वाचून निराशेनें दुःखाचा सुस्कारा सोडला असेल यात शंका नाहीं. असल्या चुका होण्याचें कारण संपादकीय घमेंड हें आहे. महाराष्ट्रांतील बहुतेक मराठी दैनिक–साप्ताहिकांच्या संपादकांचा बहुधा समज असा कीं, केवळ राजकारणावरच काय, पण वेदान्त, तत्त्वज्ञान, इतिहास, शास्त्रीय शोध, पदार्थविज्ञानशास्त्र, अर्थशास्त्र, शिल्पशास्त्र, युद्धशास्त्र, या सर्व विषयांतले आपण तज्ज्ञ असून आपण जें विषय विवेचन करूं, अगर मत ठोकूं, तेंच सर्वस्वी रास्त असलें पाहिजे. परंतु, हा समज खोटा आहे. निरनिराळ्या विषयावरील लेख त्या त्या विषयातील तज्ज्ञानेंच लिहिले पाहिजेत. या बाबतींत कै. लोकमान्यानीं महाराष्ट्रीय वृत्तपत्राच्या विद्यमान संपादकाना जो स्तुत्य धडा घालून दिला त्याची सध्यां आबाळ व अवहेलना होत आहे. ज्या विषयाचा आपला पुरेपूर अभ्यास नाहीं, त्या विषयावरील लेख कै. लोकमान्य त्या त्या विषयाच्या तज्ज्ञाकडून लिहून घेत असत व अशा प्रकारें आपल्या अनंत वाचकांची भूकतहान भागवीत असत असें म्हणतात.

हा धडा विसरल्यामुळें सध्या किती हास्यास्पद प्रकार घडतात, त्याचा एक मासला देतों. नुकताच हिंदुस्थानच्या हुंडणावळीचा प्रश्न निघाला असतां मुंबईतील एका मराठी दैनिकाच्या संपादक बुवानें अठरा पेन्साच्या हुंडीचा निषेध व सोळा पेन्सांच्या हुंडीची तरफदारी पुढीलप्रमाणें केली :—

“ अठरा पेन्सांचा भाव झाल्यानें **रुपयाची किंमत घटली यामुळें हिंदुस्थानच्या व्यापाराची** जितकी

कायदेशीर लुटालूट झाली तितकी करांच्या वसुलानेंहि झाली नसेल. रुपयाचा भाव १६ पेन्स ठरवून **रुपयाची किंमत वाढवावी** अशा अर्थाचे ठराव......इत्यादींनीं सरकारकडे पाठविले आहेत"–वगैरे, वगैरे.

वरील मजकूर एका स्फुटांत लिहितांना संपादक महाशयांनीं दुसरें तिसरें कांहीं केलें नाहीं – चार दोन राष्ट्रीय व्यापारी मंडळाचे ठराव घेऊन त्यांच्याच भाषेंत टीका करण्याचा यत्न केला. पण, तो फसला. याचे कारण असें, कीं मूळ ठराव मराठींत नसून इंग्रजींत होते. त्यामुळें संपादक बुवाची भाषांतर करतांना फटफजिती उडाली. त्यांना 'रुपयाची किंमत' व 'रौप्य-किंमती' यांमधील फरक समजला नाहीं. 'प्राइस ऑफ् दि रुपी' व 'रुपी प्रायसेस' यांमध्यें जमीन–अस्मानाचा फरक आहे, ही गोष्ट साधारण बुद्धीच्या कोणत्याही शहर–संपादकाला समजली असती. वरील टीका पुढील शब्दात द्यावयास हवी होती :—

" अठरा पेन्सांचा भाव झाल्यानें **अंतर्गत घाऊक किंमती घटल्या.** यामुळें हिंदुस्थानच्या **निर्गत** व्यापाराची जेवढी कायदेशीर लुटालूट झाली, तितकी कराच्या वसुलानेंहि झाली नसेल. रुपयाचा भाव १६ पेन्स ठरवून अंतर्गत **घाउक किंमती** ( होलसेल रुपी प्रायसेस ) **वाढवाव्या.** " वगैरे वगैरे.

लायक शहर-संपादक बाजारांचा बातमीदार असल्यास असल्या चुका सहज टाळतां येण्यासारख्या आहेत. बाजार–बातमीदार हा साधारणतः सर्व बाजारांत संचार करीत असतो. हुंडी, शेअर्स, रोखे, बँकाचे साप्ताहिक अहवाल, करन्सी खात्याचे साप्ताहिक अहवाल, कापूस, चांदी, सोनें, भुईमूग, अळशी, एरंडी, इत्यादि बाजार व संस्था यांजमधील घडामोडींचे तुलनात्मक आंकडे त्याचेजवळ सदैव तयार असले पाहिजेत. कोणत्याहि बाजारांत विशेष स्वरूपाच्या अशा घडामोडी झाल्या तर त्या कां झाल्या, त्यासंबंधीं सरकार व व्यापारी या उभयतांचें मत काय व लोकांनीं कोणतें धोरण नजरेसमोर ठेवावें – याची उत्तरें बाजारांच्या बातमीदारानें तात्काल प्रत्यक्ष हकीगतीच्या अगर मुलाखतींच्या रूपानें दिलीं पाहिजेत. प्रत्येक वृत्तपत्राचे साधारणतः दोनतीन रकाने अधिकृत व्यापारी माहितीनें भरण्याची एकदां संवय झाली कीं सहसा कोणताहि

महत्त्वाचा प्रश्न शहर-संपादकाचे नजरेआड होणें शक्य नाहीं. परंतु, जिथें मुख्य संपादकालाच शहर-संपादकाची अगर बाजार-बातमीदाराची आवश्यकता भासत नाहीं, तिथें अमूक मनुष्य बाजार-बातमीसाठीं लायक हें समजावें कसें ? तथापि, आपले अनंत वाचक तांदूळ, कापूस, भुईमूग अगर अळशी, मोठ्या प्रमाणात पिकवीत अगर विकीत असतात; पुष्कळसे दलाल-वाचक हजारों तोळे सोन्याची हरदिन देवघेव करीत असतात – अशा लोकासाठीं आपण अधिकृत असे व्यापारी अहवाल दिलेच पाहिजेत व प्रत्येक महत्त्वाच्या आर्थिक घडामोडींचा भिन्न भिन्न बाजारावर काय परिणाम होईल याचे अंदाज आपण अधिकृतपणें प्रसिद्ध केले पाहिजेत – याची जाणीव प्रत्येक संपादकाला असणें जरूर आहे. किंबहुना, यापुढें जीं वृत्तपत्रें वरील स्वरूपाची माहिती व चर्चा देतील तींच लोकादरास पात्र होतील व जगतील. बाजारातील बातमीदाराची ही जात एकदां निर्माण झाली कीं व्यापारी पेढयांच्या व बँकाच्या सहकार्यामुळें ती सहज व्यापारी आर्थिक वाङ्मय व उपयुक्त माहिती निर्माण करूं शकेल. व्यापारी पेढ्या व व्यापारांतील मुरब्बी अगर तज्ज्ञ हे आपआपल्या क्षेत्रांतील महत्त्वाच्या घडामोडी व त्यांचे परिणाम सागण्यास सदैव उत्सुक असतात, हें येथें सांगून ठेवणें जरूर आहे.

आता बँका, हुंडी, नाणें, रोखे, शेअर्स, कापूस, आळशी, चांदी, सोनें, वगैरे बाबतची माहिती कोठें मिळते तें सांगून हा विषय संपवितों.

इंपीरियल बँक ही हिंदुस्थानची मध्यवर्ति बँक असून तिचा साप्ताहिक जमाखर्चाचा ठोकळ तक्ता दर गुरुवारीं प्रसिद्ध होतो. तो बँकेच्या एका 'काउंटर'वर फ्रेम करून ठेविलेला असतो. चलनखात्याचा तक्ता महिन्यातून फक्त चारदां ( ७, १५, २२ व महिना अखेर या ठरीव तारखांना ) करन्सी कचेरींत लावलेला असतो. त्यावरून चलनसंकोच, चलनविस्तार, रौप्यमुद्रांसाठीं अंतर्गत मागणी वगैरे गोष्टींची कल्पना येऊं शकते. रिझर्व बँक अस्तित्वांत आल्यावर हे दोन्ही तक्ते एकदम एकाच ठिकाणीं प्रसिद्ध होतील. तयार अगर वायद्याच्या हुंडीचे दर कोणत्याही हुंडी–बँकेच्या ( एक्स्चेंज बँक ) बोर्डावर १०॥ वाजल्यापासून लाविलेले असतात. मर्कंटाइल् बँकेच्या फूटपायरीवर हवे तेवढे हुंडी–दलाल उभे असतात. त्यास येतां जातां 'शुं ध्यान छे !

एवढा प्रश्न विचारल्यास ‘ जरा नरम लागे ’—‘ बाजार जरा टाइट् लागे ’ इत्यादि उत्तरें ते तात्काळ देतात. यामुळें हुंडीचा नूर सहजासहजीं समजतो.

रोखे व शेअर्स यामधील व्यवहार, दलाल स्ट्रीटमध्यें एकाच बाजारांत चालतात. शेअर्सचे भाव मोठया थोरल्या काळया फळयावर लिहिलेले असतात. हा बाजार सहसा १२ ते ३ चे पलीकडे उघडा राहत नाहीं. अर्थात् बाजाराचे बंद भावही फळयावर तात्काळ मिळतात. रोख्यांतील व्यवहार मात्र सायंकाळीं ४ ते ५ पर्यंत पुनः एकदा चालतात. याचें कारण असें कीं, तेवढया अवकाशात लंडनचा रोखे बाजार उघडतो व तेथील हिंदी रोख्याच्या किंमतीचा परिणाम स्थानिक रोख्यांवर तात्काळ होतो. शेअर्स व रोखे याच्या किंमतींत भरमसाट घडामोड दिसून आल्यास कोणत्याहि दोन शेअरदलालाकडे जावें व कारणे विचारावीं. ते खुषीने सागतात.

चांदी, सोनें, कापूस, अळशी, गहूं, भुईमूग वगैरेचे वायद्याचे बाजार पायधुणीचे आसपास भरतात. चादी – सोन्याचा वायद्याचा व्यापार सकाळपासून रात्रीं १०–११ वाजेपर्यंत चालतो. शाघायला आपल्या आधीं सूर्य उगवतो. अर्थात् आपण अंथरुणातून उठतों न उठतों तों तेथील बाजार उघडलेला असतो व तेथील भावहि इकडे तारेनें आलेले असतात. तेथें जरा वेळ उभें राहिलें कीं भाव समजतो. नोटिसबोर्डावरहि हे भाव लिहिले जातात. कापूस व्यापार दोन ठिकाणीं चालतो. एक ईस्ट इंडिया कॉटन असोसिएशन या सरकार मान्य संस्थेच्या हॉलमध्यें व दुसरा महाजन असोसिएशनच्या हॉलमध्यें. पैकीं ईस्ट इंडियाचे भाव व व्यवहार हे वृत्तपत्रासाठीं अधिक अधिकृत व विश्वसनीय समजावे. या बाजाराच्या आसपास कापूस दलालांच्या शेंकडों पेढया असतात. त्यापैकीं कित्येक स्वतःचे दैनिक रिपोर्ट प्रसिद्ध करतात व त्यांत आपलें मतहि देतात. अळशी, गहूं, भुईमूग, एरंडी वगैरेंतील व्यवहार पायधुणीनजीकच ट्रामरस्त्यावर एका ओटयावर चालतो तेथेंहि सर्व भाव व माहिती हीं मिळूं शकतात.

एवढी माहिती जें दररोज देईल तेंच खरें वृत्तपत्र. अशा माहितीनें भरलेलीं सुंदर वृत्तपत्रें महाराष्ट्रात दिसावीं या उच्च हेतूनेंच वरील विधायक सूचना केल्या असून सध्यांच्या पत्रांवर थोडीफार पण प्रामाणिक टीका केली आहे.

– २ –

लेखकः—श्री. **अनंत हरि गद्रे**

[ आद्य ' मौज ' कार म्हणून महाराष्ट्राला परिचित. हल्लीं निर्भीडचे संपादक. ' संदेश ' मधील लो. टिळकांच्या स्वराज्याच्या दौऱ्यांतील प्रभावी बातमीपत्रें लिहिणारे खास बातमीदार. आणि तीं त्यावेळीं महाराष्ट्रीय वाचकांना अत्यंत आवडलेलीं. ' नवी मौज ' म्हणूनही एका साप्ताहिकाचे मध्यंतरीचे संपादक. ]

## वृत्तपत्रव्यवसायांत बातमीदाराचें महत्त्व

प्रस्तुत पुस्तकांत मी वरील विषयावर थोडक्यांत माझे विचार प्रदर्शित करण्याचें ठरविलें आहे. हे विचार प्रदर्शित करतांना मी स्वतः एके काळीं बातमीदाराचें काम करीत असतांना घेतलेल्या प्रत्यक्ष अनुभवांचा उल्लेख करून शिवाय, एकंदर वृत्तपत्रव्यवसायाला बातमीदारांचा उपयोग किती प्रमाणांत होणें शक्य आहे याचेंहि तात्विक विवेचन करणार आहें. असें करतांना जर कांहीं निर्भीडपणाची टीका माझ्या हातून होऊन गेली, तर टीकाविषय झालेल्या व्यक्तींनीं व वृत्तपत्रांच्या चालकांनीं माझ्यावर व्यक्तीविषयक टीकेचा किंवा असद्धेतूचा आरोप करूं नये, एवढीच माझी त्यांस विनंति आहे. कोणत्याहि विषयाचा, अनुभवसिद्ध गोष्टींचा उपयोग करून घेऊन, उहापोह करावयाचा म्हणजे थोडी फार व्यक्तिगत टीका केल्याशिवाय गत्यंतरच नसतें. ज्या अर्थी मला या पुस्तकात माझे विचार प्रदर्शित करण्यासंबंधींची प्रेमळ आज्ञा झालेली आहे, त्या अर्थी मला माझें कर्तव्य निर्भीडपणेंच केलें पाहिजे. असो.

या पुस्तकांत ' बातमीदार ' हा शब्द ' रिपोर्टर,' ' कॉरेस्पॉंडंट,' ' रिप्रेझेंटेटिव्ह ' इत्यादि इंग्रजी शब्दांचा एका शब्दांत समावेश होईल अशा हेतूनें वापरण्यांत आलेला आहे. वर जे मी तीन इंग्रजी शब्द सांगितले, त्यांचे अर्थ एकमेकांपासून थोडथोडे भिन्न आहेत. परंतु त्या सर्व अर्थांचा ' बातमीदार ' या एकाच शब्दांत समावेश करण्यांत आल्याकारणानें मला वरील तिन्ही शब्दांचे अर्थ लक्षांत घेऊन ' बातमीदार ' या एका सर्वंकष शब्दाचें विवेचन करावें लागेल.

( १ ) रिपोर्टर. रिपोर्टर म्हणजे सामान्यतः कुठल्याही घडामोडीची बातमी आणून देणारा इसम. या घडामोडींत सभा, परिषदा, संमेलनें, क्रीडाचे सामने कोर्टांतील खटले, उद्घाटन समारंभ इत्यादि बाबींचा समावेश होतो. हा रिपोर्टर वरील प्रकारच्या घडामोडी ज्या ठिकाणीं घडून येतात त्या ठिकाणीं प्रत्यक्ष जाऊन तेथील बातमी गोळा करून ती वर्तमानपत्राच्या संपादकाजवळ आणून देत असतो. या रिपोर्टरानें मिळालेली बातमी आणून दिल्यावर तिचा योग्य प्रकारें उपयोग करणें व ती यथायोग्य रीतीनें वर्तमानपत्रांत मांडणें हें काम संपादकानें करावयाचें असतें.

( २ ) कॉरेस्पॉन्डंट. हा सुद्धां बातमीदारच असतो. पण तो नुसती बातमीच मिळवून स्वस्थ बसत नाहीं. बातमीदार ज्या ज्या ठिकाणीं जातो त्या त्या ठिकाणीं हा कॉरेस्पॉन्डंटहि जात असतो. परंतु रिपोर्टरापेक्षा या कॉरेस्पॉन्डंटवर अधिक जबाबदारी असते. मिळेल ती बातमी घेऊन तीवर तो आपल्या तर्कांची इमारत रचीत असतो व त्या बातमीला आपली टीका उर्फ मल्लीनाथी जोडतो. अर्थात कॉरेस्पॉन्डंट हा गृहस्थ थोडें फार संपादकाचेंहि काम करीत असतो.

( ३ ) रिप्रेझेंटेटिव्ह. हा गृहस्थ रिपोर्टर, कॉरेस्पॉन्डंट या दोघांचींही कामें करून वर आणखी प्रत्यक्ष संपादकाचे अधिकार गाजवीत असतो. मराठीमध्यें प्रतिनिधी या शब्दानें जे जे अर्थ व्यक्त होतात ते ते अर्थ रिप्रेझेंटेटिव्ह या शब्दात समाविष्ट झालेले असतात. अर्थात हाहि गृहस्थ प्रत्यक्ष संपादकाचेच अधिकार गाजवीत असतो.

अशा प्रकारें रिपोर्टर ( वार्ताहर ) कॉरेस्पॉन्डंट ( खास बातमीदार ) रिप्रेझे-न्टेटिव्ह ( प्रतिनिधी ) या तिन्ही शब्दाचा समावेश बातमीदार या एकाच शब्दात करावयाचा आहे मराठी वृत्तपत्राची सद्यःस्थिति लक्षात घेता वर वर्णन केलेले तिन्ही प्रकारचे लोक फारसे आढळत नाहींत. मग तिघांचाहि समावेश ज्याच्यामध्यें झालला आहे, असा सर्वंकष बातमीदार सापडणें कठिण वाटल्यास नवल नाहीं. बातमीदाराच्या दृष्टीनें विचार केल्यास आपलीं मराठी दैनिकें ( बातमीदाराचा मुख्य उपयोग दैनिकानाच विशेष होत असतो ) अत्यंत बाल्यावस्थेत आहेत असेंच मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. आपलीं

मराठी दैनिकें इतकीं परावलंबी वृत्तीचीं व गचाळ भावनेचीं आहेत, कीं त्यांना बातमीसाठीं स्वतःच्या माणसांपेक्षा इंग्रजी वृत्तपत्रांच्या माणसांवरच अधिक भरंवसा ठेवणें भाग पडतें. या कामीं अपवाद नाहींत असें नाहीं. पण ते इतके थोडे आहेत कीं या अपवादांनीं मी वर सांगितलेला नियमच सिद्ध होतो. आपल्या हल्लींच्या मराठी दैनिकांत वरील दृष्टीनें ‘ ज्ञानप्रकाश ’ दैनिकाचा पहिला नंबर लागतो. त्या नंतर ‘ सकाळ ’ दैनिकाचा नंबर व त्याच्याहि नंतर इतर दैनिकें ! येथें एक गोष्ट सांगितल्या शिवाय रहावत नाहीं. ती ही कीं ज्ञानप्रकाश दैनिकानें आपलें नवें स्वरूप प्रकट केलें तें बातमीदाराच्याच मार्फत होय. श्री. काकासाहेब लिमये यांनीं ज्ञानप्रकाशचें संपादकत्व हातीं घेतल्यापासून जर पहिली कोणती सुधारणा केली असेल तर ती बातमीदार खात्याची. काकासाहेब लिमयांनीं आपले बातमीदार सर्व तऱ्हेच्या सार्वजनिक घडामोडींची बातमी आणण्यासाठीं नेमले व त्याना अवश्य असलेलें संपादकीय प्रोत्साहनहि दिलें. ज्ञानप्रकाश दैनिकात काकासाहेब लिमयांनीं ज्या इतर काहीं सुधारणा केल्या असतील त्या अर्थातच अभिनंदनीय आहेत.

इतकें विवेचन केल्यावर मला मराठी दैनिकांच्या इतिहासाकडे वळलें पाहिजे. मराठी भाषेंतील दैनिकें आज जरी पुष्कळ वर्षे आपलें अस्तित्व प्रकट करीत असलीं, तरी त्या बाबतींत पहिला डोळ्यांत भरण्यासारखा प्रयत्न लो. टिळकाच्या प्रोत्साहनानें निघालेल्या ‘राष्ट्रमत’ दैनिकानें सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी केला. महाराष्ट्राच्या दुर्दैवानें तें पत्र फार दिवस टिकलें नाहीं. आणि म्हणूनच त्यानें बजावलेली कामगिरी लोकांच्या स्मरणात चिरस्थायी झाली नाहीं. त्या नंतरचा फार जोराचा प्रयत्न ‘ संदेश ’ दैनिकानें केला. कै. अच्युतराव कोल्हटकर यांनीं काढलेल्या संदेशचें खरें जोमदार आयुष्य सन १९१५ ते १९२१ पर्यंतचेंच धरलें पाहिजे. एवढया ५-६ वर्षांच्या अवधींत संदेश दैनिकानें आपल्या प्रचंड कामगिरीनें मराठी वृत्तपत्रव्यवसायांत आपलें नांव केवळ चिरस्मरणीय नव्हे, तर अजरामर करून ठेवलें. त्यांनीं आपल्या कुशाग्रबुद्धीनें व कमालीच्या चिकाटीनें संदेशमार्फत मराठी वृत्तपत्रव्यवसायाला नवें वळण लावलें, ही गोष्ट त्यांच्या शत्रूनाहि मान्यच करावी लागेल. त्यांच्या संदेशनेंच मराठींत आधुनिक पद्धतीच्या दैनिकांचा संप्रदाय सुरू केला असें

म्हटल्यास त्यांत मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. आपल्या संदेशांत त्यांनीं जे नवे नवे विषय वाचकांपुढें माडले त्यांचा विस्तारानें निर्देश करण्याचें हें स्थान नव्हे. प्रस्तुत प्रकरणांत मी अच्युतरावजींच्या संदेश दैनिकाचें महत्त्व, बातमीदार या एकाच बाबीच्या विवेचनानें करणार आहे. त्यांनीं बातमीदारांच्या मार्फत संदेशकडून जी महाराष्ट्राची सेवा केली ती अत्यंत महत्त्वाची होय. त्याना नानातऱ्हेच्या विषयावरील स्फूर्तिदायक व चटकदार लेख लिहिण्याची जितकी हौस होती, तितकीच हौस त्यांना अधिकृत बातम्या प्रसिद्ध करण्याचीहि होती. बातम्यांच्या दृष्टीनें विचार करता संदेशला पूर्वीच्या व आजच्या वृत्तपत्रात अग्रस्थानच दिलें पाहिजे. या दृष्टीनें त्यांना मी मराठी दैनिकांच्या पीठाचे ‘ आद्य शंकराचार्य ’ असेंच म्हणतों त्यानीं आपल्या संदेश-करतां अमुक एका घडामोडीची बातमी अधिकृत बातमीदारामार्फत आणली नाहीं, असें कधीं झालेंच नाहीं. सभा, संमेलनें, परिषदा, व्याख्यानमाला, पुढाऱ्यांचे दौरे इत्यादि घडामोडींच्या अव्वलप्रतीच्या अधिकृत बातम्या ते प्रसिद्ध करीत, यांत कांहींच शंका नाहीं. पण आश्चर्य हे कीं, त्यांनीं मुंबई-पुण्यास दर शनिवारीं बुधवारीं होत असलेल्या नाटक प्रयोगांच्याहि बातम्या आपले बातमीदार पाठवून नियमितपणें प्रासिद्ध केलेल्या आहेत ! या बाबतींत नुकत्याच झालेल्या अत्रे-वेरेरकर वादांतील एक मौज सांगितल्यास अस्थानीं होणार नाहीं. रा. वेरेरकर यांनीं सदर वादात लो. टिळक हजर असलेल्या एका नाटय-प्रयोगाचा उल्लेख केला. त्याला उत्तर देण्यासाठीं रा. अत्रे यांना त्या दिवसाच्या संदेशच्या अंकांत लो. टिळक हजर असलेल्या नाटयप्रयोगाची विस्तृत हकीकत सांपडली. त्या प्रयोगाला लो. टिळक केव्हां आले, कोणाकोणा समवेत आले, तेथें किती वेळ बसले, त्या प्रयोगाच्या वेळीं काय काय गोष्टी घडल्या, इत्यादि सर्व माहिती बातमी संदेशनें आपल्या अंकांत दिली. या विस्तृत बातमीमुळें पुष्कळ शंकांचें निरसन रा. अत्रे यांना खात्री-पूर्वक रीतीनें करतां आलें. ही जर एका साध्या नाटयप्रयोगाची हकीगत, तर सभा व परिषदा यांसारख्या अत्यंत महत्त्वाच्या विषयांची गोष्ट बोलावयासच नको ! सांगण्याचें तात्पर्य इतकेंच, कीं सार्वजनिक स्वरूपाच्या सर्व प्रकारच्या लहान मोठया घडामोडीची बित्तंबातमी अच्युतरावजींच्या संदेशांत येत असे. अशा बातम्या देतांना त्यांनीं संदेशचें धोरण उदारच ठेवलेलें होतें. त्यांनीं

संदेश पत्रांत जितक्या उत्साहानें व जितक्या हौसेनें राष्ट्रीय पक्षाच्या परिषदांच्या हकीगती दिल्या, तितक्याच उत्साहानें व हौसेनें त्यानीं संदेशांत नेमस्तासारख्या परपक्षीयांच्या परिषदांच्याहि हकीगती दिल्या. या कामीं स्वतः अच्युतरावजींनीं विशेष बारीक लक्ष घातलें होतें हें मला स्वानुभवानें माहित आहे. संदेश पत्रांत काम करणारे जे अनेक बातमीदार होते त्यांतच मीहि एक लहानसा बातमीदार होतों. हें संदेशच्या बातमीदाराचें काम मी हौसेनें पत्करलें होतें. अच्युतरावजींचा मुक्काम मुख्यतः मुंबईस असल्यानें व माझें बहुतेक काम मुंबईबाहेर झाल्यानें मला त्यांच्या प्रत्यक्ष शिकवणुकीचा लाभ फारसा मिळालेला नाहीं. तरीहि त्यांनीं उत्तम रीतीचें प्रोत्साहन देऊन माझ्या हातून बातमीदाराचें काम करवून घेतलें. त्याचें प्रोत्साहन मला जर मिळालें नसतें तर माझ्या हातून जें काय थोडें बहुत कार्य झालें तेंहि झालें नसतें हें मला कबूल केलेंच पाहिजे. संदेशचा खास बातमीदार म्हणून तीन वर्षे लोकमान्य टिळकाच्या जवळ काम करण्याची संधि मला मिळाली. १९१६ सालीं झालेल्या लखनौच्या कॉंग्रेसपासून माझ्या मुख्य कामाला सुरवात झाली व तें काम मी सतत तीन वर्षें म्हणजे लो. टिळक कोलंबोहून परत येईपर्यंत केलें.

मी येथें माझ्या कामाचा जो उल्लेख करीत आहे तो माझी स्वतःची प्रौढी मिरविण्याच्या उद्देशानें नसून, संदेश पत्रानें बजावलेल्या कामगिरीचें भव्य स्वरूप वाचकांच्या लक्षात यावें म्हणूनच होय. या तीन वर्षांत लो. टिळकांनीं जी अत्यंत प्रचंड अशी होमरूलची चळवळ केली, तिची वित्तबातमी देण्याचें काम, लो. टिळकांच्या चरणांजवळ राहून मी करीत होतों. या कामाचें महत्त्व स्वतः लोकमान्यांनींहि संदेशच्या कामगिरीला आपला आशीर्वाद देऊन कबूल केलेलें आहे, ही गोष्ट विशेष लक्षात ठेवण्यासारखी आहे. ' अशा तऱ्हेचें काम विलायतेंतील पत्रें करीत असतात ' अशा तऱ्हेचा आपला लेखी अभिप्राय लो. टिळकांनीं प्रकट करून संदेशच्या कामगिरीला एक प्रकारें धन्यवादच दिलेले आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं.

या तीन वर्षांत संदेशनें होमरूलच्या चळवळीची जी अत्यंत बहुमोलाची सेवा केली, ती मान्य झाल्यामुळेंच लो. टिळकांनीं संदेशचा बातमीदार म्हणून मला आपल्याबरोबर विलायतेस नेण्याचें ठरविलें होतें. पण दुर्दैव असें कीं, विलायतेला जावयास निघालेल्या लो. टिळकांना सरकारच्या अनपेक्षित अशा

बंदीच्या हुकुमामुळें शिष्टमंडळासमवेत कोलंबोहूनच परत यावें लागलें व माझा विलायतला जाण्याचा बेत जो कां एकदां रहीत झाला, तो कायमचा झाला. ही हकीकत देण्याचा मुख्य उद्देश हा कीं, संदेशच्या कामगिरीचें महत्त्व वाचकाच्या मनावर ठसावें. कै अच्युतरावांनीं हीं तीन वर्षे आपलें संदेश पत्र सर्वस्वी लो. टिळकांच्या होमरूलच्या चळवळीलाच वाहिलें होतें, असेंहि म्हणावयास हरकत नाहीं. लो. टिळकांच्या दौऱ्याच्या विस्तृत हकीगती प्रसिद्ध करून संदेशनें होमरूल चळवळीला अत्यंत महत्त्वाची मदत केलेली होती. संदेश पत्रानें एक प्रकारें आपल्या अंकातून लो. टिळकाच्या तीन वर्षांच्या चारित्र्याचें उद्बोधक समालोचन केलें असेंहि म्हणावयास हरकत नाहीं. कित्येकानीं संदेशच्या या प्रचंड कामगिरीकडे मुद्दाम दुर्लक्ष केलें असलें, तरी शहाजोग बुद्धीच्या इतिहासकाराला संदेशच्या कामगिरीचे महत्त्व मान्य करावेंच लागेल अशी मला खात्री आहे. संदेशनें ही कामगिरी अर्थातच बातमीपत्राच्या मार्फत केली. अनुदार बुद्धीचे व 'इवल्याशा' अंतःकरणाचे कांहीं लोक जरी संदेशाची ती प्रचंड कामगिरी मुद्दामच विसरले असले, तरी अजून हजारों लोक त्या गोष्टीला पंधरा सोळा वर्षे लोटून गलीं असलीं, तरीहि विसरलेले नाहींत हें लक्षात ठेवलें पाहिजे. बातमीपत्राच्या मार्फत एकाद्या दैनिकाला राष्ट्रीय चळवळीला पोषक अशी प्रचंड कामगिरी कशी करून दाखवितां येते, हें अच्युतरावानींच आपल्या संदेशमार्फत दाखवून ठेवलें आहे. अच्युतरावाच्या संदेशाने अशा प्रकारें मराठी दैनिकाच्या इतिहासांत क्रांती केली यात शंका नाहीं.

मला या ठिकाणीं बातमीदाराच्या दृष्टीनें प्रस्तुत प्रकरणांवर थोडासा प्रकाश पाडला पाहिजे. अच्युतराव कोल्हटकराना बातमीपत्राचें महत्त्व कळत असल्यामुळे त्यांनीं मला 'वार्ताहर' ( रिपोर्टर ), खास बातमीदार ( कॉरेस्पॉन्डंट ) व प्रतिनिधी ( रिप्रेझेंटेटिव्ह ) असे तिन्ही अधिकार दिले होते. या तिन्ही अधिकाराचा उपयोग मी माझ्या अल्प बुद्धीप्रमाणें केला. लो. टिळकांनींहि मला अत्यंत प्रेमळपणानें वागवून माझ्या हातून आपल्या राष्ट्रीय चळवळीची सेवा करून घेतली. ते स्वतः पुष्कळ वेळा मला बातम्या पुरवीत असत ही गोष्ट मला येथें सांगितलीच पाहिजे.

येथें मला आणखीहि एक गोष्ट सांगितली पाहिजे, ती ही कीं नुसतें भाषणाचे रिपोर्ट दिल्यानें खऱ्या सर्वंकष बातमीदाराचें काम भागत नाहीं. आधीं प्रस्तावना जोडून व शेवटीं समारोप करून खऱ्या बातमीदाराला आपले बातमीपत्र परिणामकारक करावें लागतें. त्या शिवाय बातमीपत्रातील भाषणाचे महत्त्व वाचकाच्या मनावर ठसावे म्हणून मधून मधून समर्पक असे शेरे ( Remarks ) ही मारावे लागतात. थोडक्यात सागावयाचें म्हणजे सर्वंकष बातमीदारानें आपल्या बातमीपत्राच्या द्वारें वाचकाच्या डोळ्यापुढें त्या त्या गोष्टींचे स्पष्ट शब्दचित्रच उभें केले पाहिजे. संदेशनें हें काम केलें म्हणूनच मी त्याला प्रस्तुत प्रकरणांत अग्रपूजेचा मान देतों.

बातमीदारानें बातमीपत्रात निर्भेळ सत्यबुद्धीनें सर्व गोष्टी नमूद केल्या पाहिजेत. बातमीपत्रांत असत्य गोष्टी घुसडून देणारा तो खरा बातमीदार नव्हे. संदेशच्या बातमीपत्राचा उपयोग सरकारच्या गुप्त खात्यातील रिपोर्टरानीं खऱ्या हकीगतीचा उलगडा होण्यासाठीं अनेकदां करून घेतलेला आहे, हें सागितलें म्हणजे वरील गोष्टींचें महत्त्व वाचकाच्या ध्यानीं आल्याशिवाय रहाणार नाहीं. बातमीदाराला कोणती गोष्ट प्रामुख्यानें सागावी व कोणती गोष्ट कळवावी हें समजण्याचीहि बुद्धि असली पाहिजे. इतक्या गोष्टी जाणणारा तोच खरा सर्वंकष बातमीदार होय.

बातमीमध्यें जो एक मुख्य गुण असावयास पाहिजे तो म्हणजे अत्यंत मार्मिक आणि सूक्ष्म असें निरीक्षण. ही निरीक्षणाची शक्ति ज्या प्रमाणात बातमीदारामध्यें असेल त्या प्रमाणात त्यानें रेखाटलेलें शब्दचित्र परिणामकारक ठरेल. सूक्ष्म निरीक्षणाशिवाय बातमीदाराना अत्यंत परिणामकारक अशी, काहींशी काव्यमय व बरीचशी चटकदार, भाषा लिहिता आली पाहिजे. उत्तम लेखक हाच उत्तम बातमीदार होऊं शकतो.

पण एवढयानेंच सर्व काम भागत नाहीं. आपल्या बातमीदारामार्फत आलेल्या बातमीपत्राला कशा प्रकारें उठाव द्यावा हें समजण्याची अक्कलहि दैनिकाच्या संपादकाला असली पाहिजे. या कामात संपादक नालायक असेल, तर उत्कृष्ट लिहिलेल्या बातमीपत्राचाहि चुथडा झाल्याशिवाय रहाणार नाहीं. बातमीपत्र हातीं आल्यावर त्याला योग्य तें स्थान देऊन त्यावर अनुरूप मथळे

देणें हें संपादकाचें काम असतें. अर्थात उत्तम बातमीदाराला मर्मज्ञ संपादकाचा पाठिंबा मिळेल तरच वर्तमानपत्राच्या हातून उत्तम कामगिरी बजावली जाते. आपल्या कर्तव्याची पूर्ण जाणीव असलेला, समर्पक मथळे कसे द्यावे हें ज्ञान असलेला व योग्य स्थान देण्याचें महत्त्व जाणत असलेला अच्युतराव कोल्हटकरांइतका तीव्र बुद्धीचा संपादक माझ्यातरी पहाण्यांत दुसरा नाहीं. अच्युतराव कोल्हटकर अशा प्रकारें श्रेष्ठ दर्जाचे संपादक होते आणि म्हणूनच त्यांनीं बातमीदाराकडून वृत्तपत्रव्यवसायाची उत्कृष्ट सेवा करवून घेतली.

वरील हकीकतीवरून वाचकांना माझ्या म्हणण्याचा स्पष्ट बोध होईल व वृत्तपत्रव्यवसायांत बातमीदाराच्या असलेल्या महत्त्वाचें आकलन करतां येईल अशी मला आशा आहे. सदर विवेचन करताना केवळ अपरिहार्य म्हणूनच मी माझ्या स्वतःच्या नांवाचा उल्लेख केलेला आहे, त्याबद्दल वाचकांची क्षमा मागून बातमीदाराचें महत्त्व नमूद करणारें हें प्रकरण मी पुरें करतों.

---

–३–

लेखकः—श्री. गोविंद मंगेश लाड.

[ ‘ सकाळ’ चे मुंबईचे प्रतिनिधी. गांधींच्या सुटकेनंतर अहमदाबाद, हिंदू-सभा व दयानंद अर्धशताद्धि यांसाठीं अजमेर, साहित्य संमेलनासाठीं नागपूर, अशा ठिकाणचे ‘ सकाळ ’ चे खास बातमीदार. ]

## मुलाखती कशा घ्याव्या ?

मुलाखतीचा प्रकार वृत्तपत्रांच्या कचेरींत अलीकडे घुसला असून अमेरिकेंत जरी त्यास अग्रेसरत्वाचा मान मिळाला असला, तरी हिंदुस्थानांत राजकीय पुढाऱ्यांच्या मुलाखतीखेरीज इतर बाबतींत या पद्धतीचा कोणीहि सहसा उपयोग करीत नाहीं असें म्हटलें तरी चालेल. याचें मुख्य कारण असें, कीं कोणाचे भेटीस जाणें म्हणजे कमीपणा पदरीं घेणें, अशी बऱ्याच जणांची समजूत असते. ‘ अमक्या अमक्याची मुलाखत जाऊन आणा ’ म्हणून जर एखाद्या उपसंपादकाला सांगितलें, तर तो सांगेल “ कृपाकरून एवढें सांगू

नका. मी पाहिजे तर चार अधिक तारांचें भाषांतर करतों. ” गेल्या पांच वर्षांत मला हाच अनुभव आला. तेव्हां शेवटीं गैरसमज दूर करण्यासाठीं एकास बोलावून मला सांगावें लागलें कीं, “बाबारे, आज तुला स्मान दर्जावर राहून मुलाखत आणण्याची लाज वाटते; पण उद्यां नोकरीसाठीं त्यांच्याकडे जाशील कीं नाहीं ? ” हें माझें म्हणणें त्यांस पटलें. तात्पर्य काय कीं, हें काम हलकें मानण्याची प्रथा वृत्तपत्रांच्या कचेरींत पडली असली, तरी एक गोष्ट ध्यानांत ठेवणें जरूर आहे, कीं अग्रलेख लिहिण्यापेक्षांहि मुलाखत घेऊन ती व्यवस्थितपणें देण्याचें काम जास्त जबाबदारीचें असून, तें तितकेंच कठिण आहे.

कोणत्याहि विषयावर प्रकाश पाडण्यासाठीं आजच्या वृत्तपत्रीय व्यवसायात मुलाखतीचा उपयोग करण्यांत येतो. मोठमोठया व्यक्ति लेख लिहून देण्यास तयार नसतात, अगर लेख लिहिण्यास त्यांस वेळ नसतो. परंतु त्यांचे विचार मात्र उद्बोधक असतात. अशा वेळीं या मुलाखतीचा उपयोग फार होतो. परंतु मुलाखत घेणारानें मुलाखत देणाराच्या हृदयांत शिरण्याची कला हस्तगत करणें जरूर आहे.

ही कला वरवर पाहणारास अवघड दिसत असली तरी कांहीं थोडया व्यक्ति सोडल्यास त्याचे मनातील गोष्टी काढून घेण्यास फारशी अडचण पडत नाहीं. या बाबतीत बातमीदारानें दोन प्रमुख गोष्टी ध्यानीं ठेवल्या पाहिजेत. हंसतमुख चेहऱ्याची चालती बोलती हुंडी पटविण्यास मुळींच अडचण पडत नाहीं, हा अनुभव या बाबतींतही तेवढयाच उत्कटतेनें निदर्शनास येतो. दुर्मुखलेला सुतकी चेहरा पहाणें रस्त्यांतील भिकाऱ्यालाही जेथें आवडणार नाहीं, तेथें गरजू इसमाचें काम कसें होणार ? सुटसुटीत चपळ भिकाऱ्याचें पोट ज्याप्रमाणें इतरांपेक्षां चार पैसे जास्त मिळवतें त्याचप्रमाणें बातमीदाराच्या शर्यतींत हंसतमुख व हजरजबाबी बातमीदार इतरांवर नेहमीं वजन मारून असतो.

या गोष्टींबरोबर आणखी एका गोष्टीची बातमीदारानें आपल्या साहित्यांत भर घातली पाहिजे. First impression is the permanent impression हा नियम बातमीदाराच्या बाबतींतही लागू पडत असतो. तेव्हा या बाबतींत बातमीदारानें आपल्याकडून होईल तेवढें करून ज्याची भेट घेणार त्याचे मनात आपल्याविषयीं जेणें करून आदर उत्पन्न होईल, अशा

गोष्टी केल्या पाहिजेत. यासाठीं नीटनेटका पोषाख करणें ही महत्त्वाची बाब आहे. ‘एकनूर आदमी दसनूर कपडा’ ही म्हण व्यवहारांत दर पावलीं दृष्टीस पडत आहे.

एवढी प्राथमिक तयारी झाली कीं मुलाखतीची चार आणे तयारी झाली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण बातमीदार म्हटला म्हणजे पुरेसे कागद, आवश्यक तेवढया पेन्सिली, स्वतःचें व्हिजिटिंग कार्ड व बोलण्याची शैली एवढें भांडवल नेहमींच त्याचेजवळ असतें असें गृहीत धरून चालण्यास मुळींच अडचण नाहीं.

वृत्तपत्राच्या कचेरींत मुलाखतींना अद्याप फारसें महत्त्व देण्यात येत नसल्या-मुळें, त्याचे सर्व विधि पार पाडण्याची जबाबदारी बातमीदारावर टाकण्यांत येते. बातमीदार झाले तरी मनुष्यच असल्यामुळे त्याची सर्वच बाबतींत मति चालते असें मुळींच नसतें. पण त्याची सहसंपादक पर्वा करीत नाहीं. त्याच्या मनांत आलें, कीं तो दिसेल त्या बातमीदाराला मुलाखत आण म्हणून फर्मावील. बातमीदार हा बोलून चालून त्याचे हाताखालचा नोकर असल्यामुळें ‘मला माहीत नाहीं’ असें सागण्याचे धैर्य त्यास होत नाहीं. याचा परिणाम साहजिकच असा होतो कीं चागल्या मजकुराचा चुथडा होतो.

मराठी वर्तमानपत्रात विशेषतः माणसें कमी असल्यामुळें एकाच बातमी-दारावर विविध प्रकारचीं कामें पडतात. अशा वेळीं बातमीदार अष्टपैलू असला तर त्यास सर्व साधतें; नाहीं तर दुसऱ्याकडे तोंड वेंगाडण्याचा व हिणवून घेण्याचा कटुप्रसंग त्याजवर येतो. यासाठीं बातमीदारास ज्याप्रमाणें निर-राळ्या विषयाची माहिती असणें जरूर आहे, त्याचप्रमाणें संपादकांनींहि त्याच्याकडे सहानुभूतीनें पाहून त्यास वेळोवेळीं सूचना देणें जरूर आहे.

परंतु आज कालचे संपादक मुलाखत आणण्याविषयींचा हुकूम सोडला, कीं आपलें काम झालें असें समजतात. केव्हां केव्हां तर बातमीदारहि स्वतःविषयीं भलत्या कल्पना बाळगणारे असल्यामुळें दोहोंच्या संमिश्रणानें तिसऱ्याची मात्र भरपूर करमणूक होते. मुलाखतीची सूचना मिळताच बातमीदारहि कोणते प्रश्न

विचारावयाचे याचा विचार न करता तडक मुलाखत देणाराचे घर गाठतो. आणि शेवटीं डोकें खाजवून आपल्या वेळीं सुचतील ते दोन चार प्रश्न विचारून येतो. अशा रीतीनें घेतलेल्या मुलाखती कवडीमोल ठरतात असा अनुभव आहे.

मुलाखतीस पाठवावयाचा बातमीदार नवा असल्यास त्यास साध्या मुलाखती आणण्याचें काम सुरुवातीस देणें जरूर असतें. यामुळें त्याची भीड चेपते व आत्मविश्वास उत्पन्न झाल्यामुळे मोठमोठ्याच्या मुलाखती घेण्याची जबाबदारी तो हौसेनें पत्करतो. परंतु काल नेमणूक केलेल्या बातमीदाराला जर एकाद्या बड्या पुढाऱ्याची मुलाखत आणण्यास सांगितलें, तर तो भांबावून जाईल आणि शेवटीं 'मुलाखत कुचकामी' म्हणून संपादकानें शेरा मारल्यास त्याचा धीर खचेल.

मुलाखत घेण्याचे निरनिराळे प्रकार असतात. कांहीं जण गप्पा मारतां मारताच मुलाखत घेतात, तर कित्येक जण सुरवातीला तरी ठाण मारून मुलाखत घेतात, तेव्हा प्रश्नपत्रिका मुलाखत देणाऱ्याच्या तोंडावर फेकतात. दुसरी गोष्ट फार क्वचित दृष्टीस पडते. परंतु कितीहि हुषार बातमीदार असला, तरी मुलाखत देणारास कोणकोणत्या क्षेत्रांत ओढावयाचें याचा विचार करूनच तो प्रश्न टाकतो.

प्रश्न विचारावयाचा व उत्तर लिहून घ्यावयाचें ही पद्धत चांगली असून, ती मुलाखत लिहून काढल्यावर तींत कांहीं तरी चुकलें असें आढळून येतें. हें कांहीं तरी म्हणजेच मुलाखत देणारांचें हृद्गत होय. तें पाहिजे असेल तर त्याला बोलण्याच्या रंगात आणणें जरूर असतें. आणि त्याला गप्पा मारण्याची पद्धत जास्त परिणामकारक ठरते. यामुळें केव्हां केव्हां विषयांतर होतें ही गोष्ट खरी असली, तरी त्या मुलाखतींत जिवंतपणा असतो.

राजकीय पुढाऱ्याच्या मुलाखती बहुधा ठरलेल्या विषयावर असतात. त्यामुळें बातमीदारास फारसें डोकें खाजविण्याची जरूरी पडत नाहीं. परंतु त्याचे पोटांत शिरून कोणतीहि बातमी काढणें फार कठिण असतें. वर वर कितीहि गोड बोलले तरी पोटातील पाणी हालल्याचा मागमूसहि बाहेर दिसणार नाहीं, एवढी खबर-

दारी ते घेत असल्यामुळें त्यांना सांगावयाचें तेवढेंच ते सागतात. केव्हां गप्पांच्या नादात थोडेसें कांहीं तरी कमावतां येतें; पण ही लुटीची रक्कम फार थोडी असते.

यासंबंधीं सागावयाची गोष्ट ही कीं बातमीदारानें पुढारी ओळखून प्रश्न टाकणें जरूर असतें. जॉइंट पार्ल० कमिटीहून आलेल्या पुढाऱ्यास जर काँग्रेसच्या धोरणाविषयीं प्रश्न टाकला तर तो काय उत्तर देणार? त्याचप्रमाणें प्रश्नांचीं उत्तरेंहि केव्हां केव्हां मासलेवाइक देण्यांत येतात. पण त्यामुळें हिरमोड होऊं न देतां दुसऱ्या मार्गानें ती माहिती काढतां आल्यास बातमीदारानें जरूर प्रयत्न करावा; पण लोचटपणा मात्र करूं नये.

केव्हां केव्हां मुलाखत देणारा खुषींत असला तर तो कोटी करून बातमीदारास जमिनीकडे पहाण्याचा प्रसंग आणतो. अशा वेळीं बातमीदारहि जर थोडासा विनोदी असला तर त्याचें काम लवकर फत्ते होतें. विशेषतः गांधीजींशीं बोलतांना बातमीदारांची फार पंचाईत होते. त्यांच्याशीं बोलतांना बातमीदार हजारजबाबी तर पाहिजेच; पण त्याबरोबर तो धोरणीहि असला पाहिजे.

मुलाखतीस जाणाऱ्या बातमीदारानें मुलाखत घेणाराशीं केव्हांहि एकरूप होऊं नये. नाहीं तर भावनेस बळी पडून तो त्यातच गुंगून जातो व मुलाखतीचें काम सुरळीत होत नाहीं. १९३२ च्या सेप्टेंबरात महात्माजींच्या उपवासाच्या बातमीमुळें सबंध हिंदुस्थानात खळबळ उडाली होती. अशा वेळीं ज्या दिवशीं गांधीजींनीं उपवासास सुरुवात केली, त्याचदिवशीं संध्याकाळीं त्यांनीं वृत्तपत्राच्या बातमीदारांस मुलाखत दिली. त्यावेळीं गांधींचा सतेज चेहरा पाहून एका वृत्तपत्राचे बातमीदार, कल्पना चित्रें रंगवताना व तोंडांतून निघणारा वाङ्मयाचा दोन तास प्रवाह तोंड वासून पहाताना एवढे दंग झाले, कीं बिचारा मुलाखतीचें टिपण करण्यास विसरला आणि शेवटीं इतर वृत्तपत्रांच्या बातमीदाराची त्यास मनधरणी करावी लागली! ही गोष्ट दिसण्यांत साधी दिसत असली, तरी आचरणांत आणणें फार बिकट असल्याचें कित्येकांनीं बोलून दाखविलें आहे.

हें सर्व सागितलें तरी मुलाखत घेणाराचे अंगीं जात्याच कांहीं गुण असावे लागतात. ते गुण शिकवून येत नसतात. कै. डॉ. ॲनि बेझंट याच्या अस्थि घेऊन श्री. तेलंग हे काशीस जाण्यासाठीं मुंबईत आले असता एका बातमी-

दाराला श्री. जिनराजदास अगर श्री. तेलंग यांपैकीं कोणाची तरी मुलाखत आण म्हणून सूचना मिळाली. या बहाद्दरांनीं प्रश्न काढले व मुलाखत घेतली. ऑफिसमध्यें येऊन त्यानीं ती लिहून काढली. पण काय वाटलें कोणास ठाऊक, एकदम झटका आल्यासारखें करून ते म्हणाले " पण मी कोणाची मुलाखत घेतली ध्यानांत येत नाहीं. " शेवटीं बिचाऱ्या सहसंपादकाला मुलाखत घेणारासह संशोधनासाठीं बाहेर पडावें लागलें ! गोष्ट पहाण्याला गेलें तर साधी; पण दोघाचे दोन तास व श्रम फुकट गेले.

कांहीं कांहीं जणांना मुलाखतीला सुरुवात कशी करावी हाच प्रश्न पडतो. ह्या प्रश्नाचें उत्तर बातमीदाराच्या मगदुरावर अवलंबून राहील. साधारणपणें अशी पद्धत असते, कीं ज्याची मुलाखत घ्यावयाची असते त्याच्याकडे बातमीदार आपलें व्हिजिटिंग कार्ड भेटीचा उद्देश लिहून पाठवून देतो. त्यानंतर गांठ पडताच नमस्कार चमत्कार होऊन पहिली भीड चेपते. अशा वेळीं मूळ मुद्द्याला हात घालण्यास बातमीदारास मुळींच हरकत नसते.

त्याचप्रमाणें मुलाखत देणाराची रजा केव्हां घ्यावी ह्या विषयीं ही बातमीदारानें खबरदारी बाळगणें जरूर आहे. मुलाखत देणाऱ्याच्या सौजन्याचा फायदा घेऊन त्याच्याशीं लघळपणा करून, स्वतःच्या पदरीं मूर्खपणा त्यानें केव्हांहि बांधून घेऊं नये. परंतु काम झाल्याबरोबर ' बरं येतों ' असें ही म्हणूं नये. तात्पर्य काय, कीं एकीकडे लघळपणा व दुसरीकडे तुसडेपणा ह्या दोहोंतील सुवर्णमध्य त्यानें गांठला पाहिजे.

मुलाखत घेतल्यावर ती छापण्यासाठीं देण्यापूर्वी देणाराच्या नजरेखालून गेल्यास सहसा चुका रहात नाहींत व गैरसमजहि होत नाहींत. विशेषतः ज्या वेळीं महत्त्वाचा वादग्रस्त प्रश्न उपस्थित होतो, त्यावेळीं तर ही पद्धत फायदेशीर असते. कारण त्या मुलाखतीची जबाबदारी बातमीदारावर रहात नाहीं. पण केव्हां केव्हां मुलाखत घेऊन ती लिहून काढून देणाराचे स्वाधीन करण्यास लागणारी फुरसत बातमीदारास नसते. अशा वेळीं सर्व जबाबदारी बातमीदारावर पडते.

यांतून पार पडण्याचा उत्तम उपाय म्हणजे बातमीदारानें मुलाखत घेतांना प्रश्नोत्तराचें टांचण व्यवस्थित करावें. बातमीदारास लघुलिपी येत असल्यास टांचण

घेण्याचा प्रश्नच उरत नाहीं. पण ज्यास येत नाहीं, त्यानें शाळा कॉलेजांत ज्याप्रमाणे टिपणें लिहून घेतात त्याप्रमाणें करावें. याबाबतींत खबरदारी न घेतल्यास विनाकारण गैरसमज होतो. याचें कारण केव्हां केव्हां क्षुल्लक शब्दांमुळें भलताच अनर्थ होतो. " पं. मालवीय यांत पडले नसते तर बरें झालें असतें," याऐवजीं " प. मालवीयाना हा लाडा कारभार करावयास कोणीं सांगितलें ? " असें एका वृत्तपत्रात प्रसिद्ध झाल्यामुळें काहीं महिन्यापूर्वी बरीच खळबळ उडाली होती ही गोष्ट बातमीदारानें विसरून चालणार नाहीं.

मुलाखत घेण्याएवढेंच ती लिहून काढण्याचें काम कठिण असतें. मुलाखतीस कितपत महत्त्व द्यावयाचें हें ठरवून त्याप्रमाणें आराखडा बसविणें जरूर असते कोणती मुलाखत चार ओळींत, चार पॅऱ्यांत अगर चार कॉलमात बसवावयाची, हें ठरविल्यावर पार्श्वभूमीसाठीं त्यांतील किती ओळी द्यावयाच्या हें ठरविणे सोपें होतें. परंतु तसें न करता पार्श्वभूमीचें वर्णन करण्यात दीड कॉलम खर्ची घातल्यावर संपादकांकडून सूचना यावयाची; मग मुख्य मुलाखत चार छेदकात आटपावयाची हा प्रकार पहाण्याचा प्रसंगहि केव्हां केव्हा येतो.

त्याच प्रमाणें मुलाखतींतील एकाद्या मुद्दयास प्रामुख्यानें पुढें आणावयाचें झाल्यास तो मुद्दा थोडासा घोळवून स्पष्ट केला तर तें करणं खुलून दिसेल. त्याच प्रमाणें आपणास सोईस्कर नसेल तो मुद्दा एकाच वाक्यात आटपून घेण्याची कला बातमीदाराला साधतां आली पाहिजे.

हें सर्व होण्यास बराच कालावधि लागेल. पाश्चात्य देशांत मुलाखतीसाठीं जाणारा खास बातमीदार असतो. तर आमच्याकडे पडेल तें काम करण्याची तयारी बातमीदारास करावी लागते. यामुळें त्यांतील दर्दी होण्याची संधीच त्याला मिळाली नाहीं. व प्रस्तुत लेखहि त्या दृष्टीनें लिहिण्यात आलेला नाहीं. या लेखाचे द्वारें वृत्तपत्रीय व्यवसायाचें एक नवें दालन उघडून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळें बातमीदार होऊं इच्छिणारास मुलाखतीची खोटी भीति जाऊन या नव्या दालनानें आंत शिरण्याची जरी इच्छा झाली तर मी स्वतःस कृतार्थ झालों असें समजेन.

– ४ –

लेखकः—श्री. के. नारायण काळे. बी. ए. एल्‌एल्. बी.
[ कांहीं काळ ' रत्नाकर ' चे व हल्लीं ' प्रतिभा ' पाक्षिकाचे सपादक ]

## नाट्य-परीक्षण.

मराठी वृत्तपत्राच्या व्यवसायात नाट्य-परीक्षण हा पूर्वीप्रमाणें आतां एकादा उपेक्षणीय विषय राहिलेला नाहीं. असा एक काळ होता कीं प्रतिष्ठित वृत्तपत्रांना तेव्हां नाट्यविषयक चर्चेला आपल्या ' स्तंभांत ' स्थान देणें कमीपणाचें वाटे. एकाद्या प्रतिष्ठित वर्तमानपत्राच्या संपादकीय खुर्चीवर बसणारा शिष्ट जर विद्वान् असून, शिवाय वर नाटककारही असला तर त्याला त्या पत्राच्या गोतावळयांत आपला तो गुण अभिमानानें सागण्याची चोरी असे! सुदैवानें असो वा दुर्दैवानें असो, ही परिस्थिती सध्यां पालटली असून वाचकांच्या नाट्यविषयक बातमीबद्दलच्या वाढत्या उत्सुकतेमुळें, प्रतिष्ठित वृत्तपत्रानाहि आतां आपले रकाने नाटक व चित्रपटाविषयक वृत्तासाठीं उघडे करावे लागले आहेत. नाट्यवृत्तविषयक उत्साह उत्पन्न करण्याचें श्रेय बव्हंशीं कै. अच्युतराव कोल्हटकर व रा. अनंत हरी गद्रे यांना आहे. नाटकाच्या पुस्तकांची वाङ्मयिक परीक्षणें वर्तमानपत्रांतून व मासिकांतून देण्याची प्रणाली जुनी असली, तरी नाट्यप्रयोगाचीं परीक्षणें व नाट्यसंस्थांबद्दलच्या बातम्या, व इतर नाट्यविषयक घडामोडी, हीं देण्याची प्रथा या दोघांनींच पाडली – निदान प्रसृत करून लोकप्रिय तरी केली – यांत संशय नाहीं.

आता ही पद्धती दृढमूल होऊन प्रत्येक लहानमोठ्या वृत्तपत्राला आवश्यक व अंगभूत होऊन बसली असल्यामुळें, तिचें तंत्र व शास्त्र बनण्याची वेळ प्राप्त झाली आहे. इंग्रजी वृत्तपत्रशास्त्रात नाट्यपरीक्षण हें एक महत्त्वाचें अंग मानलें जातें. इंग्लंडांत नाट्यसंस्थेची परंपरा दीर्घकालीन व परिणत स्वरूप प्राप्त झालेली असल्यामुळें, त्या मानानें तेथें नाट्य-परीक्षणाचीं परिमाणें हीं बरींच उच्च व काटेकोर असतात. तेथील नाटककार, कवि व प्रबंधकार म्हणून प्रसिद्धी पावलेल्या मोठमोठ्या लोकांनीं नाट्य-परीक्षकांचा धंदा आपल्या आयुष्यांत केव्हांना केव्हां तरी केलेला आहे. जुन्या जमान्यांतले जॉन्सन् , लॅब-

सारखे लेखक सोडले, तरी आजच्या पिढीला ज्यांचीं नांवें विशेष परिचयाचीं आहेत असे, क्लेमेंट स्कॉट, ए. बी. वॉक्ले, जॉर्ज बर्नार्ड शॉ, सिंजन् आयर्विन् व हॅन् स्कॉफर, यांसारखे प्रथितयश ग्रंथकार, कोणत्याना कोणत्या तरी वृत्तपत्राचे नाट्य–परीक्षक होते, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. इंग्लिश ग्रंथकाराच्या नांवाचा या ठिकाणीं उल्लेख करण्याचें कारण, आमच्या वृत्त-पत्रांच्या नाट्य-परीक्षकांना आपल्या कामाच्या महत्त्वाची आणि जबाबदारीची कल्पना यावी एवढाच आहे.

नाट्य–परीक्षण ही जितकी वाटते तितकी सोपी व सहजासहजीं साध्य होणारी गोष्ट नसून, ती साध्य होण्यासाठीं विशिष्ट मनोरचना, चटकदार भाषाशैली व नाट्य–शास्त्राच्या दंडकांचा निदान कामचलाऊ अभ्यास असणें अत्यंत आवश्यक आहे. इंग्लिश वृत्तपत्रव्यवसायिकांना शिकण्यासाठीं आखलेल्या अभ्यासक्रमांत प्रो. स्कॉट् जेम्ससारख्या साहित्य-पण्डितांचीं व्याख्यानें होतात व वृत्तपत्रांचे बातमीदार किंवा प्रतिनिधी होऊं इच्छिणाऱ्या उमेदवारांकडून साहित्य–शास्त्राच्या ज्ञानाची विशिष्ट मर्यादेपर्यंत अपेक्षा केली जाते, ही गोष्ट आमच्या वृत्तपत्रव्यवसायिकांनीं ध्यानांत ठेवण्या-सारखी आहे. नाटक–परीक्षण झालें तरी तें परीक्षण आहे, ही गोष्ट परीक्षक होणाऱ्यानें विसरून चालणार नाहीं. ज्यांची ज्या विषयांत परीक्षा घ्यावयाची त्यांचे व त्यांच्या विषयाचें ज्ञान परीक्षकाला नसेल, तर परीक्ष्यांपेक्षा परीक्षा आणि परीक्षक हींच अधिक हास्यास्पद होणार, हे ठरलेलेंच.

अर्थात् नाट्य-परीक्षण करण्यास प्रवृत्त होणाऱ्यानें प्रथम नाट्य-नियमांचें, परिस्थितीचें, व वैशिष्ट्याचें परिशीलन करून प्रथम पुरेसें एतद्विषयक ज्ञान संपादन करून घेतलें पाहिजे. नाटकाचा प्रेक्षक होणारा प्रत्येक मनुष्य आपा-पल्या पुरता जरी त्या नाटकाचा परीक्षक असला, तरी सामुदायिक उपयुक्त-तेच्या दृष्टीनें परीक्षणाचें काम आंगावर घेणाऱ्या नाट्य-परीक्षकाची जबाबदारी त्या वैयक्तिक प्रेक्षकपरीक्षकापेक्षां केव्हांहि अधिक असते. नाट्य-परीक्षक हा एका बाजूनें नट व नाटककार आणि दुसऱ्या बाजूनें प्रेक्षक व वृत्तपत्रांचे वाचक, यां मधला अदृश्य दुवा असतो. या दोन्ही बाजूंच्या अपेक्षा व मर्यादा बरोबर समजावून घेऊन दोघांनाहि मार्गदर्शक व मनोरंजक होईल असें परीक्षण लिहिणें, हें वृत्तपत्राच्या प्रतिनिधीभूत झालेल्या नाट्य-परीक्षकांचें काम होय.

नाटय-परीक्षकाला परीक्षण करण्याची पात्रता येण्यासाठीं अभिनय, नेपथ्य, नाटयरचना, प्रकाशक्षेपणशास्त्र, व सांधिक मनोवृत्ती, याचें ज्ञान असणें आवश्यक आहे. आकर्षक व चटकदार भाषापद्धती हे नाटय-परीक्षणाच्या लेखनाचे महत्त्वाचे व आवश्यक गुण असून मार्गदर्शकता आणि मनोरंजन हें नाटय-परीक्षणाचें साध्य होय.

नाटय प्रयोगाचे स्वरूपाबद्दल " भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम् " असें जें वर्णन कालिदासानें केलेलें आहे तें अत्यंत अन्वर्थक आहे. वेगवेगळया वर्गाच्या, भिन्नभिन्न वयोमानाच्या, विविध परिस्थितींतल्या माणसाचें एकाच वेळीं मनोरंजन करूं शकेल असाच नाटय-प्रयोग यशस्वी ठरेल. एकादा नाटय-प्रयोग असा आहे की नाहीं, हें ठरविण्यासाठीं प्रेक्षक वर्गाच्या आकांक्षा-अपेक्षांची अजमावणी नाटय-परीक्षकाला करता आली पाहिजे. वैयक्तिक प्रवृत्तीपेक्षां सर्वस्वी भिन्न अशा मनोवृत्ती, त्याच व्यक्ती संघात समाविष्ट झाल्या असतां उत्पन्न होतात, हें नाटय-परीक्षकानें प्रथम ध्यानांत बाळगणे आवश्यक असतें. नाटय-परीक्षकाच्या या संघ-प्रवृत्तींच्या ज्ञानावर त्याच्या टीकालेखाचेंच नव्हे, तर नट व नाटककार याचेंहि सर्व यशापयश अवलंबून असतें. नाटय-परीक्षक आपल्या अनुकूल टीकेनें एकादा नाटयप्रयोग कितपत यशस्वी करूं शकेल, हा प्रश्न जरी काहींसा वादग्रस्त असला, तरी आपल्या प्रतिकूल टीकेनें एकादें नाटक तो पाडूं शकेल हें निर्विवाद आहे. प्रत्यक्ष नाटक पहाणाऱ्या प्रेक्षकापैकींहि फारच थोडयाना नाटकाच्या गुणावगुणाबद्दल स्वतःचें स्वतंत्र मत बनविण्या-इतकी पात्रता असते. आदल्या रात्रीं पाहिलेल्या नाटकाचे बरेवाईट गुणदोष पुष्कळदा दुसऱ्या दिवशींच्या वर्तमानपत्रांतील त्या प्रयोगावरील परीक्षणावरून बहुतेक जण ठरवीत असतात. प्रत्यक्ष नाटक पहाणारांची जर ही स्थिति, तर परीक्षण वाचून नाटक पहावयाचें कीं नाहीं हें ठरविणाऱ्यांवर प्रतिकूल वृत्तपत्रीय नाटय-परीक्षणांचा परिणाम किती होत असेल, हें सांगावयासच नको. अशी परिस्थिती असल्यामुळें, प्रेक्षक व वाचक, आणि नाटककार व नट या दोन्ही बाजूंचे हितसंबंध साभाळून परीक्षकानें आपलें परीक्षण लिहिलें पाहिजे. न्याय्य परीक्षण करण्यासाठीं, सामान्य प्रेक्षकाला नाटकांत काय पहावयाला पाहिजे असते हें ध्यानांत घेऊन, तें परीक्ष्यनाटयविषयांत कितपत प्रमाणांत

आहे, याचें विवेचन करणें हें नाट्यपरीक्षकाचें पहिलें काम होय. नाटकाला येणारीं माणसें करमणुकीसाठीं येतात, व्याख्यानें ऐकायला किंवा नीति–पाठ शिकायला येत नाहींत, आणि ही करमणूक त्यांना एकेकटे बसून पुस्तकें वाचून, करून घ्यावयाची नसते, तर चार मंडळींत बसून सांघिकरीत्या साध्य करून घ्यावयाची असते, हें परीक्षण लेखकानें कधींही विसरून चालणार नाहीं. नाट्यप्रयोग हे व्यक्तीच्या करमणुकीखातर नसून समष्टीच्या समाराधनार्थ असतात, हें ध्यानांत ठेवूनच नाट्य-परीक्षणें लिहिल्यास तीं वाचनीय व उपयुक्त होतील.

आपल्या परीक्षणापासून वाचकाला नाटकाच्या प्रयोगाबद्दलची यथार्थ कल्पना यावी, अशी अपेक्षा असणाऱ्या प्रयोगपरीक्षकानें अभिनय, नेपथ्य रचना, इत्यादि नाट्य-तंत्रात्मक गोष्टींची माहिती करून घेणें आवश्यक आहे. या विषयांवर इंग्रजींत वाचनीय अशीं अनेक पुस्तकें उपलब्ध आहेत. विल्यम् आर्चर, ॲश्ले ड्यूक्स यांचीं पुस्तकें प्रत्येक नाट्य--परीक्षकानें वाचणें प्राप्त आहे. मराठींतील " नाटक्याचे तारे " व श्री. दादासाहेब फाळके यांचें 'रंगभूमी' नाटक, हीं दोन पुस्तकें परीक्षण कार्याला अत्यंत उपयुक्त ठरतील. अभिनयाविषयीं लिहितांना विशिष्ट पात्राच्या अभिनयाची त्याच्या भूमिकेच्या दृष्टीनें प्रयोजाप्रयोजकता, योग्यायोग्यता काय होती याची छाननी करणें, हें प्रयोगपरीक्षकाचें महत्त्वाचें काम आहे, असें मी समजतों. अशा तऱ्हेची टीका मराठींत होत नसल्यामुळें आमच्या बहुतेक नटांना स्वतःवरील आपल्या कामाची जबाबदारी पुरेशी पटत नाहीं, व एकाग्राच कसून काम करणाऱ्या नटाचा उल्हास उत्तेजनाच्या अभावीं मावळून जातो. प्रयोग-परीक्षक व नट यांचें खाजगी जिव्हाळ्याचे वा शत्रुत्वाचे संबंध अनेक वेळां खऱ्या अभिनय विचक्षणेच्या आड आलेले दिसतात. हा प्रकार अत्यंत अनिष्ट आहे. हे प्रकार नाहींसे व्हावयास अभिनयाचें ज्ञान असणारे, जबाबदारी ओळखणारे व नाटक समजणारे नाट्य-परीक्षक, वृत्तपत्रांतून नाट्यप्रयोगांचीं परीक्षणें लिहूं लागले पाहिजेत. परीक्षकांकडून भूमिका दृष्ट्या नटाच्या अभि-नयाची योग्य छाननी होत नसल्यामुळें होणाऱ्या दुष्परिणामाचें एक उदाहरण म्हणून, मी रा. फाटक यांच्या रक्षाबंधनांतील गिरिधरच्या कामाचें देईन.

गिरिधरच्या त्या नाटकातील स्वभाव निदर्शनाचें श्री. फाटकांच्या त्या भूमिकेच्या प्रकटनाशीं काडीचेंही साम्य नव्हतें. दुर्गुण व व्यसनें याच्या पगड्याखालीं फार काल राहिल्यामुळें इच्छा असूनहि त्यांच्या कचाट्यांतून बाहेर पडण्यास धडपड करूनहि समर्थ न होणारा एक दुर्बल मनाचा वृद्ध राजा, हें नाटकांतलि गिरिधराचें स्वभावाविष्करणाचें सूत्र आहे. असे असतां रा. फाटक यांनीं आपली भूमिका तशी न रंगवितां गिरधरला तरुण, कामातुर, दुष्ट, धडपड्या व खुनशी बनविलें होतें; आणि हें त्याचें भूमिका-प्रकटन एकमुखानें सर्वांनीं वाखाणलें होतें. या वाखाणण्याचा परिणाम रा. फाटकांना आपल्या भूमिका बेजबाबदारपणें करण्याची संवय लागण्यांत झाला व रंगभूमीवर पहिला दर्जा प्राप्त होण्याला लागणारे गुण आंगीं असलेला लायक नट, केवळ प्रयोग-परीक्षकांच्या योग्य दिग्दर्शनाच्या अभावीं, शरीराचे ठराविक झटके, आवाजाचे खटके, व डोळयांच्या बुबुळांची उलटा पालट, एवढया सामुग्रीवर कसें तरी काम करून अतज्ज्ञ प्रेक्षकांना दिपवण्यांत संतुष्टता व अभिनयकलेची परमावधि मानूं लागला. रा. फाटकांसारखे किती तरी नट याप्रकारें चुकीच्या मार्गाला लागले असतील व ते तसे वारगळल्यामुळे किती तरी नाटककाराना आपल्या भूमिकांच्या स्वभाव निदर्शनाची उघडया डोळयानीं गळचेपी झाल्याचें दृश्य, मुकाटयानें पहावें लागलें असेल ! नाटय परीक्षकांनी आपल्या परीक्षणांतून नटांच्या भूमिकांच्या प्रकटन-पद्धतीची विचक्षणा करण्याची प्रथा सुरू केली नाहीं, तर मराठी रंगभूमीवरील नट आपापल्या भूमिका अधिकाधिक जबाबदारीनें करावयास प्रवृत्त होणार नाहींत व अभिनयाचा दर्जाही त्यामुळें वाढावयाचा थांबेल. अभिनयाच्या वेगवेगळ्या पद्धति, त्यांची युक्तायुक्तता, वेगवेगळ्या नटांच्या वैयक्तिक वैशिष्ट्यांची तुलना व विरोध यांचें निदर्शन, प्रयोगपरीक्षणांतून यथाप्रमाण झालेंच पाहिजे. कोणती भूमिका बरी कां व कोणती वाईट कां, याची कार्यकारण-मीमांसा प्रयोग परीक्षकानें केली पाहिजे — नुसतें ' बरें ' ' चांगलें ' ' भिकार ' असे शेरे पात्रांच्या कामांपुढें मांडणें म्हणजे प्रयोग–परीक्षण नव्हे.

परीक्षण दृष्टया अभिनयानंतरची महत्त्वाची गोष्ट म्हणजे सजावट. यांमध्यें-प्रकाशछायांचा उपयोग, देखावे, नेपथ्यरचना, पात्रांचे पोषाख इत्यादि गोष्टींचा अंतर्भाव होतो नाटकाचा काल व स्थल यांच्या मर्यादा सांभाळून जास्तींत जास्त

सजावट झाली आहे कीं नाहीं, नसल्यास ती कशी करतां आली असती, दोष कोणते राहिले आहेत, गुण कोणते आहेत, याची विचक्षणा करणें हेंहि प्रयोगपरीक्षकाचें काम आहे. गॉर्डन् क्रेगचें याविषयावरील पुस्तक नाट्य-परीक्षकाला बरेंच मार्गदर्शक होण्यासारखें आहे. मराठी रंगभूमीची सजावटीच्या दृष्टीनें अत्यंत शोचनीय स्थिती आहे. सध्यांची आमची नाटक-गृहातील रंगभूमीची जी लांबी रुंदी आहे ती वाढेपर्यंत, ती बदलणें शक्य नाहीं. तरीहि परीक्षकानें सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करून विधायक सूचना व टीका करण्यासारखे अनेक गुणदोष प्रत्येक नाटकात आढळतात, ते आपापल्या परीक्षणात अंतर्भूत करणें हें टीकाकाराचें काम होय.

प्रयोगदृष्ट्या कोणकोणत्या मुद्द्याचा अंतर्भाव नाट्य-परीक्षणांत झाला पाहिजे हें आतापर्यंत आपण पाहिलें. पण तेवढ्यानें नाट्य-परीक्षकाचें काम संपत नाहीं. यापेक्षां एक अधिक महत्त्वाचें काम नाट्य-परीक्षकाला करावयाचें असतें. नाटककार ज्या विशिष्ट उद्देशानें एखादें नाटक लिहितो, त्या मुख्य उद्देशाचीं ही वास्तविक पहाता सर्व उपागें होत. पण नाट्यकला ही कलाच अशी आहे कीं, जिच्यात उपागावरून उत्तमांगच अजमावयाचें असतें. माणसाच्या बाबतींत जसें आपल्याला त्याचें जड स्वरूप व बाह्य कृति दिसतात, परंतु त्याचें खरें स्वरूप म्हणजे स्वभाव, अदृश्यच राहातो, तसेंच नाटकांचीं सर्व अंगोपागे दिसत असतांनाहि त्याचें जें खरें स्वरूप म्हणजे त्यातील ‘ सत्त्व ’ किंवा तत्त्वज्ञान, तें मात्र कल्पनागम्य राहातें. या ‘ सत्त्वा ’ चा व दृश्य अंगोपागाचा संबंध नटवर्ग प्रयोगद्वारा प्रकट करीत असतो, तो विशद करून दाखविण्याचे प्रयोग–परीक्षकाचे काम आहे. हें काम व्यवस्थित व यथार्थ होण्यासाठीं परीक्षकानें आपलें अंतःकरण खुलें व पूर्वग्रहांनीं अदूषित असें ठेवलें पाहिजे. एका बाजूनें नट व नाटककार आणि दुसऱ्या बाजूनें प्रेक्षक व वाचक, यांमधला दुवा असें प्रयोगपरीक्षकाला आरभीं म्हटलें, तें याच दृष्टीनें. समग्र नाट्य-प्रयोगाचा एकंदर व्याप नटांनीं व नाटककारानें कोणत्या सूत्रावर गोवलेला आहे, हें परीक्षकानें आपल्याला दाखवावें अशी वाचकाची व प्रेक्षकांची अपेक्षा असते, आणि या एकंदर व्यापाला आपण जो एकसूत्रीपणा आणतों तो त्यानें विशद करून, उलगडून दाखवावा, अशी नाटककार व नट यांची अपेक्षा असते. प्रेक्षकांची जिगीषा व प्रयोगकारांचे कलात्मक मौन यांना

सांधणारा दुवा म्हणजे नाट्य प्रयोग-परीक्षक. नट-नाटककारांचे गुणदोष त्यानें प्रेक्षकाना कळवावयाचे, नाटकाचें स्वरूप त्याना समजेल अशा तऱ्हेनें ते विशद करावयाचें, प्रयोगकारांना प्रेक्षकांच्या अपेक्षा व मनोवृत्ती उकलून दाखवून, नाटक कसें असावें याचें दिग्दर्शन करावयाचें, हें नाट्य-परीक्षकाचें काम. हें काम करताना, त्यानें दृष्टी व्यापक ठेवली पाहिजे. प्रत्येक नाट्यप्रकार त्या त्या विशिष्ट प्रकाराच्या परिमाणांनीं अजमावला पाहिजे. स्वतःच्या ठरीव कल्पनांच्या निकषावर घासून एकाच मापानें सर्व प्रयोगांना बरें वाईट ठरविणें अन्याय्य होईल. निर्लेप मनानें योग्य ती शहानिशा करून रस व रसज्ञ याची गांठ घालून देणें हें त्याचें कार्य होय. आपलें हें स्थान व त्याचें कार्य ओळखून जर प्रत्येक प्रयोग-परीक्षक आपलीं नाट्य परीक्षणें लिहील, तर वृत्तपत्रें, प्रेक्षक व प्रयोगकार, या तिघांच्याही दृष्टीनें तीं उपयुक्त व मार्गदर्शक झाल्याशिवाय राहाणार नाहींत.

— ५ —

लेखकः—श्री. **श्रीपाद शंकर नवरे** B. A.

[ 'प्रताप' चे संपादक व 'श्रीलोकमान्य' चे सह-संपादक ]

## बातमीदारासाठीं 'वर्तमानसार'

—बातमीदाराचें काम त्रिविध असतें. बातमी मिळविणें, चटकदार भाषेंत लिहिणें व तिजवर थोडी बहुत टीका करणें.

—बातमीदारानें 'गम्य नाहीं' असें कुठल्याही विषयासंबंधीं व 'त्याच्याशीं काय करायचें' असें कुणाही व्यक्तीबद्दल म्हणूं नये. कुठला प्रसंग आणि कोणती व्यक्ती बातमींत केव्हां येईल सागता येत नाहीं.

—अमुक प्रसंगाची खबर आणा म्हणून संपादकानें म्हटलें कीं वाटेल तें झालें तरी ती आणलीच पाहिजे, असा बातमीदारी बाणा असावा. कांहींच बातमी मिळाली नाहीं किंवा भेटीस जावयाचे त्या व्यक्तीनें टाळाटाळी केली, तर बातमीदारानें नुसते प्रयत्नच नीट वर्णन केल्यास ते बातमीच्या सदरात जातील.

—कुठल्याही विधानाबद्दल किंवा प्रसंगाच्या, तारखेच्या, नांवाच्या, अचुकपणाची खात्री नसेल तेव्हां मुग्धपणा बरा.

—बातमीपत्रें वेदाप्रमाणें 'अपौरुषेय' असावींत. म्हणजे कुणीं लिहिलीं हें होतां होईल तो कळूं नये. याचा अर्थ तींत व्यक्तिमत्व नसावें असा नव्हे. प्रत्येकाला आत्मीयता तर वाटावी पण बातमीदाराची स्वतःची बढाई त्यांत नसावी.

—"आटपाट नगर होतें" अशी प्रत्येक कहाणीची ठराविक सुरुवात असते, तशी बातमीपत्राची कधींच नसावी. प्रारंभ निरनिराळ्या प्रकारें करतां येणें ही कलाच म्हणावी लागेल!

—वाक्यारंभीं आंकडे कधीं घालूं नये. घालणें भागच असल्यास अक्षरीं लिहावे.

—विनोद करण्याची कुठलीही संधि फुकट दवडूं नये. बातमीदार सदैव आनंदी व हसतमुख तर हवाच. पण त्याचीं बातमीपत्रेंही तशीच मृदु विनोदानें शिंपलेली असावी. वैयक्तिक टवाळकी, कुचेष्टा, बाष्कळपणा किंवा कोटयांचा सुकाळ अशानें विनोद उत्पन्न करण्याचा प्रयत्न करूं नये. सात्विक विनोद म्हणतात तोच बातमीदाराच्या उपयोगी.

—आपण लिहिलेलीं बातमीपत्रें किंवा मिळाविलेली बातमी इतर कोणांस दाखवूं नयेत – किंवा सांगूंही नयेत. कित्येक मुलाखती देणारे गृहस्थ 'काय लिहिणार तें मला आधीं दाखवा' म्हणून आग्रह धरतात. त्यांची मागणी मान्य करूं नये. त्यांच्या मुलाखतीचा विपर्यास होऊं देऊं नये, पण संपादकासाठीं लिहिलेलें लिखाण इतर कुणालाच दाखवूं नये. वैष्णव ब्राह्मण नैवेद्याच्या बाबतींत पाळतात तितका कडकपणा बातमीदारानें आपल्या लिखाणासंबंधीं बाळगावा.

—निरनिराळ्या इंग्रजी पत्रांतील खास बातमीदाराची पत्रें – विशेषतः दिल्ली – सिमला येथील राजकीय घडामोडींची चिकित्सा ज्यांत येते तीं – अभ्यासण्याचा परिपाठ बातमीदारानें ठेवावा. पक्षाभिमानी दृष्टि कशी ठेवावी आणि कोणत्या माहितीचा उपयोग केव्हा व कुठें करावा हें समजण्यास अशा पत्रांचा फार उपयोग होतो.

—वर्तमानपत्र कचेरींत धांदल कशी चालते व प्रत्येक घटक आपापल्या कामांत किती वाकब व तत्पर असावयास पाहिजे याची कल्पना येण्यास

'टिटॅनिक' बोट बुडाली तेव्हां एका अमेरिकन पत्राच्या कचेरींतील गडबडीचें वर्णन इंग्रजी पुस्तकांत आढळतें, तें प्रत्येक बातमीदारानें अवश्य वाचावें.

—इंग्रजी – मराठी ज्ञानकोश, निरनिराळीं सांवत्सरिकें ( Year Books ) मोठया प्रमाणावरील नकाशे, जिल्हावार गॅझेटियर्स, प्रांतिक इतिहास, शिरोगणतीचे ( सेन्सस ) रिपोर्ट, शब्दकोश, वगैरे संदर्भ–साहित्य स्वतःजवळ पाहिजे असें नाहीं. आपणांस लागेल तेव्हां तें कुठें मिळेल हें बातमीदारास ठाऊक हवें. त्यांच्यावाचून चालावयाचें नाहीं. शालोपयोगी भारत वर्ष, महाराष्ट्र सांवत्सरिक, केसरीप्रबोध, 'डेली मेल' इयरबुक, Military Almanac, Newspaper Reader's Companion, Dictionary of Economic Terms, असलीं छोटीं व स्वस्त पुस्तकें स्वतःजवळ ठेवण्यास हरकत नाहीं.

## संदर्भ – ग्रंथ

[ इंग्रजींत पत्रपांडित्य – ( Journalism ) हा शब्द अत्यंत व्यापक अर्थानें उपयोजितात. कादंबरी, लघुकथा किंवा चित्रपट – कथानक यांचे लेखकही पत्रपंडित म्हणून मिरवीत असल्यानें त्या भाषेंतील पत्रपांडित्यासंबधींचें वाङ्मय विविध व विस्तृत आहे. शिवाय शुद्ध इंग्रजी कसें लिहावें यावरच बऱ्याच पुस्तकांत भर दिलेला दिसतो. मराठींतून पत्रपाटव शिकणारांना अर्थातच त्यांचा तितकासा उपयोग नाहीं. म्हणून संदर्भ ग्रंथांची यादी देतांना मला मोठी अडचण वाटते. ही यादी पुरी नव्हे हें मी प्रथम सांगून ठेवतों. पाश्चात्यांत सर्वशाखांत वैशिष्ट्याचा प्रसार झपाट्यानें झाला असल्यानें पत्र-पांडित्यांतील निरनिराळ्या अंगोपांगावरसुद्धा खास ग्रंथ आहेत. परंतु ' प्राथमिक शाळे ' तील विद्यार्थ्यांना उपयुक्त अशीं तेवढीच पुस्तकें मी खालील यादींत दिलीं आहेत. —श्री. रा. टि. ]

---

### *SELECT BIBLIOGRAPHY*


Journalism – by some Masters of the Craft.

Authorship & Journalism – *A. E. Bull.*

Popular Guide to Journalism – *A. Kingston.*

Journalism (Affirmations) – *Wickham Steed.*

Journalism from A to Z – *Low Warren.*

News Reporting & Correspondence, – *Grant M. Hyde.*

Journalism Today, – *A. F. Thorn.*

Modern Journalism – *J. B. Mackie.*

Secrets of Your Daily Paper, – *F. W. Carter.*

The Making of Modern Journalism, – *Harold Herd.*

A Course in Journalistic Writing, – *Grant M. Hyde.*

The Making of a Journalist, – *Julian Ralph.*